## सर नारायण व तरुण पिढी.

एका व्यक्तीविषयीं लिहितांना दुसऱ्या कोणाशीं त्या व्यक्तीची तुलना करणें, हें शिष्टाचाराविरुद्ध आहे. आणि तशी तुलना करण्याच्या आम्ही भानगडींत पडतही नाहीं व ह्या लेखांत तशा प्रकारच्या तुलनेची कांहीं अवश्यकताही नाहीं. परंतु एक गोष्ट येथें विशेष रीतीनें नमूद करणें आह्मांला अगत्याचें वाटतें, ती ही कीं, सर नारायण चंदावरकर ह्यांचें आमच्या तरूण पिढीकडे जितकें लक्ष आहे, त्यांच्या कल्याणाची ते जितकी आस्था दाखवीत असतात, त्यांना उद्देशून ते जितकीं व्याख्यानें देतात किंवा आपल्या व्याख्यानांत त्यांना उद्देशून जितका उपदेश करीत असतात, तितका दुसरा कोणीही पुढारी करीत असेल असें आह्मांस वाटत नाहीं. इतकें त्यांचें तरुणांकडे लक्ष्य आहे. स्टूडंट्स ब्रदरहूड ही संस्था उपयुक्त आहे, येथें अनेक तरुण कांहींतरी आपल्याला उपयुक्त ज्ञनाचा लाभ व्हावा ह्मणून दर आठवड्यास जमत असतात, असें पाहून सर नारायणराव स्वतः त्यांचे साप्ताहिक वर्ग शिकवूं लागले. आणि हा क्रम त्यांनीं सतत पांच वर्षेपर्यंत चालविला. आधींच वर्डस्वर्थ व टेनिसन ह्यांच्या काव्यांची त्यांना आवड, तशांतून आपल्या साहाय्याची अपेक्षा करणारा तरुणसमाज, असा योग जमल्यामुळें नारायणरावांनीं मोठ्या आनंदानें पांच वर्षें हें काम नियमितपणें केलें. तरुण मुलांच्या कल्याणाची त्यांना ज्याप्रमाणें काळजी आहे, त्याचप्रमाणें तरुण मुलींकडे त्यांचें लक्ष्य आहे. येथील स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीच्या शाळेंतील सातव्या इयत्तेंतील मुलींना दर शनिवारीं त्यांच्या शाळेंत जाऊन इंग्रजी विषय ते शिकवीत असत! न्यायाधिशाचें काम करून अनेक सार्वजनिक संस्थांची काळजी वहावयास त्यांस फुरसूद सांपडत तर असेच, पण वरील ह्या दोन वर्गांना आपल्या अनुभवाचा लाभ द्यावयास त्यांना

वेळ सांपडत असे! इतकें असून कितीही काम केलें तरी ते कधीं थकत नाहींत. ते तीन वर्षें येथील युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सलर होते. ही जागा बहुमानाची तर खरीच, परंतु आपल्या तरुण पिढीचें कल्याण करण्याची संधि आपल्या पुढें आली आहे, ती व्यर्थ न दवडणें हेंच आपलें कर्तव्य होय, ह्या भावनेनें ते तें काम पाहत असत. आणि त्यांच्या काळीं युनिव्हर्सिटींत जितक्या घडामोडी झाल्या, जितक्या सभा झाल्या, जितके वादविवाद झाले, जितक्या कमिट्या व पोट-कमिट्या नेमल्या गेल्या, तितक्या दुसऱ्या कोठल्याही व्हाइस चॅन्सलरच्या कारकीर्दींत नेमल्या गेलेल्या नाहींत. त्यांनीं व्हाइस चॅन्सलर ह्या नात्यानें जीं भाषणें केलीं, तीं जे कोणी अस्थापूर्वक वाचविला त्यांस सर नारायण यांचें तरुणांच्या कल्याणाकडे कसें सर्वदा लक्ष आहे, तें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. तरुणांच्या ठिकाणीं जागृति उत्पन्न करण्याचा त्यांचा सतत प्रयत्न असतो. आपल्या एका चिरस्मरणीय व्याख्यानांत ते ह्मणतात:—

"लोक काय म्हणतात त्याला भलतेंच महत्त्व देणें हा अविचार आहे. व्यक्तिमात्राचा श्रेष्ठतम धर्म जो आहे, तो हाच कीं, पूर्णपणें विचार करून जें कांहीं आपल्याला योग्य, सत्य, न्याय्य वाटेल तें कर्तव्यबुद्धीनें आचरणांत आणावयाचें, मग त्याच्यायोगें कोण राजी होतो व कोणाची इतराजी होते हा विचारच मनांत आणावयाचा नाहीं. ह्यालाच म्हणतात नीतिधैर्य. कर्तव्य नीतिधैर्यावर अवलंबून असतें, व त्याच्याचमुळें मनुष्याला मानवजातीची सेवा करण्याचें व सत्यशोधन करण्याचें धैर्य प्राप्त होतें. सुशिक्षित पुरुष ह्या नात्यानें तुम्हांला नेत्यांचा मान प्राप्त होणार आहे, ह्यासाठीं तरी निदान हा अमोलिक गुण मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हल्लीं आपल्या असें ऐकिवांत येतें कीं, सुशिक्षितांचें कर्तव्य, लोकमत सरकारापुढें मांडणें हें होय. हल्लींची प्रवृत्ति अशी आहे कीं, पुढा-

त्यांनीं लोकमताप्रमाणें वागावें. धुरीणत्व प्राप्त करून घेण्यासाठीं सुशिक्षित पुरुष साधारण जनतेच्या विरुद्ध वागण्यास भितात; व तिला वळण लावण्याच्या ऐवजीं आपणच वळले जातात. माझ्या मतें लोकमत प्रदर्शित करणें, हें सुशिक्षितांचें कर्तव्य नसून तें बनविणें व त्याला वळण लावणें, हें त्यांचें कर्तव्य आहे. लोक कोठें चुकत असतील तर त्यांची चूक त्यांना दाखविणें, त्यांच्या चुकीच्या चालीरीति सुधारण्याचा प्रयत्न करणें, हें त्यांचें कर्तव्य आहे. ज्यांना शिक्षणाचा प्रकाश मिळाला आहे, त्यांनीं जर तो इतरांना द्यावयाचा नाहीं, तर जनतेला मार्ग दाखविण्याचें काम कोण करील? जगाची प्रगति लोकाराधनेचा प्रयत्न करणाऱ्यांकडून झालेली नसून प्रसंगीं लोकांच्या विरुद्ध जे गेले, जे विवेकाला व परमेश्वराला साक्षी ठेवून कर्तव्य करिते झाले, त्यांच्यामुळेंच झालेली आहे. आम्हांमध्यें अशी बरीच लेखक मंडळी आहेत कीं, ती समाज व धर्मसुधारकांना लोकमत तुमच्या बाजूला नाहीं, लोकांना तुमची जरूरी नाहीं, असें सांगण्याचा आव घालते. त्यांना वाटतें कीं, आपण लोकांत मिसळून असलों, त्यांच्या मर्जीप्रमाणें भाषणें केली, त्यांच्या चालीरीतींची अंधभक्तीनें स्तुति केली म्हणजे आपण मोठें सत्कृत्य केलें, अशा प्रकारें वागून प्राप्त करून घेतलेल्या लोकप्रियतेचेंही मंडळी इतरांपुढें प्रदर्शन करीत असते."

त्यांचें तरुणांकडे इतकें जें लक्ष आहे, त्याचें मुख्य कारण असें आहे कीं, त्यांच्यामतें देशाला चांगली अगर वाईट स्थिति प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य तरुणांच्या ठायीं असतें. त्यांचें शील, त्यांचें कर्तृत्व त्यांचें ज्ञान, त्यांची उद्योगाची आवड, त्यांची सत्यप्रीति व न्यायबुद्धि त्यांचें आचरण, त्यांचें धार्मिक जीवन, त्यांचा विवेक ह्या सर्वांवर देशहित अवलंबून असतें, ह्याची जागृति सर नारायण ह्यांच्या ठायीं फार आहे. ती किती प्रबळ आहे, याची कल्पना लेखाच्या

द्वारें करूनही देतां येत नाहीं ! त्यासाठीं त्यांचीं भाषणें ऐकिलीं पाहिजेत, त्यांच्याशीं वारंवार संभाषणांचे योग जमवून आणिले पाहिजेत, म्हणजे मग तरुणांचें कल्याण, तरुणांचें हित व तरुणांच्या ठिकाणीं कर्तव्यनिष्ठा जागृत करण्याची आवश्यकता, ह्यांविषयीं त्यांना कशी चिंता लागून राहिलेली आहे, त्याची कल्पना होते. अशी त्यांच्या मनाची स्थिति नित्य असते, म्हणूनच आपल्या एका व्याख्यानाच्या अखेरीस कळकळीनें ते म्हणतातः—

" आपल्या ह्या देशावर मित्रहो, तुमचें जर खरें प्रेम असेल व तें आहे ह्याविषयीं मला बिलकुल संशय नाहीं, व आपल्या देशाची जर तुम्हांला काळजी असेल, आणि ती आहे अशी माझी खात्री आहे, तर आपल्या ह्या देशाला थोरपद प्राप्त करून देण्यासाठीं तुम्ही प्रथम आपली नैतिक व बौद्धिक उन्नति करा. मुत्सद्दी होण्याची हांव धरण्यापूर्वीं गुणसंपन्न पुरुष होण्याची हांव धरा. कर्त्तव्याचें उच्चत्तम ध्येय आपल्या पुढें ठेवून तें स्वावलंबनानें व नीतिधैर्याच्या साहाय्यानें प्रत्यक्ष कृतीमध्यें आणा. " अशा प्रकारें तरुण पिढीच्या कल्याणाविषयीं ते उत्सुकता दर्शवीत असतात.

## ( ३ )

## सर नारायण व धर्मविषयक सुधारणा.

" आम्ही सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्माच्या सुधारणेचा प्रश्न हा सर्व प्रकारच्या चळवळींना पायाभूत झाला पाहिजे, आणि लोकांच्या सुधारणेसाठीं त्यांच्या धर्मविषयक समजुतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न न करितां व धर्मास प्राधान्य न देतां दुसऱ्या मार्गानें प्रयत्न करणें म्हणजे विहरींतून चाळणीनें पाणी काढण्याच्या प्रयत्नासारखें निष्फळ होणारें आहे " असा सर नारायणरावांचा दृढ विश्वास असल्यामुळें, धर्मबुद्धीनें प्रेरीत होऊन सर्व

प्रकारच्या उद्योगास प्रारंभ झाला पाहिजे असें ज्या संस्थेचें ध्येय आहे त्या प्रार्थनासमाज नामक संस्थेशीं सर नारायणरावांचा अत्यंत निकट संबंध असणें, हें अगदीं साहजिक आहे. प्रार्थनासमाज ह्या संस्थेविषयीं लोकांमध्यें अनेक प्रकारच्या समजुती आहेत. त्यांचा येथें उल्लेख करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. परंतु प्रार्थनासमाजाच्या तत्वांची ओळख करून देणें जरूर आहे. कारण जीं तत्वें आपल्यापुढें ठेवून सर नारायणराव आजपर्यंत वागत आले आहेत. तीं अशीं आहेत:—

## प्रार्थनासमाजास मान्य असलेलीं धर्मतत्त्वें.

१ परमेश्वरानें हें सर्व जग उत्पन्न केलें. तोच एक खरा देव, त्याशिवाय दुसरा देव नाहीं. तो नित्य, ज्ञानस्वरूप, अनंत, कल्याणनिधान, आनंदमय, निरवयव, निराकार, एकच, अद्वितीय, सर्वांचा नियंता, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्ति, कृपानिधि, परमपवित्र, पतितपावन असा आहे.

२ केवळ त्याच्याच उपासनेच्यायोगें येथें व परलोकीं शुभ प्राप्त होतें.

३ त्याच्यावर प्रीति, पूज्यत्वबुद्धि व अनन्यभाव हीं ठेवून त्याप्रमाणें त्याचें मनानें भजन पूजन करणें व त्यास प्रिय अशीं कृत्यें करणें हीच त्याची खरी उपासना होय.

४ मूर्ति व इतर जड पदार्थ यांचीं पूजा किंवा प्रार्थना करणें हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे.

५ परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं, व कोणताही एक ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत किंवा सर्वांशीं प्रमाण नाहीं.

६ सर्व मनुष्यें एका परमेश्वराचीं लेकरें आहेत, म्हणून भेद न राखितां परस्परांशीं बंधुभावानें वागावें, हें ईश्वरास प्रिय आहे, आणि हें मनुष्याचें कर्तव्य आहे.

हीं तत्त्वें जे कोणी लक्षांत घेऊन त्यांवर शांतपणें विचार करितील त्यांस प्रार्थनासमाज ह्या संस्थेविषयीं निदान भ्रामक कल्पना तरी होणार नाहीं. कारण, प्रार्थनासमाज ह्या संस्थेचा उद्देश मुळीं असा आहे कीं, वर जीं तत्त्वें दिलीं आहेत, त्यांची प्रवृत्ति होऊन प्रपंचांतील सर्व कृत्यें त्यांस अनुसरून घडावीं. ह्या तत्त्वांविषयीं वादविवाद करण्याचें हें स्थळ नव्हे, परंतु एवढें मात्र येथें सांगितलें पाहिजे कीं, सर्व विचारी जनांना हीं सर्व तत्त्वें मान्य होण्यासारखीं आहेत, आणि जाणून बुजून अगर न जाणतां, आज कित्येक सुशिक्षित लोक ह्याच तत्त्वानुरोधानें वागत आहेत. असो.

आमचे चरित्रनायक सर नारायणराव यांचीं प्रार्थनासमाजाशीं कशी ओळख झाली तें ह्या लेखाच्या प्रारंभींच आम्हीं सांगितलें आहे. परंतु लहानपणापासून त्यांचा व समाजाचा जरी संबंध जडला होता व समाजांतील पुढाऱ्यांच्या सहवासांत ते कित्येक वर्षे जरी होते तरी सन १८८१ पर्यंत सभासद ह्या नात्यानें ते समाजांत दाखल झाले नव्हते. सभासद झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्यांनीं समाजाच्या चिटणीसाचें काम केलें व न्या. मू. रानडे यांच्या निधनानंतर आज तागाईत ते मुंबईच्या प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष आहेत. सर नारायण यांचीं बरीचशीं धर्मपर व्याख्यानें ह्या ग्रंथांत संकलित केलीं आहेत. तीं वाचून त्यांच्या आध्यात्मिक जीवनाची व त्याचप्रमाणें प्रार्थनासमाजानें जो आदर्श आपल्यापुढें ठेविला आहे, त्याची वाचकांस कल्पना होईल. परंतु त्यांच्या एकंदर उपदेशांतील कांहीं मुख्य मुख्य गोष्टींचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, वर दिलेलीं धर्मतत्त्वें

आपल्या नित्याच्या आचरणांत आणण्याचा सर नारायण यांचा जरी सतत प्रयत्न असतो, तरी त्यांच्या ठिकाणीं आपल्या आध्यात्मिक जीवनासंबंधानें अभिमान ह्मणून कसा तो नाहीं. सर्व प्रकारचे व्यवहार करीत असतांना प्रत्यक्ष परमेश्वराला आपल्या सांगातीं ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. पुष्कळांना वाटतें कीं, हें आपल्याला साध्य नाहीं. परंतु सर नारायणराव सागतांत कीं आम्हांससुद्धां 'आशेस पुष्कळ अवकाश आहे, आम्ही अगदींच निराश व्हावयास नको. आम्ही जरी कितीही पापी असलों, आमचीं अंतः-करणें कितीही कठिण, अगदीं पाषाणासारखीं झालेलीं असलीं, तरी सुद्धां प्रत्येकाच्या अंतःकरणांत परमेश्वराची दिव्य ज्योति वसत आहे. तिचा प्रकाश, तिचें तेज आमच्या कधीं तरी अनुभवास येतें.' 'परमेश्वराचें खात्रीचें वसतिस्थान असें जर कोठें असलें, तर तें मनुष्याचें अंतःकरण होय. ज्या ज्या वेळीं आपल्या हातून जें घडूं नये तें घडतें, आपण जें बोलूं नये तें बोलून जातों, त्या त्या वेळीं आमच्या अंतःकरणामध्यें गूढरूपानें असणारा तो लहान, शांत मंजूळ ध्वनि आमची निर्भर्त्सना करितो, किंवा आम्ही मार्ग चुकलों असें सांगतो. आमच्या हातून सत्कृत्य घडलें किंवा आम्ही लोभास बळी न पडतां, त्याचेवर जय संपादिला म्हणजे हा मंजुळ ध्वनि आमचे धन्यवाद गातो, आम्हांस उत्तेजन देतो, आह्मांस शाबा-सकी देतो.' म्हणून त्यांचें नित्य असें सांगणें असतें कीं, आपण पापी आहों, पापी आहों, असली जपमाळ हातीं धरून बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ते तर असें सांगतात कीं, मनुष्यप्राणी क्षुद्र आहे, दुर्बल आहे, असें म्हणतांना त्या क्षुद्रपणांतच त्याची महती आहे, हें विसरूं नका. श्रद्धा ठेवणें, प्रेम करणें, उच्च सात्त्विक आकांक्षा बाळगणें आणि दुःखपरंपरा सहन करणें, हीं ईश्वराचें सान्निध्य-संगती संपादण्याचीं शिफारसपत्रें आहेत. परद्वेष व स्वसुखाभिलाष

याचा मार्ग लांब जाऊं शकत नाहीं. केव्हां तरी मनुष्याला एकदां अशी वेळ येतेच कीं, द्वेषबुद्धि, विषयलोलुपता, आणि परपीडा आदिकरून पापकृत्यें यांच्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागतें, आणि अशा वेळीं पापकर्मांचा पश्चात्ताप झाला असतां त्याची दृष्टि परमेश्वराकडे वळते. ईश्वरी प्रेमाची त्याला तहान लागते, अंतर्बाह्य भरलेल्या परमेश्वराला तो हुडकूं लागतो, परमेश्वराची महति त्याला दिसूं लागते. त्याला समाधान पाहिजे असतें व तें प्राप्त होण्यास परमेश्वरावांचून दुसरा आधार नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री पटते. अखेरीस तें समाधान त्याला प्राप्त होतें. कारण प्रेम अमर्याद आहे. प्रेमरूप अमृताच्या सागरामध्यें बुडून मृत्यु येत नाहीं. प्रेमाचा परिणाम झाल्याखेरीज राहत नाहीं, प्रेमाचा कधीं वीट येत नाहीं. मात्र हें प्रेम दैवी पाहिजे—ईश्वरावर जडलें पाहिजे.

वर प्रार्थनासमाजाचीं धर्मतत्त्वें आंम्हीं दिलीं आहेत. तीं माहित असणारांचा व नसणारांचा असा समज असतो कीं, /प्रार्थनासमाजाला आपल्या धर्मग्रंथांचा, आपल्या पूर्व ऋषींचा, त्यांनीं प्रतिपादिलेल्या तत्त्वांचा कांहींही अभिमान नाहीं, हें सर्व पाश्चात्यांचें केवळ अनुकरण आहे. प्रस्तुत संग्रहांतील व्याख्यानें वाचण्याची जे कोणी मेहनत घेतील, त्यांस हा समज वस्तुस्थितीस पूर्णपणें सोडून कसा आहे, तें अगदीं सहज कळून येईल. सर नारायणराव आपल्या एका व्याख्यानांत निक्षून सांगतात:—

प्रार्थना व ब्राह्मसमाजांतील भागवतांस असें आज वाटत आहे कीं, पुरातन काळाची कोणतीहि राजकीय, सामाजिक अगर धर्मविषयक संस्था एखाद्या सुधारकाला, अगर सुधारकांना, जशीच्या तशी आज उठवितां येईल, असें म्हणणें अगदीं अन्यथा आहे. ह्या काळच्या जुन्या संस्थांच्या संजीवनाचा किंवा पुनर्जीवनाचा विचार करणें व्यर्थ आहे. पूर्वींचें जें कांहीं आहे, त्याचा आज सर्वस्वी

त्याग करितां येणें ज्याप्रमाणें अशक्य, त्याप्रमाणें इतर धर्मांचे जे प्रवर्तक त्यांच्याकडे अगदींच दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. पूर्वींचे कित्येक सुंदर विचार, आचार व संस्थाही, विलक्षण धर्मभोळेपणाच्या वेष्टणांनीं अगदीं झांकून गेलेल्या आहेत; आणि न्या. मू. रानडे यांनीं सामाजिक परिषदेतील आपल्या व्याख्यानांत म्हटल्याप्रमाणें आपण तर आज असा काळ पाहत आहों कीं, ज्यावेळीं आपलें एकंदर जीवन विस्तृत झालें पाहिजे, त्यास अधिकाधिक विस्तृत होण्यास अवकाश ठेविला पाहिजे. पूर्वींचे सिद्धान्त व मार्ग जितक्या अंशानें त्यांत सत्यांश आहे, तितक्या अंशानें ठीक आहेत. आणि त्या सत्यांशाचा परम आदरानें स्वीकार करून भावी सुधारणायुग अवतरणार आहे. तथापि आज जी परिस्थिति आहे, तीस अनुरूप अशी पूर्वींच्या मार्गांची घडी बसविली पाहिजे. आमच्या गरजांचा विचार झाला पाहिजे. असें झालें तरच सुधारणेच्या कामीं त्यांचा कांहीं उपयोग होण्याचा संभव आहे. खरें पाहिलें तर भक्तिपंथाचे जे प्रवर्तक त्यांचे विचार, त्यांचे उपदेश, त्यांच्या आकांक्षा सर्व कांहीं पवित्र जीवनास पोषक अशा आहेत, परंतु हें मात्र खरें कीं, आमचे साधुसंत जगाला, संसाराला अगदीं कंटाळलेले होते, व त्यांची अशी शिकवण आहे कीं, हें सर्व व्यर्थ आहे, ही माया आहे, म्हणून संसाराचा त्याग केला पाहिजे; तरच आपली घडगत. आपण दैवावर सर्व हवाला ठेवून असलें पाहिजे; प्रयत्नशील असावयाची कांहीं आवश्यकता नाहीं, असा सर्वसाधारण समज आहे. म्हणून आजच्या व भावी सुधारकाला जें कांहीं करावयाचें आहे, तें हें कीं, ज्या विश्वांत आपण नांदत आहों, त्याचा हेतु काय, त्याचा व आपला संबंध काय, हें सांगून लोकांच्या असेंही लक्षांत आणून द्यावयाचें कीं, आपण जर सन्मार्गानें चाललों, प्रामाणिकपणें वागलों, देवाची व पापाची भीति मनांत

वागवून वर्तलों व सत्कृत्यांत वेळ घालविला, तर आपल्याला आपला स्वर्ग हा येथें, आपल्या हयातींत सांपडेल. म्हणूनच न्या. मू. रानडे व त्यांचे मित्र ज्या पक्षाचे आहेत त्या पक्षाचा नित्याचा मंत्र संजीवन नसून सुधारणाप्रगति आहे. सारांश, राजा राममोहनरायांचाच अनुवाद करून सर नारायणराव सांगत आहेत कीं, आपले धर्मग्रंथ आस्थेनें वाचा, त्यांची हेळसांड करूं नका; त्यांची काय शिकवण आहे ती पहा व तसें करित असतांना आपल्याला जें सारासार विचारसामर्थ्य देवानें दिलें आहे त्याचा उपयोग करा व देवासंबंधानें आपलें काय कर्तव्य आहे याचा विचार करून शास्त्रांच्या आज्ञा पाळा. पुष्कळांना प्रार्थनासमाज-मंदिरांतून ज्या उपासना होत असतात, त्या वेळीं काय होत असतें त्याची कांहींच कल्पना नसते. मग ते कांहीं तरी कल्पना करून तर्क चालवित असतात. अशांच्याच माहितीसाठीं सर नारायणराव म्हणतात कीं, ह्या ठिकाणीं डॉ० भांडारकर किंवा न्या. मू. रानडे ह्यांच्या सारखीं व इतर कमी अधिक अधिकाराचीं माणसें, आपल्या व इतर धर्मग्रंथांतील वचनांच्या आधारें धर्माचीं प्रमेयें व आपला नित्याचा व्यवहार यांचा कसा निकट संबंध आहे, व त्यांचा आपल्याला आपल्या नित्याच्या संसारांत कसा उपयोग करितां येईल, हें सांगत असतात. त्याचप्रमाणें सत्यनिष्ठा, व्यवहारांतील प्रामाणिक-पणा, आपापसांतील नेकीचे व्यवहार, दीनांविषयीं अंतःकरण कळवळून त्यांच्या साहाय्यासाठीं धांवणें, व कितीही थोर माण-साशीं संबंध आला तरी न्याय व सत्यनिष्ठेपासून मुळी सुद्धां न ढळणें ह्या सर्व गोष्टींचा धर्मामध्येंच कसा अंतर्भाव होत असतो, हेंही नित्य त्यांच्या सांगण्यात येत असतें. वरील सर्व विवेचनावरून सर नारायणराव ज्या संस्थेचे एक सभासद गेलीं ३२ वर्षें आहेत व ज्या संस्थेशीं त्यांचा फार निकट संबंध गेलीं ४० वर्षें आहे, त्या

प्रार्थनासमाज संस्थेचें ध्येय काय आहे, व त्या संस्थेच्याद्वारें कोणत्या प्रकारचा उपदेश होत असतो त्याची स्पष्ट कल्पना वाचकांस झाली असेलच, पण हें विवेचन पाहून कोणास असेंही वाटण्याचा संभव आहे की, सर नारायणराव ह्यांच्या ठिकाणीं आपल्या संस्थेच्या प्रवर्तकांतील न्यूनांची जागृति नाहीं. हा समज अगदी निराधार आहे. त्यांच्या स्वतःच्या ठिकाणीं स्वदोषजागृति अत्यंत प्रखर स्वरूपानें आहे. आत्मपरीक्षण करा, आत्मपरीक्षण करा, असला उपदेश करून ते कधींही स्वस्थ बसणारांपैकीं नाहींत. त्यांचें आत्मपरीक्षण नित्य चालू असतें. फिरावयास जातात तेव्हां एकादा ग्रंथ वाचून त्यावर ते मनन करितात आणि इतर शांत वेळीं व स्थळीं त्यांचें स्वतःविषयींचें परीक्षण नित्य चालू असतें. तें इतकें प्रखर असतें कीं, आपल्या हातून कांहीं आगळिक झाली असा त्यांचा समज झाला, कोणास लागण्यासारखें आपण बोललों असें त्यांच्या लक्षांत आलें कीं, सर्व गैरसमज दूर करून घेतल्यावांचून ते स्वस्थ बसत नाहींत. आपली चूक झाली असल्यास ते ती कबूल करावयास एका पायावर तयार असतात; मग त्यासाठीं आपलें घर आपलें काम सोडून ते त्या माणसांकडे जाऊन आपलें काय म्हणणें आहे, तें सांगावयास सिद्ध असतात. अशी ज्यांची नित्याची वृत्ति आहे त्यांच्या ठिकाणीं आपल्या समाजांतील जे प्रमुख त्यांच्या दोषांची जागृति नाहीं असें कदापि होणें नाहीं. उलट एके ठिकाणी ते म्हणतात ‘ एका लहानशा संस्थेचा मी मोठा बडेजाव सांगत आहें. असें माझे कित्येक मित्र म्हणतील, हें मी जाणून आहें; संख्येनें आम्ही अगदीं अल्प आहों व आमच्यापुढें जें ध्येय आहे, जीं तत्त्वें आहेत, त्यांस अनुरूप आमचें आचरण नसतें, ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे हेंही मी कबूल करितों. आमचें जें उच्चतम ध्येय त्यास शोभण्यासारखें आमचें आचरण नसतें, हें जरी खरें आहे; तरी

आमची दृष्टि पुढील काळाकडे आहे. त्या काळासंबंधानें आमच्या ष्या अपेक्षा त्या स्वप्नवत् होत, असें जरी कित्येकांस वाटलें, तरी त्या काळीं आमच्या आशा फलद्रूप होणार;अशी आमची खात्री आहे.'

सर नारायण चंदावरकर यांचीं व्याख्यानें जे आस्थापूर्वक वाचतील व ज्यांनीं त्यांच्या आजपर्यंतच्या चरित्राचें अवलोकन केलें आहे, त्यांच्या हें लक्षांत आलेंच असेल कीं, नारायणराव हे निराशावादी बिलकुल नाहींत. निराशाजनक जरी कधीं स्थिति असली, तरी पुढील प्रकाशाचीं हीं सर्व चिन्हें आहेत, असा त्यांचा नित्य कटाक्ष असतो व असा उपदेश त्यांनीं ह्या व्याख्यानांत जागोजाग केलेला आढळेल. दुसरें, आपले थोर पुरुष ह्यांच्याविषयीं त्यांची भक्ति किती आहे, ह्याची साक्ष हीं व्याख्यानें जागोजाग देत आहेत. त्यांचें तरुण पिढीस असें आग्रहानें सांगणें आहे कीं, तरुणांनीं थोर पुरुषांविषयीं आपल्या ठिकाणीं उत्कट आदरभाव ठेवावा हें ठीक आहे. परंतु असे पुरुष आपल्याला रोज मार्गदर्शक असावयास पाहिजेत, असा कां एकदां समज झाला कीं, मग आपण सर्वस्वीं त्यांच्यावर अवलंबून रहावयास शिकतों. आपला आपलेपणा जातो, आपण आपलें सारासारविचार करण्याचें सामर्थ्य गमावून बसतों! कारण, आपल्यासाठीं विचार करण्याचें सर्व काम आपला मार्गदर्शक करीत असतो! पण आपल्या स्वतःच्या ठिकाणीं जो थोरपणाचा अंश आहे, त्याच्याविषयीं विचार न करितां, त्याची जोपासना न होतां व त्याच्या वाढीचा प्रयत्न न होतां, सभोंवतालच्या मोठ्या लोकांच्या थोरपणांत आपण गढून जाऊन आपणास पंगू करून घेत असतों! ह्मणून सर्वस्वीं थोरपुरुषांवर अवलंबून राहूं नका, असें सांगतांना सर नारायणरावांनीं पुढील उद्गार काढले आहेतः—

This world can go on by us, by you and me. We are the bulk of the world and God has not been so

ungenerous as to leave us entirely at the mercy of the great man. The world has to be carried on by average men......It is we who have to carry on its business. Let us see that we get planted in us those powers by the development of which we can do what lies in our power in order to make the world move onwords, and towards the goal which we have all at heart.

असो. अशा प्रकारचीं ध्येयें आपल्यापुढें ठेवून वर्तण्याचा सर नारायणराव यांचा प्रयत्न आहे. त्यांचें पवित्र आचरण, त्यांची विद्वत्ता, त्यांचा साधेपणा, त्यांची कर्त्तव्यनिष्ठा, त्यांची उद्यमशीलता, त्यांचा विश्वास, त्यांची धर्मनिष्ठा, त्यांचा करारीपणा, त्यांचा प्रेमळ स्वभाव, त्यांची देवाच्या समागमांत राहण्याची आवड, इ. सर्व गुण सर्वांना विशेषतः तरुणांना अत्यंत अनुकरणीय असे आहेत. पुष्कळ लोक असे असतात कीं, ते धर्माच्या प्रमेयांवर लांब लांब गप्पा मारीत असतात. लोकां सांगे ब्रह्मज्ञान व स्वतःसंबधानें त्याच्या पुढली स्थिति, असा खेदजनक प्रकार पुष्कळांत आढळतो. सर नारायणराव चंदावरकरांस हा दोष केव्हांही लावतां येणार नाहीं. धर्मसाधनाविषयीं बसतां उठतां ते उपदेश करीत नाहींत, पण त्यांचें धर्मसाधन नित्य चालू असतें. त्यांचें प्रातःस्मरण, नित्य मनन, वाचन, प्रार्थना व नामस्मरण ह्यांस कधीं ते खळ पडू देत नाहीं. प्रार्थनेवर त्यांचा अत्यंत दृढ विश्वास आहे. ते म्हणतात आपल्या ज्या कांहीं मानासिक यातना असतील, त्या परमेश्वरास निवेदन कराव्या; तो आपला पाठिराखा आहे. तो आपल्याला संकटांतून मुक्त करावयास सिद्ध आहे, प्रेमाचें भातुकें हातीं घेऊन जणूं काय उभा आहे. पण संशयानें वेढलेले, काळज्यांनीं भंडावलेले, भ्रामक कल्पनांनीं वेडे झालेले जे आम्ही ते

त्याजपाशीं जात नाहीं, आपलें हृद्गत त्यास निवेदन करीत नाहीं. जेव्हां आपण तसें करितों, सर्व भरंवसा परमेश्वरावर टाकतो, सामर्थ्याची अपेक्षा त्याजपासून करितों तेव्हां आपल्याला निःसंशय समाधान प्राप्त होतें, शांति प्राप्त होते, उल्हास व उत्साह लाभतो व कर्तव्य करण्यास आपण प्रवृत्त होतों, असा सर नारायणरावांचा दृढ विश्वास आहे.

अशा अनेक गुणांनीं युक्त आमचे जे चारित्रनायक सर नारायणराव ते आपलें चारित्र, आपला अनुभव, आपली धर्मनिष्ठा ह्यांही करून आज इंदुर संस्थान उन्नतदशेस आणण्यासाठीं झटत आहेत; आपल्या पवित्र आचरणानें ते तेथील प्रजाजनांस आदर्शभूत होत आहेत; आपल्या साधेपणानें लोकांचें त्यांच्यावर प्रेम बसत आहे. आपल्या धर्मनिष्ठेनें तें इतरांस धर्मनिष्ठ करीत आहेत, धर्माचा आस्थापूर्वक विचार करावयास लावीत आहेत व ह्या सर्व कामीं त्यांस आपल्या प्रिय पत्नीचें पूर्ण साहाय्य आहे. त्यांच्या सर्व सत्कृत्यांस श्रीमति सौ. लेडी लक्ष्मीबाईंची जागृत सहानुभूति आहे. आपल्या पतिराजांची कर्तव्यनिष्ठा पाहून त्यांची कर्तव्यनिष्ठा वाढली आहे. पतीचे अनेक गुण त्यांनीं आपलेसे केले आहेत व सर्व संसार व बाहेरचीं कित्येक परोपकाराचीं वगैरे कामें त्या उत्तम प्रकारें संभाळीत आहेत, त्यामुळें सर नारायणराव ह्यांस जोखमाचीं, काळजीचीं कामें करावयास पूर्ण अवसर सांपडत आहे. परमेश्वरानें नारायणरावांस दीर्घायु करावें, त्यांच्या सहवासाचा, त्यांच्या ज्ञानाचा, त्यांच्या धर्मनिष्ठेचा, त्यांच्या बोधामृताचा आम्हांस अधिक लाभ घडवून द्यावा, अशी परमेश्वरापाशीं लीनपणें प्रार्थना करून आम्ही वाचकांची रजा घेतों.

---

# सर नारायण गणेश चंदावरकर यांचीं व्याख्यानें.

## " जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ! "*

### ( १ )

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।
चालविसी हातीं धरोनियां ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार ।
चालविसी भार सवें माझा ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट ।
नेली लाज धीट केलों देवा ॥
अवघे जन मज झाले लोकपाळ ।
सोइरे सकळ प्राणसखे ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें ।
जालें तुझें सुख अंतर्बाह्य ॥

साधुवर्य **तुकोबांच्या** ह्या अभंगामध्यें किती उत्साह, किती आशापूर्ण वृत्ति व समाधानवृत्ति दिसून येत आहे ! परमेश्वराच्या स्तुतिपर असा हा एक फार सुंदर अभंग आपल्याला लाभला आहे. परमेश्वराचें सानिध्य, परमेश्वराचा सहवास **तुकोबांस** घडला, आणि त्यानंतर त्यांच्या मनावर जो अत्यंत शुभ परिणाम झाला, तो त्यांनीं ह्या अभंगांत वर्णिला आहे. अभंग तर दिसावयास अगदीं साधा

* **टीप**—ह्या अभंगाच्या आधारें एकंदर ७ व्याख्यानें झालीं तीं क्रमानें पुढें दिलीं आहेत.

आहे. ह्या अभंगामध्यें जी शांतीची, जी समाधानाची वृत्ति आपल्याला आढळून येते, ती तुकोबांस नेहमींच लाभ नसे व ती कांहीं त्यांस एकाएकीं प्राप्त झाली, असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांचें धर्मजीवनरूपी आकाश नेहमींच निरभ्र असे, नेहमींच स्वच्छ असे, असें नाहीं. पुष्कळ प्रसंगीं काळींकुट्ट अभ्रें ह्या आकाशांत आलीं आहेत; इतकीं कीं, त्यांच्यामुळें त्यांस सर्व प्रदेश अंधारमय भासला आहे व जणूं काय त्यांस गुदमरल्यासारखें झालें आहे! किती तरी प्रसंगीं त्यांनीं आपली निबिड निराशेची स्थिति व्यक्त केली आहे; किती तरी अभंगांमध्यें त्यांनीं आपली निर्भर्त्सना केली आहे; आणि अनेक अभंगांमध्यें आपली दुबळेपणाची, पापसांमुख्याची स्थितिं त्यांनीं वर्णिली आहे. आपला भाव दुबळा आहे, आपलें अंतःकरण शुद्ध झालेलें नाहीं, आपण अगदीं पापपंकामध्यें रुतून गेलेलों आहों, खरा पश्चात्ताप कांहीं होत नाहीं, हें मन कांहीं विमल होत नाहीं आणि देवाला कांहीं आपली दया येत नाहीं, व तो कांहीं आपल्याला दर्शन देत नाहीं, अशी संपूर्णपणें निराशेची, निरुत्साहाची स्थिति ज्यांत त्यांनीं वर्णिली आहे, असेही तुकोबांचे अनेक अभंग आहेत.

परंतु जेव्हां तुकोबांना परमेश्वराचें साक्षात् दर्शन झालें, सर्वत्र परमेश्वराचें त्यांस दर्शन होऊं लागलें, परमेश्वराच्या सर्वत्र दिसणाऱ्या मंगल भावाचा, मंगल योजनेचा, मंगल सामर्थ्याचा त्यांना अनुभव आला, तेव्हां पूर्वींची त्यांची निराशा, त्यावेळचे त्यांचे अनुभव त्यांस उपयोगी पडले. ज्यांना आपल्या आध्यात्मिक जीवनभूमीमध्यें दिवसेंदिवस उच्चतर अनुभव यावेत असें वाटत होतें, आणि जें सौंदर्य, जी शोभा, जो अनुभव येथील अनेक सुंदर देखावे पाहूनही येणें नाहीं तो आपणास यावा, अशी ज्यांची मोठी इच्छा त्या तुकोबांसारख्या भक्तजनांना वरीलप्रमाणें निराशादर्शक प्रसंग अनुभवावे लागले.

प्रसंगीं त्यांची पूर्ण निराशा झाली, तरी त्यांत कांहीं आश्चर्य मानावयास नको. अर्थात् सतत परमेश्वराचा आपल्याला सहवास घडावा, त्या समागमाच्या आनंदामध्यें आपला काल जावा, अशी ज्यांची मोठी इच्छा असते, त्यांस वरीलप्रमाणें निरनिराळ्या प्रकारचे अनुभव आले, तर कधीं त्यांची वृत्ति क्षुब्ध, कधीं अगदीं निराशेची, कधीं आशापूर्ण अशी झाली तर त्यांत नवल तें कसलें? हा सर्व त्रास, ह्या यातना, वेदना, प्रसंगीं लोकांकडून होणारा उपहास, घरांतील त्रास वगैरे, पुढें होणाऱ्या लाभापुढें कांहींच नाहींत !

अशा प्रकारच्या अनुभवामुळें **तुकोबांस** अत्यंत उन्नत अशी स्थिति प्राप्त झाली म्हणून तर त्यांच्या ह्या व अन्य अभंगांच्या द्वारें त्यांच्या त्या अनुभवाचा आपल्याला लाभ घडत आहे. **तुकोबां**सारख्या साधूंना जर अशा प्रकारचे अनुभवच आले नसते, त्यांच्याद्वारें त्यांना बोध प्राप्त झाला नसता, व तो अनुभव व बोध आपल्या अभंगांच्या रूपानें त्यांनीं जर मागें ठेविला नसता, तर आज आपणांस त्यांच्या धर्मजीवनाची कल्पनाच झाली नसती. असो.

एकदां **महंमद** आपल्या कित्येक अनुयायांसह **अरबस्थानां**तून प्रवास करीत असतां एके रात्रीं भव्य, निरभ्र, अनेक तारकांनीं प्रकाशित झालेलें आकाश अवलोकून, परमेश्वर जणूं काय वर आकाशांत राहत आहे, असें वाटून एक अनुयायी म्हणाला, 'हे अल्ला, ह्या भूतळीं अवतीर्ण हो.' तो शांत व गंभीर प्रसंग अनुभवीत असतां **महंमदा**च्या मनावरही इष्ट असाच परिणाम झाला होता; परंतु त्याचा अनुभव निराळ्या प्रकारचा असल्यामुळें तो म्हणाला, 'बाबारे, असें काय म्हणतोस? **अल्ला** नेहमींच आपल्याबरोबर असत नाहीं काय?' असाच अनुभव **पॉल** साधूनें आपल्या एका पत्रांत ग्रथित करून ठेविला आहे. परमेश्वर जर तुला हातीं धरून नेत

असला, तर खरोखरच तूं बंधमुक्त आहेस. त्याच्या सहवासाचें फल म्हणजे प्रेम, आनंद, शांति, विनय, चांगुलपणा व दृढ विश्वास हें होय, असें त्यानें म्हटलें आहे.

अर्थात् आतां आपल्यापुढें सहज असा प्रश्न येऊन उभा राहतो कीं, तुकाराम, पॉल, महंमद, वगैरे साधुसंतांना हा अनुभव कसा प्राप्त झाला ? याचें उत्तर अगदीं साधें आहे. आपल्याला स्वातंत्र्य मिळावें, सत्ता प्राप्त व्हावी, अधिकार लाभावा, एतदर्थ त्यांनीं कांहीं प्रयत्न केले नाहींत, तर त्यांनीं परमेश्वराची आज्ञा प्रमाण मानणें, हें व्रत पाळिलें. परमेश्वराच्या इच्छेपलीकडे आपली इच्छाच नाहीं, अशी त्यांनीं पक्की गांठ बांधिली व आपल्याला सर्व प्रकारें परमेश्वराच्याच चरणीं वहावून घेतलें. कित्येक लोक विशेष प्रसंग व परिस्थिति ह्यांच्या द्वारें परमेश्वराच्या दर्शनाची किंवा साक्षात्काराची अपेक्षा करीत असतात. कोणाला विश्वांत दृग्गोचर होणाऱ्या अनेक प्रकारच्या सौंदर्याच्या द्वारें त्याचें दर्शन होत असतें. परंतु परमेश्वराचें खात्रीचें वसतिस्थान असें जर कोठें असलें तर तें मनुष्याचें अंतःकरण होय. ज्या ज्या वेळीं आपल्या हातून जें घडूं नये तें घडतें, आपण जें बोलूं नये तें बोलून जातों, त्या त्या वेळीं आमच्या अंतःकरणामध्यें गूढरूपानें असणारा तो लहान, शांत मंजूळ ध्वनि आमची निर्भत्सना करितो, किंवा आम्ही मार्ग चुकलों असें सांगतो. आमच्या हातून सत्कृत्य घडलें किंवा आम्ही लोभास बळी न पडतां, त्याचेवर जय संपादिला म्हणजे हा मंजुळ ध्वनि आमचे धन्यवाद गातो, आम्हांस उत्तेजन देतो, आम्हांस शाबासकी देतो. ह्या साधुसंतांना परमेश्वराचें दर्शन झालें, देवाच्या सांनिध्याचा लाभ झाला, ह्याचें कारण ते ह्या मंजुळ ध्वनीच्या आज्ञेंत राहिले, त्याच्या उपदेशानुसार त्यांनीं वर्तन ठेविलें. त्यांना प्राप्त झालेला आनंद, त्यांची शांति, त्यांचा धर्मानुभव आमचासा व्हावा

असें आम्हांला वाटतें खरें, परंतु दुसऱ्यास आम्हीं दिलेलीं मर्मभेदक उत्तरें, आमची दुष्टोक्ति, इतरांविषयींचे आमचे अनुदार विचार, इतरांशीं झालेलें आमचें अन्यायाचें वर्तन, आमचीं मनें त्रस्त करणारी ह्या सर्वांची छाया, किंवा हीं कृत्यें मूर्तिमंत आमच्या पुढें उभीं राहून आम्हांस त्या शांतीचा, त्या सुखाचा लाभ होऊं देत नाहींत; परंतु साधुसंत आमच्यासारखे लेचेपेंचे नव्हते. ते मोहास वश झाले नाहींत. त्याजवर त्यांनीं जय मिळविला व म्हणून परमेश्वराच्या पितृवात्सल्याचा त्यांस प्रत्यक्ष अनुभव आला.

परंतु आमच्या सारख्यांना सुद्धां आशेस पुष्कळ अवकाश आहे; आम्ही कांहीं अगदींच निराश, हताश व्हावयास नको. आम्ही जरी कितीही पापी असलों, आमचीं अंतःकरणें कितीही कठीण अगदीं पाषाणासारखीं झालेलीं असलीं, तरीसुद्धां प्रत्येकाच्या अंतःकरणांत परमेश्वराची दिव्य ज्योति वसत आहे व तिचा प्रकाश, तिचें तेज, आमच्या कधींतरी अनुभवास येतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हा मंजुळ ध्वनि कधीं कधीं आमचें जीवन मधुर करीत असतो, हें तर अनुभवसिद्धच आहे.

आपल्याला **फादर म्याथ्यू**ची गोष्ट बहुतकरून माहीत असेलच. मद्यपानाविरुद्ध हे गृहस्थ मोठी खटपट करीत व अनेक कुटुंबें त्यांनीं मद्यपानामुळें होणाऱ्या भयंकर परिणामापासून वांचविलीं होतीं. एके दिवशीं एका दारुड्याची बायको **फादर म्याथ्यू**कडे आली व त्यांस अत्यंत केविलवाण्या रीतीनें विनवून तिनें सांगितलें कीं, 'माझा नवरा अतिशय दारूबाज झाला आहे, घरांत सारखी मारहाण चाललेली असते; मुलें भुकेनें व्याकूळ होऊन त्यांचा प्राण कंठीं आला आहे, तरी ह्याचें व्यसन कांहीं सुटत नाहीं. आपण आमच्या घरीं येऊन त्याला कांहीं दोन गोष्टी सांगा.'

**फादर म्याथ्यू** गेले. गांवामध्यें त्यांची चांगली प्रसिद्धि झालेलीच होती. त्यांस आपल्या घरीं येतांना पाहून दारुबाजाची स्वारी चवताळली व त्यांच्यावर शिव्यांची लाखोली सुरू झाली! तीस हे कसली दाद देतात! त्यामुळें दारुबाजाला अतिशय त्वेष आला, व एक पाऊल तर पुढें टाक व आपल्या व्याख्यानाला प्रारंभ कर, म्हणजे एकाचे दोन **फादर म्याथ्यू** करतों कीं नाहीं पहा; अशी धमकावणीही तो देऊं लागला! हा काय विलक्षण प्रकार असें वाटून मुलें मोठमोठ्यानें रडूं लागलीं व त्यांची दीन आई, ती गाय, हें काय आपण नवीनच संकट **फादर म्याथ्यू**वर आणिलें, म्हणून केविलवाण्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहूं लागली. पण, तिच्या नवऱ्याच्या ह्या दरडावण्याचा **फादर**वर कांहींच परिणाम झालेला दिसला नाहीं. त्यांनीं जवळच जें अगदीं घाणेरडें शेंबडें आणि उघडें पोर होतें, त्यास मोठ्या प्रेमानें जवळ उचलून घेऊन अत्यंत प्रेमानें त्याचें चुंबन घेतलें व त्यास खालीं ठेविलें! त्याबरोबर काय चमत्कार झाला पहा! त्या दारूबाजाच्या अंत:करणांत असलेल्या ज्योतीचा तेथें लख्ख प्रकाश पडला, तो जणूं काय जागृत झाला, व म्हणाला, "काय, त्या माझ्या शेंबड्या, घाणेरड्या, भुकेनें व्याकूळ झालेल्या पोराला तुम्हीं जवळ घेऊन त्याचें मोठ्या प्रेमानें, मी जो त्यांचे नित्य हाल करीत आहें त्याच्या समोर चुंबन घ्यावें! खरोखर परमेश्वर आहे आणि तो प्रेममय आहे, ह्यांत कांहीं संशय नाहीं." ह्या माणसाचें व्यसन पुढें सुटलें, हें निराळें सांगावयास नकोच.

**तुकोबां**च्या ह्या अभंगामध्यें जें कांहीं माधुर्य आहे, जो कांहीं पवित्रपणा आहे, जें कांहीं सामर्थ्य आहे त्याची फोड आज माझ्या मनाप्रमाणें माझ्या हातून झालेली नाहीं. आपण ह्या अभंगा-संबंधानें विचार करूं लागलों म्हणजे मनामध्यें अनेक प्रकारचे

विचार येतात. एखाद्या वाटाड्यानें आपणाला उंच पर्वताच्या शिखरावर घेऊन जावें व तेथें गेल्यावर सभोंवतालचा रम्य देखावा, पक्षी, नद्या, तळीं, सरोवरें ह्यांच्या द्वारें अनेक प्रकाराच्या सृष्टि-सौंदर्याचें आपल्याला ज्ञान व्हावें, आपलें मन त्या सौंदर्यांत, त्या वैभवांत मग्न होऊन जावें व आपण स्वर्गामध्येंच आहों असें आपणांस वाटावें, तशाच प्रकारचा अत्यंत सुखाचा, आनंदाचा परिणाम ह्या अभंगाच्या चिंतनानें मनावर होत असतो. मला फार तर आपल्या स्वतःचा अल्पसा अनुभव—व तोही अस्पष्ट रीतीनें—आपल्या पुढें ठेवितां येईल. ह्या अभंगामध्यें जें कांहीं सामर्थ्य आहे, जें कांहीं सौंदर्य आहे, तें सर्व आपल्यांला स्पष्ट करून दाखविण्याचें सामर्थ्य मजमध्यें नाहीं. एके दिवशीं पहाटेस मी माझ्या बिछान्यावर पडून असतां आकाशांतील एक तेजःपुंज तारा प्रकाशिलेला पाहून ह्या अभंग मीं म्हटला, तो मी जसजसा पुन्हा पुन्हा म्हणूं लागलों तसतसा माझ्या मनावर त्याचा अधिकाधिक शुभ परिणाम होऊं लागला, तो इतका कीं, त्या दिवसाची, त्या परिणामाची व त्या सुखमय अनुभवाची मला अद्याप चांगली आठवण आहे व ती स्मृतीही चित्तास आल्हाददायक व उत्तेजक अशी वाटते. आपल्याला देखील ह्या अभंगाच्या सामर्थ्याचा अनुभव यावा, असें वाटत असेल, तर आपणही प्रातःकालच्या समयीं, ज्यावेळीं झोंप पुरी झालेली असेल, पक्षांचें मधुर गायन सुरू झालें असून ज्या वेळीं आपल्या निद्रेंतून ही सृष्टिदेवताही जागृत होत असते अशा वेळीं तो म्हणा, वारंवार गा, त्याच्याविषयीं शांतपणें विचार करा, त्याच्या अर्थाकडे लक्ष द्या, म्हणजे त्या अभंगांतील मधुर भाव आपल्या अंतःकरणास गोचर होईल, त्याचें माधुर्य आपल्या लक्षांत येईल व ह्या अभंगामध्यें किती आध्यात्मिक बोध आहे, याची साक्ष आपलें अंतःकरणच आपल्याला देईल.

## ( २ )

## " देवच आपला आधार. "

लंडन येथील हायकोर्टांत एकदां एका फौजदारी खटल्याची चौकशी झाली. या खटल्याकडे लोकांचें फार लक्ष्य लागलें होतें व लोकांमध्यें त्यासंबंधानें बरीच चळवळहि उडाली होती. या खटल्यांतील आरोपी **क्रिपन** नांवाचा एक इसम असून त्याच्यावर आपल्या बायकोचा खून केल्याचा आरोप होता. खटल्याची हकीगत अंगावर शहारे आणणारी आहे आणि लोकांच्या स्मरणांतून ती गोष्ट जात आहे, हें एक परीं बरेंच आहे. तथापि, त्या खटल्यापासून इतरांना बोध घेतां येण्यासारखा आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, **क्रिपन**वरील आरोप असा होता कीं, एका मोहक तरुणीवर त्याचें प्रेम बसलें व त्या उभयतांचा अनीतिसंबंध जडला आणि शेवटीं त्यानें आपल्या बायकोचा खून केला. पुढें त्या तरुणीस बरोबर घेऊन व तिला पुरुषाचा वेष देऊन तो पळून गेला. त्या दोघांनांहीं एका आगबोटीवर पकडण्यांत आलें, नंतर त्यांनां परत लंडनमध्यें आणून त्या दोघांची निरनिराळी चौकशी करण्यांत आली. **क्रिपन** हा दोषी ठरला, त्याला न्यायाधीशानें फांशीची सजा दिली, व त्याप्रमाणें त्याला देहांत शासनहि झालें. त्याच्याबरोबरच्या तरुणीवर, खुनी इसमास खून करण्याच्या बाबींत सामील असल्याचा आरोप होता; परंतु ती निर्दोषी ठरली व तिला सोडून देण्यांत आलें. तिच्या तर्फेच्या वकिलानें तिच्या बचावाकरितां केलेल्या भाषणांत एक विशेष मुद्दा पुढें आणिला होता, व त्यामुळें तिला अनुकूल असा खटल्याचा निकाल झाला. तो मुद्दा असा होता कीं, ती अननुभवी तरुणी असून **क्रिपन**च्या अनिवार्य मोहकतेमुळें त्याच्या दुष्टपणास ती बळी पडली. या गोष्टींवरून एक प्रश्न सुचतो.

**क्रिपन**नें आपल्या दुष्टपणामुळें तिच्या जन्माचें मातेरें केलें, तीं त्याच्या दुष्टपणास बळी पडली, पण तो स्वतः अन्य गोष्टीस बळी पडला नाहीं काय? तिसऱ्या **रिचर्ड**संबंधानें **शेक्सपीयर**नें जें शोकपर्यवसायी नाटक रचिलें आहे त्यांत एका विशिष्ट प्रकारच्या दुष्ट मनुष्याचें चित्र काढलें आहे, त्याचें **क्रिपन** हें उदाहरण आहे. **रिचर्ड**ला प्रेमाचा अनुभव नव्हता आणि तो मोठा मत्सरी व असूयाशील होता. आपल्याला वाण असलेल्या गोष्टींचा वचपा काढण्याकरितां, इंग्लंडचें राजपद मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेच्या आड जे जे कोणी आले त्या सर्वांचा द्वेष करण्याचा व त्यांनां इहलोकांतून नाहींसे करण्याचा त्यानें सपाटा लाविला. त्याच्या अंगांत आकर्षक शक्ति, दुर्निवार्य मोहकता इतकी होती कीं, केवळ खून करण्याच्या हौसेस्तव ज्या स्त्रियांच्या पतींचे व मुलांबाळांचे त्यानें क्रूरपणानें खून केले, त्या स्त्रिया त्याला आरंभीं असंख्य शिव्या शाप देत असतांही त्यांनीं त्याच्याशीं अखेरीस लग्नें लाविलीं. तो दुसऱ्यांना आपल्या दुष्टपणास बळी पाडीत होता, परंतु तो स्वतः दुष्ट स्वभावरूप राक्षसास बळी पडला होता. तशीच **क्रिपन**ची अवस्था झाली. तमोगुणरूप राक्षस हा बीजरूपानें प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं असतो. सत्त्वगुणरूप ईश्वरी गुणाचें प्राबल्य होऊं दिलें नाहीं, म्हणजे या सैतानाला चांगलें फावतें. विषयसुखाच्या मागें लागणारा, नीच वासनांच्या आधीन होणारा मनुष्य हा लहान प्रमाणावर एक क्रिपनच होय. असा मनुष्य संसारांतील मोहास बळी पडतो, क्षणिक सुखाचा गुलाम बनतो, आणि पशुतुल्य वर्तन करितो. स्वातंत्र्य, स्वातंत्र्य असें आम्ही म्हणतों; परंतु वस्तुतः कोणीच स्वतंत्र नाहीं, हें आमच्या लक्षांत येत नाहीं. आपण सर्व आज्ञापालनाच्या धर्मबंधनानें बद्ध झालेले आहों. आपल्या अंतरीं अशी कांहीं एक शक्ति आहे कीं; ती आपणांकडून

शुभ वा अशुभ कृत्यें करविते व त्या त्या कृत्यांचे तसतसे परिणाम भोगावयास लावते. कोणी तिला मनाचा क्षोभ करणारी शक्ति म्हणतात. प्राचीन रोमन लोकांनीं हिचे दोन भाग कल्पिले होते. एक दैवी बुद्धि व दुसरी आसुरी बुद्धि. ह्या दोन्हीही प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं असतात. आपण नेहमीं पुण्य व पाप, ईश्वर व सैतान, उपनिषदांत म्हटल्याप्रमाणें श्रेय व प्रेय—म्हणजे ईश्वरदृष्टया जें सत्त्व व ऐहिकदृष्टया जीं सुखें यांनीं वेष्टिलेले आहोंत; हीं दोन्ही आपणांपुढें असतात. ह्यांतून कोणतें तरी एक आपणांस आपलेंसें करावयाचें असतें; आणि तें एकदां तसें केलें म्हणजे मग पहिल्याच्या द्वारें आपणांस उत्तरोत्तर दिव्य प्रकाश प्राप्त होऊन आपण चिरकालिक जीवनाचे अधिकारी बनतों, व दुसऱ्याच्या द्वारें आपण अंधकारांत बुडत जाऊन आपल्या आयुष्याचें मातेरें होतें.

‘ जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।
चालविसी हातीं धरोनियां ’

हें जें मधुर गीत तुकोबांनीं ईश्वरापाशीं कळवळ्यानें गाइलें, त्यामध्यें हाच अर्थ भरलेला आहे. त्यांनीं ईश्वरावरच सर्व भार ठेविला, तो जी वाट दाखवील त्याच वाटेनें जाण्याचें त्यांनीं स्वीकारलें, त्याचीच कास धरिली—**सच्चिदानंदस्वरूप** परमेश्वराकडेच त्यांचा सगळा ओढा लागला, त्यांचें मन परमेश्वराकडून मागें परतण्यास असमर्थ झालें. म्हणून अंतःकरणांतील प्रेम, भक्ति यांच्या प्रकाशामुळें दिसणारा सत्य मार्ग स्वीकारावा किंवा बाह्य सुखरूप मृगजलामागें धांवावें, याचा आरंभींच विचार केला पाहिजे. कोणत्या मार्गानें जावें याविषयीं मनाचा एकदां निर्धार झाला म्हणजे आम्ही त्या मार्गाकडे ओढल्याप्रमाणें जाऊं लागतों—जणूं काय तो मार्गच आम्हांला खेंचीत असतो. मग ही स्वातंत्र्याची व्यर्थ बडबड कशाला हवी ! आज्ञा-

धारकता हा आमचा धर्म आहे, सन्मार्ग किंवा दुर्मार्ग आम्हांला आकर्षित असतो, व निमुटपणें आम्ही त्याला अनुसरत असतों. एक आधुनिक पाश्चात्य साधु **जेम्स मार्टिनो** यांनीं ईश्वराच्या आज्ञेस अनुसरण्याचा उपदेश केला आहे. ते म्हणतात 'गडेहो, आज्ञापरिपालनाचें महत्त्व फार आहे. त्याची पवित्रता थोर आहे. मनुष्यत्वास अत्युन्नत पदवीला नेऊन, न डगमगतां व आनंदानें, पवित्र अशा अंत:प्रेरणेला जो अनुसरत नाहीं त्याच्या ठिकाणीं भक्तीचा व प्रेमाचा कांहींच ओलावा नाहीं त्याचा प्रेमाचा झरा आटलाच, म्हणून समजावें; आणखी असें कीं, हा असा मनुष्य स्वतंत्र होण्याकरितां धडपड करीत असतो खरा, परंतु त्या धडपडण्यानें त्याचीं बंधनें मात्र अधिकच दृढ होत असतात.'

तुकोबा म्हणतात त्याप्रमाणें जेथें तेथें परमेश्वराची सोबत असली पाहिजे व तो हातास धरून नेईल तिकडे गेलें पाहिजे. '**तदुपासते**' म्हणजे तो (परमेश्वर) आमच्याजवळ आहे असें उपनिषदांत म्हटलें आहे. "परमेश्वराचें राज्य आमच्या अंत:करणांत आहे" (The Kingdom of God is within us) असें येशूख्रिस्ताचें वाक्य आहे. असा सर्वसमर्थ मार्गदर्शक असतांना आणि आम्हांला कोणत्यातरी मार्गास अनुसरणें भाग असतांना, दुसरा मार्गदर्शक आम्हीं कां पहावा? दुसऱ्याला आम्हीं कां अनुसरावें? मात्र, जोंपर्यंत आम्हीं असुरांचा आश्रय केला असेल, आसुरी–बुद्धीच्या–तमोगुणाच्या–विषयाधीनतेच्या वाटेनें आम्ही जात असूं, खाऊनपिऊन चैन करणें हीच जीविताची इतिकर्तव्यता आहे, असें आम्हांला वाटत असेल, तोंपर्यंत ईश्वर आम्हांला हातीं धरून चालविणार नाहीं. इंग्रजींत एक वचन आहे–"When half gods go, God arrives." अधम मनोवृत्ति, विषयवासना

म्हणजेच half gods होत. या असुरांना सोडून ईश्वराला आम्ही भजूं लागलों म्हणजे तुकोबा म्हणतात त्याप्रमाणें, तो ईश्वरच आमचा '**भार चालवितो**', '**अवघे जन सोइरे प्राणसखे**' होतात आणि '**अंतर्बाह्य सुखा**' ची प्राप्ति होते. हें अंतर्बाह्य सुख, ही शांति बुद्धिगम्य नाहीं. हिचा अनुभवच घेतला पाहिजे. हाच मोक्ष, हेंच निर्वाण.

सारांश, ईश्वर जिकडे नेईल तिकडे जावें, त्याची कास धरावी, त्याच्यावर सर्व भार टाकावा, म्हणजे सर्व कांहीं ठीक होईल; परंतु या बाबतींत असा प्रश्न निघतो कीं, आम्हांस जर ईश्वराला मार्गदर्शक करितां येतें, त्याला आमचा सोबती करितां येतो तर अर्थातच त्याचें ज्ञान होणेंही शक्य आहे. ज्याच्यावर सर्व भार टाकावयाचा त्याचें ज्ञान होणें अवश्य नाहीं काय? तो कोण, कोठें असतो, वगैरे समजल्याशिवाय त्याच्यावर आम्हीं विश्वास कसा ठेवावयाचा! पण तुकाराम बुवाच म्हणतात, "**वेदाचिये मती नाकळसी देवा। तेथें माझा केवा कोणीकडे ॥**." उपनिषदांतही "**यस्यामतं तस्य मतम्**" असेंच म्हटलें आहे; म्हणजे ज्याला ईश्वराचें ज्ञान आपल्यास झालें असें वाटतें त्याला तें ज्ञान झालें नाहीं, असें उपनिषदाचें म्हणणें आहे. मनुष्य किती झाला तरी मर्यादित पडला; परंतु ईश्वर अमर्यादित आहे. आम्ही काय आहों? शरीर, बुद्धि व आत्मा. शरीर विनाशी आहे. **भस्मांतं शरीरम्** हें वचन सुप्रसिद्धच आहे. शरीरापेक्षां बुद्धि थोर खरी, परंतु मनुष्याच्या बुद्धीचा भाव तो कोठवर? मनुष्याची बुद्धि अंधकारांत चांचपडत असते. जगाच्या उत्पत्तीपासून गुरुत्वाकर्षणाचा नियम अस्तित्वांत होता. तीच गोष्ट रुधिराभिसरणाची. परंतु मनुष्याच्या बुद्धीस या गोष्टींचा शोध

लागेपर्यंत कैक शतकें लोटलीं. चिलटांपासून मलेरियाचे हिंवतापाची उत्पत्ति होते हा शोध कैक शतकानंतर हल्लीं लागला आहे. इतका काळ आम्ही अंधारांत चांचपडत होतों, आणि चिलटांपासून माणसाचा फडशा उडत होता. नवीन नवीन शोध अर्वाचीन काळीं लागत आहेत खरे, तथापि जगामध्यें नवीन नवीन अनिष्ट गोष्टींचीही भर पडत आहे. काय हें मनुष्याचें अज्ञान ! बरें त्याच्या आत्म्याची वाट काय ? आत्मा—म्हणजे काय ? हेंहि अज्ञेयच—तो बिचारा सारखा तळतळत आहे, धडपडत आहे, निराशेचे सुस्कारे टाकीत आहे. ‘ या विश्वाचा जो गूढ चमत्कार आहे, त्याच्यापुढें मी कःपदार्थ ! ’ असें मानवी आत्म्याला वाटत आहे.

परंतु मनुष्याची जी ही लघुता, निरहंकारिता, तीच त्याची थोरवी होय. तिच्यामुळेंच ईश्वराच्या सोबतीस, त्याच्या मार्गदर्शित्वास व त्यानें दाखविलेल्या दिशेनें जाण्यास मनुष्य पात्र होतो. ईश्वराचें—परमात्म्याचें वर्णन करितांना ‘ **वायुरनिलममृतम्** ’ असें म्हटलें आहे. मनुष्यही—मानवी आत्माही—तसाच आहे. भक्ति करण्याकरितां, प्रेम करण्याकरितां, उच्च आकांक्षांनीं प्रेरित होण्याकरितां मनुष्याचा जन्म आहे. मनुष्यानें आपल्या सोबतीची इच्छा करावी, अशी परमेश्वराची इच्छा आहे. ‘ स्वतःची लघुता ओळखणें हेंच एक मोठेपणाचें कृत्य आहे. आपण कांहींच नाहीं, असें एखाद्याला वाटणें हाच मोठेपणास शोभणारा विचार होय, ’ असें **मार्टिनो** यांनीं म्हटलें आहे. **यस्यामतं तस्य मतम्** याचा अर्थ हाच. प्रेम करणें, दुःख सोसणें, निराश होणें, उमेद बाळगणें, वर चढणें व खालीं पडणें, खालीं पडल्यावर उठून पुन्हां वर जाण्याची इच्छा करणें आणि पुढें पुढें जाणें हाच मनुष्याचा मोठेपणा होय. दुःख, कष्ट, धडपड, हीं अनिष्टें दिसतात, अंधकारमय वाटतात;

तथापि त्यांतच आमचा मोठेपणा असतो, त्यांच्यामुळेंच ज्ञानाचा प्रकाश पडतो, उच्च कल्पना प्रादुर्भूत होतात. खाऊनपिऊन चैन करणें, निरनिराळ्या विषयसुखांचा उपभोग घेणें हा नव्हे, तर लहान मुलाप्रमाणें काळोखांत धडपडणें, शोधतां शोधतां घामाघूम होणें, अडखळणें, पडणें, आणि पडल्यावर बिलकूल निरुत्साह न होतां वर उठणें, हाच मनुष्यांचा निसर्गसिद्ध हक्क आहे. आळशी, चैनी, ऐषआरामी, संपत्तींत लोळणाऱ्या व मोठ्या वैभवांत विराजमान होणाऱ्या लोकांचें आम्ही कौतुक करितों, कीं मेहनत करणाऱ्या, झटून काम करित असतां धक्के टोणपे खाणाऱ्या आणि तशा स्थितींतही ईश्वरावर भरंवसा ठेवून मुकाट्यानें काम करणाऱ्या माणसांचें आम्हीं कौतुक करितों ? या दुसऱ्या माणसांचीच जगांत आजपर्यंत प्रशंसा झाली आहे. अशींच माणसें मनुष्यजन्माचें सार्थक्य करितात, मनुष्यास देवकळा आणितात. तुम्हीं म्हणत असाल कीं, मनुष्य-जन्म म्हणजे एक शोकपर्यवसायी नाटक आहे. होय; तसेंच कां म्हणाना ? शोकपर्यवसायीच नाटक होऊं द्या. आनंदपर्यवसायी नाटकाची गोष्ट सोडून द्या. हा आपला मनुष्यजन्मच दुःखांनीं भरलेला आहे. यांत पदोपदीं धडपड चाललेली आहे, अश्रूंचे पाट वाहत आहेत म्हणूनच तो इष्ट आहे, असें समजा. जीं दुःखें दिसतात, तीं दुःखें नाहींत, तर तो एक एकाचा आनंदच आहे. संसारांतील धडपड त्रासकारक वाटते खरी, परंतु ज्यावेळीं कळ पोंचते, वेदना होतात, तेव्हां सहनशीलतेचा धडा आम्ही शिकत असतों. दुःखानें दीर्घ निःश्वास टाकतों, तेव्हां आत्म्याला उन्नतीचा मार्ग दिसत असतो, देवाच्या संगतीची अपेक्षा वाटत असते. ईश्वरावर भरंवसा ठेवून संसारांतील मनुष्यजन्मांतील कष्टाचीं कामें करा, दुःख सोसा.

" तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हांसी ॥ "

मनुष्यप्राणी क्षुद्र आहे, दुर्बल आहे, असें म्हणतांना त्या क्षुद्रपणांतच त्याची महति आहे, हें विसरूं नका. श्रद्धा ठेवणें, प्रेम करणें, उच्च सात्त्विक आकांक्षा बाळगणें आणि दुःखपरंपरा सहन करणें, हीं ईश्वराचें सान्निध्य—संगति संपादण्याचीं शिफारसपत्रें आहेत. परद्वेष व स्वसुखाभिलाष यांचा मार्ग लांब जाऊं शकत नाहीं. केव्हां तरी मनुष्याला एकदां अशी वेळ येतेच, कीं द्वेषबुद्धि, विषयलोलुपता, आणि परपीडा आदिकरून पापकृत्यें यांच्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागतें, आणि अशा वेळीं पापकर्मांचा पश्चात्ताप झाला असतां त्याची दृष्टि परमेश्वराकडे वळते, ईश्वरी प्रेमाची त्याला तहान लागते, अंतर्बाह्य भरलेल्या परमेश्वराला तो हुडकूं लागतो, परमेश्वराची महति त्याला दिसूं लागते. त्याला समाधान पाहिजे असतें व तें प्राप्त होण्यास परमेश्वरावांचून दुसरा आधार नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री पटते. अखेरीस तें समाधान त्याला प्राप्त होतें. कारण प्रेम अमर्याद आहे. प्रेमरूप अमृताच्या सागरामध्यें बुडून मृत्यु येत नाहीं. प्रेमाचा परिणाम झाल्याखेरीज राहत नाहीं, प्रेमाचा कधीं वीट येत नाहीं. मात्र हें प्रेम दैवी पाहिजे—ईश्वरावर जडलें पाहिजे. तर चला आपण सगळे मिळून साधुश्रेष्ठ तुकोबारायाचा अभंग गाऊं:—

' जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।
चालविसी हातीं धरूनियां ॥'

---

## ( ३ )

## " चालविसी भार सवें माझा !"

गेल्या खेपेस मीं ह्या अभंगांतील पहिल्या दोन ओळींतील विचार-रहस्य आपल्यापुढें ठेवण्याचा प्रयत्न केला, तेथें देव व मनुष्य यांचा संबंध कांहींसा धनी व चाकर ह्यांच्या संबंधासारखा आहे, असें दाखविलें, व देवाची आज्ञा पाळणें हा मनुष्य–प्राण्याचा धर्मच आहे, असें सांगण्यांत आलें. आज आपण पुढल्या दोन ओळींतील अर्थाकडे थोडें लक्ष देऊं. या पूर्वीच्या ओळींत धनी व चाकर असा संबंध दाखविला आहे, तर आतां आपल्याला देव भक्ताचा संवगडी आहे, सोबती. मित्र, सखा आहे हा संबंध ह्या ओळींत पहावयास सांपडेल, तुकोबा म्हणतात, 'देवा, आम्ही जेव्हां हा संसार चालवितों, यांतील निरनिराळे मार्ग चालतों, त्यावेळीं आम्हांला तुझा आश्रय असतो. आमचीं प्रत्येकाचीं जीं ओझीं तीं शिरावर घेऊन चालावयास तूं आम्हांस सामर्थ्य देतोस, व बळ देतोस.' येथें देवाचें धनीपणाचें नातें झालें व पुढें त्याच्या ठिकाणीं मित्रत्वाचें नातें येतें. देव आपला धनी आहे, राजा आहे, राजाधिराज आहे, असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां अर्थात् धनी व चाकर, एक अधिकारी व दुसरा तो अधिकार मानणारा, एक नेता व दुसरा तो सांगेल त्याप्रमाणें चालणारा असला संबंध येतो, व त्याची इच्छा आपल्याला प्रमाण असते. पण पुढें हें नातें बदलतें. जसा नोकर आपल्या धन्याची इमानें इतबारें नोकरी करीत असतां कालांतरानें पुढें धनी–चाकराचें नातें कमी होत जाऊन सलगी अधिक वाढत जाते व अंतीं पूर्वींच्या नात्याच्या ऐवजीं मित्रत्वाचें, विश्वासाचें, प्रेमाचें नातें उद्भवतें, त्याप्रमाणेंच देवाचा व आपला जो संबंध आहे, त्याचें होत असतें. आपण प्रथम देवाची सेवा करितों, नंतर एकनिष्ठ सेवा झाली म्हणजे मित्र-

त्याचें व प्रेमाचें नातें उद्भवतें; आणि मग पूर्वी जो धनी होता तोच पूर्वीच्या चाकराचें सहाय्य करितो, त्याची चाकरी करितो! सकृद्दर्शनीं हा सर्व प्रकार आपल्या दृष्टीस थोडा चमत्कारिक दिसण्याचा संभव आहे. पण, आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्रस्तुत अभंग दोन दृष्टींनीं फार हृदयंगम ठरण्यासारखा आहे. कोणाला त्यांत असामान्य काव्यरस ओतप्रोत भरलेला आहे असें वाटेल व त्याच दृष्टीनें त्यास तो फार महत्त्वाचा वाटेल. इतरांना त्यांत आपल्या सबंध आयुष्याचा विचार करितां अत्यंत लाभदायक असें जें तत्त्वज्ञान तें त्यांत आहे, असें वाटण्याचा संभव आहे. उत्तम प्रकारची कविता वाचीत असतां जसजशी एकेक ओळ वाचीत जावें, तसतसा अधिकाधिक सरस, हृदयंगम व उच्चतर विचारांचा लाभ होत जातो, आणि शेवटली ओळ वाचतांनां ज्याप्रमाणें एखादी उंच उंच टेंकडी चढून यावें व तेथें आल्यावर तेथील रम्य देखावा, शीतल वायु यांचा लाभ झाला म्हणजे नवीनच तरतरी येते, थकवा नाहींसा होतो, व आपल्याला जणूं काय एक नवजीवनच प्राप्त झालें आहे, असें वाटतें, त्याप्रमाणें आनंदाचा लाभ होतो व आपल्याला त्या उच्च विचारांची परमावधि जणूंकाय अनुभवावयास सांपडून धन्यता वाटते. ज्यानें चांगल्या एखाद्या काव्याचें रहस्य जाणिलें आहे, त्यानें तें म्हणून दाखविलें म्हणजे ऐकणारांस फार आनंद होतो. **ग्लॅड्स्टन** नेहमीं **वर्ड्स्वर्थचें** काव्य स्वतः वाचीत असे. परंतु, **वेस्ट मिन्स्टर** पुलावरून प्रातःकालीं लंडन शहराचा जो देखावा दिसतो, त्यासंबंधाचें त्याचें लहानसें काव्य दुसऱ्यानें म्हटलेलें ऐकून त्याला जो आनंद होत असे, तसा तें स्वतः पुनः पुनः वाचून होत नसे. **टेनिसनचें मॉड** काव्य **आइटला**, त्यानें तें दुसऱ्यानें म्हटलेलें जेव्हां ऐकिलें तेव्हां, विशेष आवडूं लागलें. **तुकारामाचे** अभंग मधुरपणें म्हटलेले जेव्हां आपण

ऐकतों, तेव्हां ते अमृततुल्य वाटून त्यांचा आपण एकेक घुटका मोठ्या आनंदानें घेत असतों, आणि ह्या अभंगाला तर ही गोष्ट विशेष प्रमाणानें लागू आहे. एका ओळींत उदात्त विचार, नंतर दुसऱ्या ओळींत कांहीं नाहीं, असा येथें प्रकार नाहीं; एकेक ओळ पहिलीहून श्रेष्ठ, दुसऱ्या ओळींतील विचार पहिल्या ओळींतील विचारांपेक्षां अधिक श्रेष्ठ, अधिक हृदयंगम असा अनुभव येतो. देवाचें व आपलें नातें प्रथम धन्याचें असतें, नंतर तो आपला मित्र, सखा होतो, आपला मार्गदर्शक होतो व आपल्यावर अत्यंत प्रेम करूं लागतो, व अखेरीस त्याच्यांत व आपल्यांत सादृश्य येतें, आपण समरस होतों. हें तत्त्वज्ञान ह्या कवितेंत आहे. उत्तम कविता नेहमीं तत्त्वज्ञानरूपच असते. उत्तम कवीला गुरू, मार्गदर्शक म्हणतात तें ह्याचसाठीं कीं, तो जीवनरहस्याची आपल्याला ओळख करून देतो व आयुष्यांतील जी उत्तमोत्तम प्रमेयें तीं तो आपल्या आंवाक्यांत आणून देतो.

ह्या अभंगांत तुकोबांनीं जो एक अलंकार साधला आहे तो आपल्या चालण्यावरून घेतला आहे. संसार हा प्रवास करण्याचा प्रदेश कल्पिला आहे. प्रवासही पायीं करावयाचा असून रानावनांतून, ओसाड जागेंतून रखडत जावयाचें, तेव्हां आपलें ठिकाण गांठतां येणार आहे. वाटेंत जातांना पाठीवर नाहीं तर डोक्यावर आपापलीं ओझीं घ्यावयाचीं, थंडी, वारा, ऊन, पाऊस ह्यांची पर्वा न करितां, कसेही अडचणीचे रस्ते असले तरी, आपला रस्ता कापीत जावयाचें. आपणही ही उपमा नेहमीं संसारास देतों. संसाराला आपण संसारयात्रा म्हणतों. पूर्वींच्या काळीं यात्रा करणें हें मोठें बिकट कार्य गणिलें जात असे. यात्रा करीत असतांना ज्याप्रमाणें नानाप्रकारचीं संकटें ओढवतात, त्याप्रमाणें संसारयात्रा करितांना होतें, आणि मला तर असें वाटतें कीं, ज्या

वेळीं तुकोबाला हा अभंग रचण्याची स्फूर्ति झाली, त्यावेळीं त्यांच्या दृष्टीपुढें पंढरीचे वारकरी असावेत ! त्याकाळीं प्रवास करणें फार त्रासाचें असे. चांगली सोबत असल्यावांचून प्रवासास निघणें फार धोक्याचें गणिलें जात असे. पंढरीला जावयाचें म्हणजे मार्गांत अनेक प्रकारचीं संकटें ओढवावयाचीं, हाल-अपेष्टा काढावयास लागत, परंतु त्यांबद्दल भक्तांना कांहींच वाटत नसे. कारण त्यांस केव्हां एकदां आपल्याला पंढरी गांठतां येईल व **विठोबाचें** दर्शन होईल, असें झालेलें असे. त्यामुळें अनेक प्रकारच्या यातना, हाल, अपेष्टा, भूक-तहान, सर्व कांहीं सहन करावयास ते एका पायावर तयार असत; आणि मग त्यांना देवच आपणाला पंढरीस नेत आहे, तो आपल्या संगेंही आहे असें वाटत असे. वाटेंत आपलें रक्षण तोच करीत आहे व आपल्या मंदिराकडे आपल्याला घेऊन जात आहे, अशा भावनेनें, अशा दृढश्रद्धेनें ते प्रवास करीत. आपण देखील ह्या पृथ्वीवरील यात्रेकरूच आहोंत. आपण सर्व पुढें पुढें जात आहों, म्हणजे अर्थात् आपलें जीवन कंठित रहाणें म्हणजे मार्ग चालणें होय, प्रवास करणें होय. आपलें शील बनण्यास चालण्यासारखा दुसरा तितका गुणकारक उपाय नाहीं, असें मला वाटतें. तालीम करणें, क्रिकेट, टेनिस, गोल्फ इ० खेळांपासून फायदे आहेत; परंतु ते सर्वांशीं निर्दोष नव्हत. पण **लेस्ली स्टीफन** ह्यानें एके-ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें फिरणें, चालणें हा व्यायाम शरीर, मन, व आत्मा ह्यांस सर्व प्रकारें लाभदायक आहे. वर चित्रविचित्र रंगांनीं सजलेलें आकाश, वारंवार रंग बदलल्यामुळें ढगांची होणारीं तीं सुंदर चित्रें, आपल्या सभोंवतालीं, आपल्या पायाखालीं हिरव्या चार गवताचा व अनेक रंगांचाही पसरलेला रम्य व स्वच्छ गालिचा, मनास आनंदित करणारा व हुरूप आणणारा मंद वायु यांचा लाभ देत, निरनिराळे देखावे, निरनिराळीं माणसें हीं अवलोकीत आपण

चालत असतों, आणि कोणी मित्र बरोबर नसतांना जर आपण फिरत असलों, तर आपलें आपल्याशीं, आपल्या आत्म्याशीं किती तरी विषयावर भाषण होत असतें, आंतून आपल्याला स्फूर्ति मिळत असते व अशाच एकांताच्या, आनंदाच्या व शांत वेळीं देव आपल्याबरोबर आहे, असा आपल्याला प्रत्यक्ष अनुभव येत असतो. फिरतांना आपल्याबरोबर जर आपला एखादा मित्र असला, तर संभाषणाच्या द्वारें आपल्या आनंदांत अधिकच भर पडते व मग आपण पुष्कळ मैल चालूं शकतो आणि अशा वेळीं वेळाचें भान रहात नाहीं, किंवा आपल्याला थकल्यासारखेंही वाटत नाहीं. केवळ व्यायामासाठीं चालणें हेंही फायदेशीर आहे. परंतु त्यापासून आपल्याला विशेष फायदा व्हावा, असें जर आपल्याला वाटत असेल, तर कांहीं तरी महत्त्वाचें ठिकाण, अगर मौजेचें, आनंदाचें ठिकाण पहावयास जावें, अगर सभोंवारचा सुंदर देखावा पहात पहात चालावें, म्हणजे मग मनाला त्याचप्रमाणें शरीरासही हा असा व्यायाम लाभदायक होतो. हाच अनुभव आपल्याला आपल्या आयुष्या-संबंधानें येतो. जीवनभर आपण चालत असतों, आपण आयुष्य कंठित असतों. लहानाचे मोठे, मोठयाचे वृद्ध होतों. हा आपला प्रवासच होय, हा सारखा चालू आहे, कोठें आपल्याला थांबतां येत नाहीं; आणि त्या प्रवासांत आपणाबरोबर जर मित्र असला तर त्याच्या सहवासाच्या योगें आपलें दुःख हलकें होतें. त्रासा-पासून दगदग फारसी होत नाहीं. आपल्यास एकटेंच बराच प्रवास करावयाचा असला, आणि बरोबर कोणी नसलें, किंवा वर म्हटल्याप्रमाणें चालतांना स्वतःशींच विचार करण्याची संवय नसली, म्हणजे मग चालण्यापासून अतिशय कंटाळा येतो. आपलें हें जीवन कंठणें हें व्यायामासाठीं चालण्यासारखेंच आहे. आयुष्यभर आपण प्रवास करीत असतों व तो करितांना अनेक

प्रकारच्या अडचणी, दुखें, यातना, संकटें, मोहाचे प्रसंग हीं ओझीं आपल्याला बरोबर घेऊन मार्ग कंठावयाचा असतो. ज्याप्रमाणें चालतांना आपल्या बरोबर कोणी मित्र असला म्हणजे आपल्याला आनंद होतो, आपलें ओझें जड असलें तर, हलकें करावयास त्याचें साहाय्य होतें आणि आपण त्रासलों म्हणजे त्याच्यापासून आपल्याला मदत होते, त्याप्रमाणें हा संसार करीत असतां, हा जीवनरूप प्रवास चालू असतां आपल्याला सुखासमाधानासाठीं, सहाय्यासाठीं, पत्नि, मित्र, पति, पुत्र व मुली, समाज यांची आवश्यकता भासते. परंतु मित्र झाला काय, किंवा पिता पुत्र, पत्नि, बहिण, आप्त, समाज झाला काय, ह्यांचा आपल्याला कांहीं कालपर्यंतच उपयोग व्हावयाचा. हीं सर्व आपल्या बरोबर कांहीं काळपर्यंतच येणें शक्य आहे. खरें पाहतां मनुष्य प्राणी हा एकटाच जन्मास येतो, त्याला एकट्यालाच आपलीं दुःखें सहन करावीं लागतात, त्याला स्वतःलाच विचार करून मार्ग शोधावा लागतो, आणि जसा तो एकटा येतो, तसा अंतींही एकटाच जातो. जेव्हां आपण दिवसाचे सर्व प्रकारचे श्रम करून रात्रीं विश्रांतीसाठीं क्षणभर पडतों व आपल्या एकंदर स्थितीविषयीं विचार करूं लागतों, त्यावेळीं वर म्हटल्याप्रमाणें अनेक प्रकारचें साहाय्य असलें, तरी आपला मार्ग आपल्यालाच कसा शोधून काढावा लागतो व प्रसंगाच्या वेळीं आपल्यालाच धैर्यानें मार्ग कसा कंठावा लागतो, हें आपणास कळून येतें. पण, अशा वेळींही खरोखर पाहतां आपण एकटे असतों काय? मित्र, पिता, पुत्र, पत्नि, आप्त इष्ट इ० इतकेच कांहीं आपले सोबती, आपले सांगाती नसतात. त्यांच्यांहीपेक्षां श्रेष्ठ असा आपला मित्र आहे. तो आपणापासून कधीं दूर होत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो आपल्याला जणूं काय शोधीत असतो व आपल्याला कानगोष्टी सांगत

असतो. आपल्या अंतःकरणाच्या अत्यंत गूढ अशा प्रदेशांत त्याचें वास्तव्य असून त्याचा मंजूळ ध्वनि आपल्याला नित्य ऐकावयास सांपडतो. यावेळीं मला येशू ख्रिस्ताच्या अगदीं अखेरच्या एका कृत्याविषयीं आठवण होते. तो प्रथम अगदीं लोकांच्या दाटींत होता. तेथें त्यानें लोकांना उपदेश केला. नंतर आपल्या बाराही शिष्यांस घेऊन तेथून निघाला, आणि एका डोंगराकडे जातांना आपल्याबरोबर त्या बारांतील तीन निवडक शिष्य त्यानें घेतले, व डोंगरावर गेल्यावर त्यास तेथेंच ठेवून आपण परत येई तोंपर्यंत त्यांस देवाची प्रार्थना करीत रहावयास सांगितलें व आपण स्वतः एका निवांत स्थळीं गेला व तेथें त्यानें देवाची प्रार्थना केली. ह्या प्रसंगावरून आपण जो बोध घ्यावयास पाहिजे, तो असा कीं, आपली खरी वाढ आंतून झाली पाहिजे. ही आंतून वाढ होणें म्हणजेच परमेश्वर आपला सांगाती आहे, याचा अनुभव येणें होय. तो आपल्या बरोबर असतो, तो आपला मार्गदर्शक होतो, मित्र होतो, हा अनुभव आंतून ज्यांची वाढ होते, त्यांस येतो व पदोपदीं त्याचा सहवास त्यांना घडतो. आपण सर्वांनीं आपल्या समाजांत, मित्रांत, लोकसमूहांत मिळून मिसळून राहिलें पाहिजे. त्यांच्या सुखदुःखाचे वांटेकरी झालें पाहिजे. परंतु ज्यावेळीं प्रत्यक्ष परमेश्वर आपला मित्र आहे, सखा आहे, वाटाड्या आहे, असा आपल्याला अनुभव येतो, तो आपल्या ओझ्यासही हात लावतो, हें आपल्याला पटतें, तेव्हांच ही वरील कामें करण्याचें सामर्थ्य आपल्याला प्राप्त होतें. तुकोबा लोकांत मिळून मिसळून वागले; त्यांनीं कीर्तनें केलीं; देवाचें सारखें भजन केलें; लोकांस उपदेश केले; परंतु भांगार नामक टेकडीवर जाऊन तेथें शांतस्थळीं देवाच्या प्रत्यक्ष सहवासाचा लाभ घेतल्या-वांचून, आपलें सगळें हृद्गत देवाला निवेदन केल्यावांचून, त्यांचा

एकही दिवस गेला नाहीं. आणि अशा प्रत्यक्ष सहवासानेंच ते संसारांत परत येत, वावरत व त्यावेळीं आपला देव आपल्या संगें आहे, हा त्यांस अनुभव येत असे. अशा प्रकारें आपणही देवाचा सहवास करून घेतला म्हणजे मग आपल्यालाही असा अनुभव येऊं लागतो कीं, आपला देव आपल्यापासून दूर नाहीं, तो अगदीं सन्निध आहे. ज्यावेळीं आपण बिकट अशा संकटा-मध्यें सांपडलेलों असतों, अडचणींत असतों, आपल्यावर दुःखाचे प्रसंग आलेले असतात, त्यावेळीं तो आपल्याबरोबर असतो व हे सर्व प्रसंग, संकटें, आपत्ति ह्यांच्या द्वारें आपली उन्नति तो साधीत असतो, असा अनुभव आला म्हणजे मग संसार कष्टमय भासत नाहीं; आपलें कर्तव्य कसें तरी हातून न होतां, तें उत्तम रीतीनें पार पाडणें हा आपला धर्म आहे, असें वाटून मोठ्या उत्साहानें व अभिमानपूर्वक तें आपण करूं लागतों. देव प्रेम-स्वरूप असल्यामुळें सर्वत्र आपल्याला प्रेमाचें राज्य दिसूं लागतें; आणि प्रतिक्षणीं देव आपल्या संगें आहे व आपण त्याच्या सहवा-सांत आहों, असा अनुभव येत असल्यामुळें आयुष्यांतील सर्व प्रसंग लाभदायक होतात; सामान्य कार्येंही कंटाळवाणीं न वाटतां उत्साह-जनक होतात व हा सर्व परिणाम आपल्या ठिकाणीं जी शांति नांदत असते तिचाच होय, हेंही आपल्याला पटतें. परमेश्वराला पूर्णपणें शरण गेल्याच्यायोगें ही अधिकाराची स्थिति प्राप्त होते. म्हणूनच गीतेमध्यें असें अगदीं निक्षून सांगण्यांत आलें आहे कीं,

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥**

" सर्व कर्म म्हणजे साधनें टाकून देऊन मज एकट्यालाच शरण ये. मी सर्व पापांतून तुला मुक्त करीन, तूं याचा कांहीं शोक करूं

नको. " आपल्या सर्व जीवताचें खरें रहस्य हें आहे. देव आपला सांगाती आहे, याचा अनुभव घ्या; त्याची प्रार्थना करा; आपल्या सर्व गरजा त्यास निवेदन करा; त्याला शरण जा. आणि मग पूर्वी आपल्याला जो हा संसार दुःखमय वाटत होता, तोच संसार नवीन स्वरूप धारण करितो; दुःखें सुखें होतात; नित्याचीं कर्में त्रासदायक न होतां आनंददायक होतात; कारण, तीं करीत असतां आपण देवाच्या सहवासांत असतों आणि आपलीं सर्व प्रकारचीं ओझीं देखील आपणांस हलकीं वाटतात; कारण, प्रत्यक्ष परमेश्वर परमात्माच तीं सहज सहन करण्याचें सामर्थ्य आपल्याला देत असतो. ज्यांना हें सर्व मान्य आहे, पटतें, ते धन्य होत. ज्यांना अशा प्रकारचा अनुभव स्वतः येत असल्या-मुळें हें सर्व पटत आहे, ते त्याहून अधिक धन्य होत. कारण, देव आपल्या सांगाती आहे, तो आपला मित्र आहे, मार्गदर्शक आहे, आपलें ओझें हलकें करणारा आहे, ही गोष्ट तर्कवितर्कापेक्षां अनुभ-वानेंच त्वरित पटण्यासारखी आहे. म्हणूनच आपले साधुवर्य तुकोबा कंठरवानें सांगत आहेत कीं,

धाई अंतरींच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥
विधिनिषेध उरफोडी । जंव नाहीं अनुभव गोडी ॥

---

( ४ )

## आमची अनुकरणशील वृत्ति.

बोलों जातां वरळ, करिसी तें नीट ।
नेली लाज धीट, केलों देवा ॥

अकबर बादशाहा व बिरबल यांच्या ज्या अनेक बनावट गोष्टी आहेत, त्यांपैकीं एक अशी आहे कीं, एकदां अकबर बादशाहानें

बिरबलास विचारिलें कीं, लहान मुलास प्रथम भाषेचा उपयोग कसा करितां येतो व त्याला बोलतां कसें येतें? बिरबलाचा धनी त्याला जेव्हां जेव्हां असे प्रश्न विचारी, तेव्हां तेव्हां नुसतें वाक्पाण्डित्य करून वेळ मारून नेणें बिरबलास आवडत नसे. प्रत्यक्ष उदाहरण देऊन तो कोणतीही गोष्ट स्पष्ट करून दाखवीत असे. यासाठीं तो कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नाचें ताबडतोब उत्तर देत नसे; म्हणून त्यानें यावेळींही बादशाहापासून कांहीं दिवसांची मुदत मागून घेतली, व त्या अवधींत त्यानें पुढील उद्योग केला. प्रथम नुकतेंच जन्मलेलें एक लहान मूल त्यानें मिळविलें, व तें एका दाईच्या स्वाधीन करून, ज्या ठिकाणीं कोणीही माणूस दृष्टीस पडणार नाहीं, किंवा कोणताच शब्द कानीं येणार नाहीं, अशा एकांत गुहेमध्यें त्या दोघांना ठेविलें व त्या दाईला अशी सक्त ताकीद देऊन ठेविली कीं, 'तूं या मुलाजवळ असशील, तेव्हां कोणत्याही प्रकारचा कसलाच शब्द तुला उच्चारतां कामा नये.' दररोज नेमलेल्या वेळीं त्या मुलासाठीं दूध व दाईला अन्न पोहोंचविण्याच्या कामावर दुसऱ्या एका बाईची बिरबलानें नेमणूक केली होती. तिच्याशिवाय दुसऱ्या कोणासही त्या गुहेमध्यें जाण्यास मज्जाव असे. त्या अन्न पोहोंचविणाऱ्या बाईलासुद्धां अशी सक्त ताकीद होती कीं, तिनें गुहेंत, किंवा आसपास असतांनां एक शब्दही तोंडाबाहेर काढतां नये. याचा परिणाम असा झाला कीं, तीन वर्षेंपर्यंत त्या मुलाला कोणत्याही प्रकारचा समजण्यासारखा शब्द बोलतां आला नाहीं! कांहीं तरी अर्थविहीन आवाज त्याच्या तोंडून निघे, एवढेंच. तथापि एके दिवशीं असें घडून आलें कीं, जी बाई अन्न आणीत असे, तिच्या हातांतील तें मातीचें भांडें गुहेच्या दरवाज्यांतून ती आंत येत असतांना अवचित खालीं पडून फुटलें, अन्न खालीं सांडलें व त्यांतील सर्व अन्न मातींत मिसळून गेलें. कांहींही बोलावयाचें नाहीं, ही

जी बिरबलाची आज्ञा तिचें भान त्या बाईस त्यावेळीं न राहून भांडें पडून फुटतांच ती एकदम ओरडून म्हणाली ' बर्तन फुट गया. ' हे शब्द त्या कोमल बालकाच्या कानांवर पडतांच लखकन् प्रकाश पडल्याप्रमाणें त्याला होऊन तें मूल मोठ्या हर्षानें पुनः पुनः ' बर्तन फुट गया ' ' बर्तन फुट गया ' हे त्या बाईनें उच्चारिलेले शब्द म्हणूं लागलें. इकडे भांडें फुटलें व अन्न वाया गेलें खरें; पण त्याच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. हें बिरबलाला समजतांच त्यानें बादशाहास तेथें आणिलें व त्या मुलाचा इतिहास सांगून म्हटलें कीं, ' पहा, अशा रीतीनें आम्ही बोलावयास शिकतों. आम्ही कोणाचें तरी सारखें अनुकरण करीत असतों. '

एकंदरींत, मनुष्य हा अनुकरणशील प्राणी आहे. मनुष्यामधील या अनुकरणशील वृत्तीच्या योगें त्याच्यामध्यें सामर्थ्य व कर्तृत्वशक्ति उत्पन्न होते, हें आधुनिक मानसशास्त्रवेत्त्यांनीं सिद्ध केलें आहे. अमेरिकेंतील प्रो. **जेम्स** यांनीं आध्यात्मविद्येवर दोन ग्रंथ लिहिले आहेत. ' Plain Talks to Young Men ' या पुस्तकामध्यें ते एके ठिकाणीं म्हणतात कीं, एकानें दुसऱ्यास अनुकरणीय होणें हीच जीविताची खरी कला होय. पदार्थविज्ञानशास्त्र व राजनीतिशास्त्र या विषयांवर लिहिलेल्या आपल्या एका उत्तम पुस्तकामध्यें Bagehot एके ठिकाणीं म्हणतो कीं, सृष्टीच्या याच नियमानें राष्ट्ररूपी इमारतीची बांधणी होते, एकंदरींत आयुष्यांतील बहुतेक सर्व गोष्टी या नियमानें बद्ध आहेत. अनेक प्रकारचे दाखले देऊन त्यानें सिद्ध केलें आहे कीं, आपल्या पुढें जें असेल त्याचें अनुकरण करण्याची मनुष्याच्या मनाची जी प्रवृत्ति, ती त्या मनुष्याच्या स्वभावाचा एक अति बळकट भाग होय. मनुष्याची ही अनुकरणशील शक्ति त्याच्या आवडीनावडीच्या किंवा संवयीच्या बाहेर कशी जाते व तिचा त्याच्या भाषेवर, त्याच्या रीतीभातींवर

त्याच्या व्यवहारावर कसा परिणाम होतो, हें प्रसिद्ध व्यवहार—शास्त्र-वेत्ता **सर हेन्री मेन** यानें आपल्या 'Early Law & Custom' या पुस्तकामध्यें उत्तम रीतीनें दाखविलें आहे. आपल्या लोकांमध्यें अवतारवादाची जी कल्पना रूढ झालेली आहे, ती आपल्या-मधील या अनुकरणशील प्रवृत्तीमुळेंच झाली असावी! रोजच्या व्यवहारामध्यें आपल्याला काय दिसतें, तें पहा; कुटुंबामधला कर्तासवर्ता जो वडील माणूस त्याच्याप्रमाणें कुटुंबांतील इतर माणसें बोलतात, चालतात व कृति करितात. जाणून किंवा न जाणतां आम्ही दुसऱ्याचें अनुकरण करितों व दुसरे आमचें करितात. मूल ज्यांच्या सहवासांत नित्य राहतें, त्यांच्या आवडीनावडीचा, संवयींचा त्याचेवर परिणाम होऊन तें त्यांच्या सारखेंच होऊं लागतें. '**बोलों जातां बरळ, करिसी तें नीट। नेली लाज धीट, केलों देवा ॥**' असे उद्गार जेव्हां तुकोबाच्या तोंडून निघाले, तेव्हां मनुष्यस्वभावाचा वर सांगितलेला नियम तुकोबाच्या मनामध्यें असला पाहिजे. अनुकरण केल्याशिवाय या जगामध्यें आपणास राहणें शक्य नाहीं, हें जर खरें आहे तर मग सर्वांहून श्रेष्ठ, सर्वांहून पवित्र, सर्वांहून दयाळू असा जो प्रेमस्वरूप परमेश्वर त्याचेंच आपण अनुकरण केलें पाहिजे. ज्याच्याविषयीं आपल्या मनामध्यें पूज्यभाव आहे, अशा मनुष्याच्या सहवासात आपण नेहमीं असलों व त्याचें भाषण नेहमीं ऐकूं लागलों तर त्याची बोलण्याची रीत व त्याच्या चालीरीती आपणासही लागतात व लवकरच कांहीं कांहीं बाबतींत त्याची आपण प्रतिकृति होऊन जातों. ईश्वराविषयीं आपली नेहमीं पूज्यबुद्धि असली पाहिजे, त्याची आपण नेहमीं आराधना करून त्याचें ध्यान करूं लागलों तर त्याच्या सहवासामुळें आपल्या वर्तणुकीमध्यें व आपल्या भाषणामध्यें फरक हा होणारच. ईश्वराचें एकांतीं चिंतन केल्यामुळेंच, अनेक साधुसंतांच्या ठिकाणीं सत्यप्रीति पूर्णपणें बाणली. ह्या बाबतींत

त्यांचें उद्गार त्यांची ही सत्यप्रीति व त्यांचें पावित्र्य ह्यांची साक्ष पटवीत आहेत. **येशू ख्रिस्ताचें** उदाहरणही आपण **सर्वांनीं** लक्षांत ठेवण्यासारख आहे. जनसमूहाला उपदेश करण्यापूर्वी त्यानें पुष्कळ दिवस एकांतामध्यें एका पर्वतावर घालविले व अनन्यभावें तेथें परमेश्वराचें चिंतन करून नंतर त्याच्या अंतःकरणामध्यें ईश्वराच्या कृपेनें जी स्फूर्ति उत्पन्न झाली, तिच्यायोगें तो लोकांस उपदेश करूं लागला. त्याचा तो उपदेश म्हणजे मनुष्याला नवजीवन प्राप्त करून देण्यासारखा असे. ज्यांच्या मनावर विद्येचा कांहीं सुद्धां संस्कार झालेला नाहीं, अशा लोकांनीं ईश्वराच्या चिंतनामध्यें आपला काळ सतत घालविल्यामुळें त्यांची वाणी पवित्र होते, त्यांस जें धैर्य प्राप्त होतें, सत्य व पावित्र्य ह्यांचेसाठीं झटण्याचें त्यांच्यांत जें असाधारण सामर्थ्य येतें तो सर्व प्रकार खरोखर आश्चर्यकारक होय. परम महान् व परम पवित्र अशा परमात्म्याच्या सान्निध्यामध्यें आपण सतत असलों म्हणजे आपल्या अखिल जीवनाचें परिवर्तन होतें. व मग त्या उन्नत अंतःकरणांतून बाहेर येणारे शब्द हे शुद्ध व पवित्र असणारच, म्हणून आपणास आग्रहानें हें सांगावयाचें कीं, ईश्वराच्या सान्निध्यांत नेहमीं रहा, म्हणजे आपली वाणी दैवीवाणीसारखी झाल्याशिवाय राहणार नाहीं, हा स्वानुभव लक्षांत घेऊन तुकोबा म्हणतातः—

**आवडी श्रीहरि गाईजे एकांतीं ।**
**अलभ्य ते येती लाभ घरा ॥**

आम्हांला अद्‌भुत चमत्कार व्हावेसे वाटतात. पण हा पहा ईश्वराचा किती अद्‌भुत चमत्कार ! भोळ्या भावानें ईश्वरापाशीं जा, आपलें मन आणि अंतःकरण त्याला अर्पण करा, त्याचें ध्यान करण्यामध्यें निमग्न असा, अंतःकरण शुद्ध करा, त्याच्या दयालुत्वाचा

विचार करा, व अशा रीतीनें शुद्ध व पवित्र अंतःकरणानें आपण त्याला शरण गेल्यास आपली वाणी म्हणजे एकाद्या देवदूताची वाणी होईल. कारण, ईश्वर जेव्हां जेव्हां आपणांशीं एकांतामध्यें बोलतो, तेव्हां तेव्हां त्याचा प्रत्येक अमृततुल्य शब्द बीजरूपानें आपल्या अंतःकरणांत रुजतो व त्यायोगें आपली वाणी शुद्ध, पवित्र, निर्भय अशी बनते. म्हणन आपली वर्तणूक व आपली वाणी शुद्ध व पवित्र होण्याकारितां आपणांस **ईश्वराचेंच नेहमीं अनुकरण केलें पाहिजे.**

---

(५)

## ईश्वराचें अनुकरण करा.

मी माझ्या गेल्या व्याख्यानांत सांगितलें कीं, ' **बोलों जातां बरळ करिशी तें नीट** ' या चरणांत तुकोबा म्हणतात कीं, आपण ईश्वराच्या समागमांत सतत असलों म्हणजे आपली बडबड नाहींशीं होऊन आपलें भाषण शुद्ध व पवित्र होतें. याच गोष्टीचा आणखी थोडा विचार आज करूं. ज्या कोणाला खोल विचार करण्याची संवय नाहीं, त्याला या चरणामध्यें जो गंभीर विचार भरून राहिला आहे, त्याचें महत्त्व समजून येणार नाहीं. आपण ही गोष्ट जेव्हां आपल्या अनुभवाच्या कसोटीस लावून पाहूं तेव्हांच तिचें खरें स्वरूप आपल्या लक्षांत येईल. म्हणून मी वरील चरणाविषयीं आणखी थोडा विचार आज करून तुकोबाचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करणार आहें.

गेल्या खेपेस मीं सांगितलें कीं, मनुष्य हा अनुकरणशील प्राणी आहे, आणि आपण सर्वजण कमी अधिक प्रमाणानें, जाणून किंवा

न जाणतां, कोणाचें तरी अनुकरण करीत असतों. आपणांपैकीं पुष्कळांना, आपली कोणावर विशेष भक्ति आहे हें समजतें; पण हें आपणांस जरि समजलें नाहीं, तरी गुरुत्वाकर्षणाचा जो नियम जड जगतास लागू आहे, तोच अध्यात्म जगतासही लागू आहे; म्हणून त्या नियमान्वयें एकाचें चित्त दुसऱ्याकडे आकर्षिलें जातें. आपण लहान बालकें असतांना, आपल्या कुटुंबांतील माणसें जी भाषा बोलतात ती भाषा बोलण्यास आपण शिकतों. व तीं जशीं चालतात त्याप्रमाणें चालण्याचा आपण प्रयत्न करितों. आपण जेव्हां शाळेला जाऊं लागतो तेव्हां तेथेंही आपण अनुकरण करीत असतोंच. मोठ्या लोकांचीं चरित्रें आपण जेव्हां वाचतों, तेव्हां त्यायोगें आपलीं मनें आकर्षिलीं जातात; त्यांच्या स्वभावाचा आपल्या अंतःकरणावर परिणाम घडतो; व आपणांस न कळत आपल्या आयुष्याचें परिवर्तन होत असतें. घरीं, शाळेंत, मित्रमंडळींत किंवा पुस्तकें वाचीत असतांना जेव्हां जेव्हां आपला, आपल्यापेक्षां थोर विभूतीशीं परिचय घडतो, तेव्हां तेव्हां आपल्या मनाचा कल त्या त्या विभूतीचें अनुकरण करण्याकडे अगदीं सहज होत असतो.

तर मग आतां आपण थोर विभूति अगर उत्तमोत्तम ग्रंथ ह्यांच्याविषयीं आपल्या ठिकाणीं आदरभाव कां उदित होतो, त्याचा थोडा विचार करूं या. याचें कारण असें आहे कीं 'आपण' म्हणून जें कांहीं आपल्यामध्यें आहे, त्यापेक्षां अधिक उदात्त तत्त्वाची आपणा सर्वांस कांहींशी अस्पष्ट कल्पना असते व तें जेव्हां आपणांस इतरत्र आढळून येतें, आपल्याला ज्याची अस्पष्ट कल्पना होती तें स्पष्टरूपानें तेथें आहे, असें पाहून आपणांस आनंद होतो; म्हणून आपला आदर्श एकाद्या ग्रंथांत आहे, असें समजून आपण जेव्हां तो वाचावयास घेतों, किंवा जीवमान असणाऱ्या व्यक्तींचा

वरील उद्देशानें आपणास समागम व्हावा, अशी जेव्हां आपण इच्छा करितों, त्यावेळीं आपल्यामध्यें असलेल्या तत्त्वांपेक्षां उच्चतर तत्त्वाचा लाभ करून घेण्याच्या उद्देशानें ग्रंथवाचनास प्रारंभ केला पाहिजे, किंवा उपरोक्त व्यक्तीशीं समागम केला पाहिजे. असें झालें म्हणजेच आपले श्रम व्यर्थ न जातां त्यांचें चीज होऊन आपल्या आयुष्याचें परिवर्तन होण्यास मदत होईल. आपली विचारसरणी अगर लेखनशैली चांगली असावी, अशी जर आपली इच्छा असेल तर आपण एकाद्यां मोठ्या ग्रंथकर्त्याचें पुस्तक वाचा, त्यांतील विचारांचें मनन करा, ते विचार आपलेसे करा व त्यांतील भाषेची शैली चांगली समजून घ्या, व लिहिण्याची मांडणी लक्षांत ठेवा; परंतु त्या मनुष्याच्या विचारांची आणि कल्पनांची आपण नुसती पोपटपंची कराल; आणि त्यांचे विचार आपलेसे करणार नाहीं, तर आपली विचार करण्याची शक्ति नाहींशी होईल व तिची वाढ खुंटेल. आपले स्वतःचे जे विचार आहेत त्यांचा उपयोग करितांना बाहेरील विचार व कल्पना व आपले स्वतःचे विचार हे एकरूप झाले पाहिजेत. आपलें भाषण लोकांनीं ऐकावें व त्याप्रमाणें वागावें अशी जर आपली इच्छा असेल तर, तें भाषण अंतःस्फूर्तीनें झालें पाहिजे. अशा भाषणाचा कितीतरी मोठा परिणाम होतो! आपल्या भाषणाचा इष्ट परिणाम व्हावा अशी जर आपली इच्छा असेल, तर तें भाषण सुसंस्कृत झालेल्या अंतःकरणांतून बाहेर आलें पाहिजे. मनुष्य जेव्हां, सर्वांत श्रेष्ठ असा जो परमेश्वर, त्याची आज्ञा प्रमाण मानून त्यावर सर्वांशीं विश्वासून रहातो, तेव्हांच त्या मनुष्याचें अंतःकरण सुसंस्कृत किंवा परिणत होतें. म्हणून आपण या मार्गाचें जर अवलंबन केलें तर आपल्या शिक्षणाचा, आपल्या ज्ञानाचा ओघ योग्य दिशेनें वाहूं लागेल; नाहींतर आपण कोरडे तत्त्वज्ञानी बनण्याची भीति

आहे! आपल्या भाषणाचें लोकांना कौतुक वाटलें तरी त्यांच्या मनावर असल्या भाषणाचा कांहीं सुद्धां परिणाम घडणार नाहीं व त्यांची सुधारणा होणार नाहीं. लोकांचीच सुधारणा झाली नाहीं तर, देश तरी थोर पदास कसा जाणार? ज्यांनीं एकसुद्धां पुस्तक वाचलेलें नाहीं, असे अडाणी व अशिक्षित लोक एकदम सन्मान्य प्रचारक व साधु संत बनलेले आहेत, त्यांचीं चरित्रें वाचिलीं असतां आपणांस ते मोठे अद्भुत व गूढ चमत्कार आहेतसे वाटतात, याचें स्पष्टीकरण आपण कसें कराल! ईश्वराचा त्यांना साक्षात्कार झाला, व ईश्वरावर त्यांचा दृढ भाव होता म्हणूनच ते थोरपदास पोंचले व त्यांनीं आमच्या करितां ज्ञानाचें भांडार मागें ठेविलें. सारांश, अंतःकरण उदार झालें, उदात्त झालें, पवित्र झालें, कीं, त्याचा वर्तणुकीवर परिणाम होतोच होतो.

सरकार आणि मुत्सद्दी व अधिकारी जे आहेत, त्यांना फक्त वाइटाचा, अनिष्ट जें आहे त्याचा प्रतिकार करितां येतो. परंतु असा प्रतिकार केला म्हणजे, समाजाची उन्नति होते असें नाहीं, तर प्रत्यक्ष सत्कृत्य झालें पाहिजे, आणि तें होण्यास आपण आपलें आचरण शुद्ध ठेविलें पाहिजे, लोकांना बोधामृत पाजून त्यांचीं अंतःकरणें उन्नत केलीं पाहिजेत. त्या बोधाचा त्यांच्या मनावर असा परिणाम झाला पाहिजे कीं, तो ऐकून सहजच त्यांच्या मनांत परोपकारविषयककृत्यांत पडण्याची प्रथम इच्छा व्हावी, व आपलें एकंदर जीवन विकसित करण्यासाठीं त्यांनीं झटावें. गुन्हा करूं नये, असें जें आपणाला वाटतें, तें केवळ कायद्याच्या भीतीमुळें नव्हे, तर आपल्यामध्यें अशी एक अंतःशक्ति आहे कीं, ती नेहमीं सत्कृत्य करण्यास आपणांस सांगत असतें. ईश्वर आपलीं सर्व कृत्यें पाहतो, करितां त्याची आज्ञा आपण मानिली पाहिजे. त्याच्या इच्छेप्रमाणें आपण वागलें पाहिजे असें आपणांस

आपली सदसद्विवेक बुद्धि सांगत असते त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवल्यास त्या अंतःशक्तीची वाढ होत जाईल. नेहमीं ईश्वराची प्रार्थना करा, नेहमीं ईश्वराच्या समागमांत रहा व तो आपला सांगाती आहे, हें लक्षांत ठेवा म्हणजे, ईश्वर आपल्याला न कळत, आपल्या अंतःकरणांत प्रकाश पाडील. ‘ तुम्ही प्रथम माझे व्हा, मला सर्वस्व माना, म्हणजे मग बाकीचें सर्व कांहीं मी पाहून घेईन,’ असेंच जणूं काय ईश्वर नित्य सांगत असतो; म्हणून अनुतप्त अंतःकरणानें ईश्वरास शरण जा, म्हणजे आपोआप आपल्या अंतःकरणामध्यें आध्यात्मिक भरती उचंबळेल. ईश्वराविषयीं शुद्ध भाव, साधा विश्वास, व निर्मळ प्रेम यांचें बीं आपल्या अंतःकरणांत रुजूं द्या, म्हणजे प्रेमाचा आश्रय करून, कोणाचीही भीति न बाळगतां जें कांहीं सत्य आहे तें स्पष्टपणें लोकांस आपण सादर कराल व असें जें आपलें भाषण त्याचा लोकांवर अत्यंत इष्ट असा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं.

पण, दुःखाची गोष्ट ही आहे कीं, आजकाल सर्वत्र कार्यक्षमता व नैपुण्य संपादावें, ही वृत्ति वाढली आहे. लहानापासून थोरांपर्यंत सर्वांना नैपुण्य संपादन करा असें सांगण्यांत येतें. जगामध्यें यश संपादण्याकरितां सर्व धडपड चालूं द्या असें जो तो उपदेश करितो. आपण जें जें करितों त्या त्यामध्यें नैपुण्य संपादणें, तींत आपण सदोष नसणें, ही गोष्ट चांगली तर खरीच; परंतु नैपुण्य संपादणें म्हणजे इतरांवर वरचढ करणें, द्वेष, मत्सर, मारामाऱ्या यांत सामील होणें होय. प्रत्येकाला जय संपादन करण्याची, दुसऱ्यावर वरचढ करण्याची हांव सुटलेली आहे. ज्यानें पैसा अधिक मिळविला, त्याला अधिक प्रमाणानें यश प्राप्त झालें, असें समजण्यांत येतें; परंतु खऱ्या मोठेपणाचें माप पैशानें घ्यावयाचें नसतें. राष्ट्राचा मोठेपणा, त्यांतील

विवेकवान् माणसांवर व ते जगाच्या ज्ञानांत, विचारांत जी भर घालतात त्यावर अवलंबून असतो. ऐहिक संपत्ति क्षणभंगुर आहे, पण आध्यात्मिक संपत्ति चिरकाल टिकणारी असते. ऐहिक संपत्तीचा उपयोग मानसिक सामर्थ्याची वाढ, सुनीतियुक्त आचराविषयीं आवड व आध्यात्मिक संपत्ति प्राप्त करून घेण्याकडे जोंपर्यंत होणार नाहीं, तोंपर्यंत ती संपत्ति व्यर्थ होय. आणि जोंपर्यंत कार्यक्षमता, किंवा नैपुण्यसंपादन ह्यांतच आपली इतिकर्तव्यता आहे, असा समज राहील तोंपर्यंत आपल्या हातून विशेष असें कांहीं होणें नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

आजकाल लोकांना आपल्या हयातीमध्यें आपली कीर्ति व्हावी, लोकांनीं आपला गौरव करावा, आपल्याला बरें म्हणावें, असें वाटतें, यामुळें कोणतेंही काम उतावीळपणानें करण्याची त्यांना संवय सहज लागते. लहानसें चोपडें लिहावयाचें व मग लोकांनीं त्याची तारीफ करावी, अशी आशा बाळगावयाची ! परंतु ज्यांवर राष्ट्राचा मोठेपणा अवलंबून आहे, असे वेद, कुराण व बायबल, ह्यांसारखे ग्रंथ ज्या अनेक महात्म्यांनीं लिहिले, त्यांना लोकांच्या स्तुतीची मुळींच पर्वा नव्हती; त्यांनीं आपल्या हृदयामध्यें परमेश्वराला मात्र सांठविलें होतें. उपनिषद्कारांनीं ईश्वराचा शोध लावण्याचा उद्योग सतत चालविला, म्हणून त्यांत आपणांस उदात्त विचार आढळून येतात. मोझेसला वाटे कीं, आपण नेहमीं ईश्वराच्या समागमांत आहों. सारांश, आयुष्यांत क्षणोक्षणीं ईश्वराचें दर्शन झालें पाहिजे. तरच परमेश्वराला आपण हृदयांत साठविलें असें म्हणतां येईल.

'Nature' नामक मासिकाच्या अलीकडच्या एका अंकांत 'Making of Darwin' या विषयावर एक व्याख्यान प्रसिद्ध झालें

आहे. त्यामध्यें लेखक प्रथमच असा प्रश्न करितो कीं, दुसरा डार्विन कां अवतीर्ण होत नाहीं? ह्या प्रश्नाचें तो असें उत्तर देतो कीं, डार्विनच्या अंगीं जे गुण होते, ते गुण हल्लींच्या तरुणांमध्यें यावेत, म्हणून निश्चयात्मक प्रयत्नच होत नाहींत, म्हणून दुसरा डार्विन निर्माण होत नाहीं. मानमरातब, कीर्ति, नोकऱ्या, इत्यादि मिळविण्याकडेच सध्यांच्या लोकांचें लक्ष वेधून राहिलें आहे; पण, डार्विनचा साधा विश्वास, त्याचा विचारी स्वभाव, सकृद्दर्शनीं एकादी गोष्ट कितीका क्षुल्लक दिसेना, ती टिपून ठेवून तिच्यावर काळजीपूर्वक विचार करावयाचा, व अशा गोष्टींचा संग्रह करण्याचा दीर्घोद्योग नेटानें चालवावयाचा हे जे डार्विनचे गुण ते आजकाल दृष्टीस पडत नाहींत. मात्र या गुणांमुळेंच डार्विन इतका प्रसिद्धीस आला असें नव्हे, तर लहानपणीं तो कॉलेजमध्यें असतांना आपला अध्यापक जो **हेन्सलो,** त्याच्या नित्य सहवासांत असे. त्याच्या चरित्राचा त्याच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. प्रत्येक गोष्टीमध्यें डार्विन आपल्या प्रोफेसराचें अनुकरण करी व त्याचा एकूण एक गुण ग्रहण करी. म्हणून हा लेखक पुढें तरुणांस उपदेश करितो कीं, 'मोठ्यांचा समागम प्रत्यक्ष प्राप्त करून घेऊन व त्यांचे गुण आपलेसे करून मोठे व्हा.' आमच्या तरुणांच्या शिक्षणाची जी हेळसांड होते, त्याचें कारण हें कीं, त्यांचा व त्यांच्या शिक्षकांचा जिवंत, जागृत संबंध जडत नाहीं. ते दूरदूर असतात. ज्याचें आचरण शुद्ध आहे, अशा शिक्षकाच्या निकट समागमांत दिवस गेले, म्हणजे बाकीच्या सर्व आयुष्यभर आपल्या मनावर त्या शिक्षकाच्या आचरणाचा इष्ट परिणाम राहतो. हें जर खरें, तर मग आपण ईश्वराच्या समागमांत असलों, म्हणजे मनुष्यत्वास शोभेल असेंच वर्तन आपणांकडून घडतें, यांत नवल वाटण्याजोगें कांहींच नाहीं. म्हणून तुकोबा म्हणतात कीं, प्रथम

ईश्वराचें सान्निध्य प्राप्त करून घ्या, म्हणजे मग तुमच्या वाणीमध्यें सत्य व प्रेम नांदेल. या ठिकाणीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, देवाशीं समागम घडल्यावरच तशी वाणी प्राप्त होते. तुकोबा असें म्हणत नाहींत कीं, प्रथम ईश्वर बोलण्यास शिकवितो व नंतर त्याप्रमाणें चालण्यास शिकवितो. ईश्वराकडे जा आणि मग तो आपली भाषा शिकवील. तुकोबाच्या म्हणण्याचा इत्यर्थ असा कीं, वायफळ न बोलतां प्रथम कृति करून दाखवावी. दुसऱ्या एके ठिकाणीं ते म्हणतात:—

धाई अंतरींच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥

सतत दीर्घोद्योग करा, कृति करून दाखवा, म्हणजे तुमच्या विचारांची वाढ होईल. भोळा भाव, शुद्ध अंतःकरण व ओतप्रोत प्रेम हें भांडवल जतन करा, म्हणजे ईश्वराचा प्रकाश तुम्हांस प्राप्त होईल. अशा भावानें व अशा अंतःकरणानें अनेक ग्रंथांतून ज्ञान मिळवा व साधुसंतांच्या प्रत्यक्ष समागमापासून प्रेरणा उत्पन्न करून घ्या. ईश्वराचें सान्निध्य साधा व ईश्वराशीं सतत संभाषण करा, म्हणजे ईश्वर आपल्याशीं बोलेल व त्या बोलण्याचा आपल्या मनावर असा परिणाम होईल कीं, दुसऱ्यांस दोन शब्द सांगणें, आपल्याला जो अनुभव आला आहे, त्याचा लाभ इतरांस देणें हें आपलें कर्तव्यच आहे असें आपल्याला वाटेल; व आपल्या त्या भाषणांत समंजसपणा परिपूर्ण भरलेला आहे असाही अनुभव येईल.

---

## ( ६ )

# जीविताचें मूलतत्त्व प्रेम आहे.

**अवघे जन मज झाले लोकपाळ ।**
**सोईरे सकळ प्राणसखे ॥**

**नेपोलियन बोनापार्ट** याजविषयीं असें सांगतात कीं, एकदां त्याच्या एका मित्रानें त्याला विचारिलें कीं ‘ तुझा ज्याच्या ज्याच्याशीं म्हणून परिचय घडतो, त्या त्या प्रत्येकावर तूं आपली हुकमत चालवितोस याचें रहस्य तरी काय आहे ? तुझें आधिपत्य ज्या सैन्यावर आहे, तें सैन्यच, किंवा तूं ज्या लोकांवर राज्य चालवितोस ते लोकच, तुला भितात, तुला पूज्य मानितात व तुझी आज्ञा पाळतात, एवढेंच नव्हे तर जे कोणी मुत्सद्दी, किंवा राजकार्यधुरंधर तुझ्यासमोर येतात, त्या सर्वांवर तुझें वजन पडतें व तुझें वर्चस्व प्रस्थापित होतें. हें सर्व तुला कसें साधतें कोणास ठाऊक ! ’ **नेपोलियनानें** फक्त एका शब्दांत उत्तर दिलें. गंभीर मुद्रा धारण करून तो म्हणाला, ‘संयम, बाबा ! संयम, दुसरें तिसरें कांहीं नाहीं.’

**नेपोलियनानें** हें जें उत्तर दिलें, त्यांत पुष्कळ अर्थ आहे. कारण असें पहा, जो मनुष्य पुष्कळ बोलतो, मोकळ्या मनाचा आहे, असें आपल्यास वाटतें व जो आंत बाहेर निराळें असें कांहीं ठेवीत नाहीं, अशा मनुष्यावर आपला विश्वास बसतो खरा व त्याचेवर आपण प्रेम करितों, परंतु आपले जे अगदीं खाजगी हेतु, विचार, कल्पना त्या कांहीं अशा भडभड्या मनुष्याला आपण सांगणार नाहीं, किंवा संकटाचे वेळीं असा हा मनुष्य आपल्या कांहीं विशेष उपयोगी पडेल व त्याच्यावर आपण सर्वस्वीं अवलंबून असणें योग्य आहे, असें कांहीं आपल्याला वाटत नाहीं.

**नेपोलियनाचा** जो धिमेपणा, जो संयम त्यापेक्षां वरच्या दर्जाचा संयम आहे. **नेपोलियनास** वाटे कीं, दुसऱ्यांस जिंकण्याकरितां व दुसऱ्यांवर राज्य करण्याकरितां ईश्वरानें आपणांस उत्पन्न केलें आहे, म्हणून त्याचा संयम, सत्ता व वैभव हें मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेनें उत्पन्न झालेला होता. पण जे लोक शांत, गंभीर व ममताळू असतात, जे सिंहाप्रमाणें सामर्थ्यवान्, पण कोंकराप्रमाणें गरीब, स्वतःचीं दुःखें किंवा संकटें लोकांस जाहिर करणें ज्यांना आवडत नाहीं, परंतु याच्या उलट सर्व जगाचा भार आपल्या डोक्यावर घेण्यास जे तयार असतात व जिकडे जिकडे म्हणून ते जातील, तिकडे तिकडे जे स्वस्थता व शांति उत्पन्न करितात, अशा लोकांमध्यें जी संयमवृत्ति दिसते ती स्थिति खरोखर श्रेष्ठ प्रकारची होय.

**तुकारामबुवां**चा आतां आपण जो अभंग गाइला त्यामध्यें ते आपला अनुभव सांगतात आणि त्या अभंगाच्या द्वारें त्यांनीं ह्या विषयाचें रहस्य विदित केलें आहे. ते म्हणतात, मी ईश्वराच्या समागमांत नेहमीं राहिल्यामुळें मला जगतामध्यें सर्वत्र त्याचें दर्शन अधिकाधिक होऊं लागलें; माझें ओझें हलकें झालेंसें मला वाटूं लागलें, एवढेंच नव्हे तर पूर्वीं अंधकार असलेल्या मार्गावर आतां उत्तम प्रकाश पडूं लागला. मी ईश्वराच्या ध्यानामध्यें जसजसा जास्त जास्त निमग्न राहूं लागलों व त्याचें अधिकाधिक भजन करूं लागलों, त्याची प्रार्थना करूं लागलों, त्याचेवर सर्व भार टाकून वागूं लागलों, तसतसा माझ्या अंतःकरणामध्यें अधिकाधिक प्रकाश पडत गेला; माझ्या वाणीमध्यें सामर्थ्य येत चाललें, ईश्वराच्या आज्ञा पाळा, त्याच्या सहवासांत सदैव रहा, असें दुसऱ्यांस कळविल्याशिवाय माझ्यानें गप्प बसवेना. हृदयामध्यें मी हरीला सांठविल्यामुळें माझ्या मनांतील सर्व तर्कवितर्क नाहींतसे झाले व माझें आचरण सुधारलें. ईश्वराचें प्रेम अधिकाधिक व्यक्त

होत गेल्यामुळें, जगांतील प्रत्येक माणूस मला बंधुभगिनीप्रमाणें वाटूं लागलें; एवढेंच नव्हे तर या सर्व सृष्टीमध्यें ईश्वराचें मांगल्य, पावित्र्य सर्वत्र जणूं काय पसरलेलें आहे असें मला दिसूं लागलें.

वर सांगितलेले **तुकोबांचे** विचार म्हणजे त्यांची नुसती कल्पनेची भरारी समजावयाची कीं काय! जगामध्यें जात व धर्म यांचे अभेद्य तट पडलेले आहेत; एका राष्ट्राचें दुसऱ्या राष्ट्राशीं कोठेंना कोठेंतरी युद्ध हें जुंपलेलें असतेंच; सर्वत्र हेवा, मत्सर व वरचढ दिसून येत आहे; कांहीं वर्षांपूर्वीं '**बळी तो कानपिळी**' हें तत्त्व मोठ्या जोरानें प्रतिपादिलें जात असे, आणि जीवनार्थ कलहामध्यें जो अधिक कालपर्यंत टिकाव धरून राहील, अधिक काळपर्यंत झगडील तोच अखेरीस जय पावेल, आणि हेंच परिणामवादाचें रहस्य होय, असें मानिलें जात होतें. परंतु आतां लोक सुदैवानें शुद्धीवर येत आहेत आणि देवाचा मंजुळ ध्वनि, देवाचा हस्त आपलें कार्य करीत आहे; सर्वत्र, आध्यात्मिक, राजनीतिविषक व इतर अंगांचा विचार करितां आधुनिक संस्कृति असें अनुभवानें स्पष्ट करून देत आहे कीं, प्रत्येक आत्मा, प्रत्येक मनुष्यप्राणी यास त्याची स्वाभाविक किंमत आहे, व म्हणून तो आपल्या सहानुभूतीस व दयेस पात्र आहे. जुन्या काळीं व्यक्तीला कांहीं महत्त्व नव्हतें. बहुजनसमाज दृष्टीपुढें ठेवून मनुष्याविषयीं विचार चालत असे. परंतु आतां तो सर्व मनु पालटला आहे. पूर्वींच्या ह्या विचाराला आतां कांहीं महत्व राहिलें नाहीं. प्रत्येक व्यक्ति समाजाचा एक अधिकारयुक्त घटक असून समाजघटनेचा पाया प्रेम, सहानुभूति झाली पाहिजे, हें तत्त्व आतां मान्य होऊं लागलें आहे. सभागृहांतील वादविवादांत किंवा व्यासपीठावरील आपल्या भाषणांत, संकटांत पडलेल्या किंवा भुकेनें **मरत** असलेल्या मनुष्यास मदत करणें हें कांहीं माझें कर्तव्य नाहीं,

असें मोठ्या धिटाईनें ह्मणणारा मुत्सद्दि आज आपल्याला सांपडेल काय ? आतां एवढें मात्र खरें कीं, मनुष्यामनुष्यामधील बंधुत्वाचें नातें व्यवहारांत जितक्या प्रमाणानें ओळखिलें जावयास पाहिजे, तितक्या प्रमाणांत तें अद्याप ओळखलें गेलें नाहीं. परंतु कंगाल, दीन, दुबळे व विपत्तिग्रस्त लोकांना तसेंच कुजत न ठेवणें व त्यांस साहाय्य करणें, हें ज्यांना सुस्थिति प्राप्त झालेली आहे, त्यांचें कर्तव्य आहे, हा त्यांचा धर्म आहे, हें तत्त्व आतां सर्वमान्य झाल्यासारखें आहे.

ह्या तत्त्वामुळेंच आपणांस कळतें कीं, ईश्वराच्या व मनुष्याच्या दृष्टीनें प्रत्येक मनुष्यप्राण्याची किंमत आहे, व हेंच तत्त्व आपल्या सर्व कृति व आपल्या सर्व संस्था ह्यांस योग्य वळण लावीत आहे. ह्या तत्त्वाची जाणीव कमी अधिक प्रमाणानें होऊं लागली आहे, म्हणूनच जिकडे तिकडे धर्मार्थ दवाखाने, अनाथ बालकांचीं गृहें, व अशाच दुसऱ्या परोपकारी संस्था निर्माण होत आहेत. म्हणून, आधुनिक सुधारणेची किल्ली प्रेम आहे, असें जे म्हणतात ते स्वप्ना-मध्यें कांहींतरी बरळत आहेत, असें जर कोणी आपणास सांगूं लागला तर तिकडे आपण दुर्लक्ष करा, त्याच्यावर विश्वास ठेवूं नका. परिणामवादीदेखील आपल्या पूर्वीच्या मतास सौम्य स्वरूप देऊन आतां असें प्रतिपादूं लागले आहेत कीं, जीवनार्थ कलहामध्यें जे अधिक सहानुभूति दाखवितात, प्रेम करितात, व ज्यांच्या ठिकाणीं परहितबुद्धि अधिक असते, तेच खरोखर या जगामध्यें टिकाव धरून राहण्यास सर्वांपेक्षां अंतीं अधिक लायक ठरतात.

हीच गोष्ट आपला स्वतःचा विवेक, आपणांस शिकवितो. जे लोक गरीबांकरितां कांहींसुद्धां करीत नाहींत, अशा श्रीमंत लोकांचा किंवा जातीजातींतील काल्पनिक उच्चनीचपणा ह्यांनीं ज्यांचीं मनें कलुषित झालीं आहेत अशा आप्पलपोटे लोकांचा आपण गौरव

करीत नाहीं; तर ईश्वराचें प्रेम सर्व जगतामध्यें नांदत आहे, म्हणून ह्या जगामध्यें रहणारे आम्ही सर्व बंधुभगिनी होत व परस्परांस मदत-करणें हें परस्पराचें कर्तव्य आहे, असें ज्या विभूतींना वाटतें त्या विभूति आम्हांस वंदनीय होऊन बसल्या आहेत. पुरातन काळापासून सर्व साधुसंतांनीं, व थोर पुरुषांनीं वेळोवेळीं याच तत्त्वाचा डांगोरा पिटला आहे कीं, मनुष्यास एकत्र करण्यास प्रेम हें उत्तम साधन आहे. मत्सर, जात व वर्ण यांचे निर्बंध हे प्रेमास पूर्णत्व येण्याच्या वाटे-मधील मोठमोठे खडक होत. यासाठीं आपलें सर्वांचें देवापाशीं हें मागणें असावें कीं, हे ईश्वरा, आमच्यावर दया कर आणि तुझ्या कृपेनें आमच्या वाटेमधील हे अडथळे नाहींसे होवोत! म्हणजे जगामध्यें सर्वत्र पूर्ण प्रेम दिसेल. आपणा सर्वांचा असा स्वाभाविक भरंवसा आहे कीं, असा आनंदाचा दिवस प्राप्त होणार आहे. आजच जरी नसला, तरी पुढें मागें तो खात्रीनें येणार आहे. परंतु तो येणार असला तरी तो प्रत्येक व्यक्तीच्या परिश्रमानेंच येणार आहे, हें आम्हीं लक्षांत ठेवून वागलें पाहिजे आणि म्हणून प्रत्येकानें तो लवकर यावा अशाविषयीं खटपट करणें अगत्याचें आहे. ती खटपट म्हणजे प्रत्येकानें आपल्या स्वतःच्या आयुष्यामध्यें प्रेमास प्राधान्य देणें ही होय. सर्व व्यवहार करितेवेळीं प्रेम आपल्या दृष्टीपुढें ठेवावें, नेहमीं ईश्वराच्या समागमांत रहावें म्हणजे **तुकोबा**ला प्रत्येकजण आपला भाऊ किंवा बहिण आहे, असें ज्याप्रमाणें वाटे त्याप्रमाणेंच आपणांसही वाटेल. एवढेंच नव्हे तर एकांतामध्यें आपण ईश्वराच्या चिंतनांत मग्न राहून त्याची प्रार्थना केली पाहिजे, त्याचें ध्यान केलें पाहिजे, आपलें हृद्गत त्यास निवेदन केलें पाहिजे, आपली तळ-मळ त्यास दाखविली पाहिजे, म्हणजे समाजामध्यें पुन्हां आपण वावरूं लागलों कीं, ‘अवघें देखें जन ब्रह्मरूप’ हा अधिकार कमी अधिक प्रमाणानें आपल्याला प्राप्त होईल, ईश्वराविषयींच्या

ज्ञानाचें व त्याच्या प्रेमाचें वर्चस्व, आपल्या प्रत्येक विचारावर व आचारावर सतत राहील आणि खरें पहातां आपल्या जीवनामध्यें प्रेम हें अति उदात्त व अति गंभीर असें तत्त्व आहे याचा सर्वांस अनुभव येईल. **सर वॉल्टर स्कॉट** एके ठिकाणीं म्हणतो:—

In peace, Love tunes the shepherd's reed;
In war, he mounts the warrior's steed;
In halls in gay attire is seen;
In hamlets, dances on the green.
Love rules the court, the camp, the grove,
And men below, and saints above;
For love is heaven and heaven is love.

प्रेमाची आवश्यकता लहान मुलाला भासते, तशीच मोठ्या माणसालाही वाटते. प्रेमाशिवाय जग चालणार नाहीं, प्रेमामुळेंच आपण वांचतो, व आपली वाढ होते. एकमेकांशीं मत्सर करण्याची, एकमेकांशीं भांडण करण्याची सुरळ आपणांस वारंवार पडते, हें खरें. पण शेवटीं प्रेमाचा जय होतो, प्रेमामुळेंच मोडलेली घडी पुन्हा नीट बसवितां येते. ज्या ज्या वेळीं भांडण उकरण्याचा, द्वेष करण्याचा आपणास मोह पडेल, आपण आपला अधिकार विसरून ह्या दोषास बळी पडण्याच्या बेतांत असूं त्या त्या वेळीं आपण ईश्वराचा धांवा करावा, त्यास शरण जावें. देवा, मी पुन्हां प्रेमाच्या मार्गापासून दूर जात आहें, असें त्यास सांगावें. म्हणजे, ईश्वर आपल्या अंतःकरणांत मार्दव उत्पन्न करील, आपली दृष्टि जी सदोष आहे ती सतेज करील. परमेश्वराच्या प्रेमरूपी प्रकाशाचा साक्षात्कार आपणांस होईल, सर्वांमध्यें कांहींना कांहीं चांगुलपणा आहे, हें आपणांस कळेल व ह्यायोगें आपल्यामधील वितुष्ट नाहींसें होऊन आपलें एकमेकांशीं व ईश्वराशीं

सत्य होईल; बाहेरून दिसण्यांत मनुष्य कितीही गरीब किंवा पंगु दिसला तरी, प्रयत्न केल्यास त्याच्यामधील ईश्वरी अंश दिसल्याशिवाय राहणार नाहीं. सारांश, जेव्हां जेव्हां म्हणून एकादा साधुपुरुष, ईश्वराची पूजा करा, खरें बोला, चांगलें व पवित्र व्हा, सर्वांवर प्रेम करा असा उपदेश करितो, तेव्हां तेव्हां आपल्या सर्वांच्या अंतःकरणांतून, त्याच्या त्या उपदेशास, प्रत्युत्तर मिळत नाहीं काय! भयंकर पापी मनुष्याला देखील आपलें खरें वसतिस्थान ह्या जगामध्यें नसून, जेथून आपण आलों आहों, तेथेंच आपल्याला पुन्हा परत जाण्याचें आहे व तेंच आपलें घर होय, असें कधीं कधीं वाटत नाहीं काय? ज्यानें त्यानें आपआपला अनुभव पहावा!

ईश्वराच्या संगतींत राहून अंतर्बाह्य जो ज्ञानदिवा त्याचा प्रकाश अधिकाधिक सतेज होईल, असें आपण केलें पाहिजे. **तुकोबा**चा हाच आपणांस संदेश आहे. हें तत्त्व सर्व साधुसंतांनीं व ज्ञानी लोकांनीं ओळखिलें आहे. प्रेम आणि तें धारण करण्याची मनुष्याच्या अंतःकरणाची शक्ति अमर्याद आहे. **शेक्सपिअर**नें जी गोष्ट **जूलिय-ट**च्या तोंडून वदविली, तसें आपल्यांपैकीं प्रत्येकास म्हणतां येईल:—

My bounty is as boundless as the sea,
My love as deep; the more I give to thee,
The more I have, for both are infinite.

उपनिषदें, भगवद्गीता, कुराण, बायबल हे सर्व धर्मग्रंथ प्रेमाचे अनुवाद गात आहेत. सर्व धर्म जणू काय कंठरवानें सांगत आहेत:— "सर्वांवर प्रेम करा, प्रेमाच्या विचाराची वृद्धि करा, आयुष्यामध्यें प्रेम हें ध्येय सतत पुढें ठेवा, आपण सर्व एका ईश्वराचीं लेकरें आहोंत, म्हणून ईश्वराच्या प्रेमावर आपणा सर्वांचा सारखा हक्क आहे, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, ईश्वर नेहमीं आपणांजवळ उभा आहे व आपण त्याच्याजवळ आहों, ही गोष्ट लक्षांत ठेवा."

( ७ )

## परमानंद.

तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें ।
जालें तुझें सुख अंतर्बाह्य ॥

ईश्वराच्या समागमामध्यें सदा राहिल्यामुळें व त्याचें ध्यान, मनन केल्यामुळें जगामध्यें सर्वत्र सौंदर्य व चांगुलपणा तुकोबांस कसा अनुभवास आला, हें मीं माझ्या पूर्वींच्या व्याख्यानांमध्यें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. हेवा व मत्सर यांचें ठाणें तुकोबांच्या अंतःकरणांतून पार उठलें व 'वसुधैव कुटुंबकं वृत्ति'ही त्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें नांदू लागली. पुरुष, स्त्री अथवा मूल एवढेंच नव्हे, तर जगामध्यें त्यांना जें जें दिसे तें सर्व त्यांच्या अंतःकरणास स्फूर्तिकारक असें झालें. कारण मनुष्यप्राणी, त्याचें सामर्थ्य, सृष्टिसौंदर्य व हा संसार पाहून ईश्वर दयामय आहे, मनुष्यही प्रेमानें ओथंबलेला आहे, सर्व विश्वामध्यें प्रेम सर्वत्र नांदत आहे, ही गोष्ट, जितक्या जास्त रीतीनें स्पष्ट होते, तितक्या स्पष्ट रीतीनें दुसरी कोणतीही होत नाहीं, असें तुकोबांस वाटत होतें. असो. आतां ' जेथें जातों तेथें' ह्या अभंगांतील शेवटच्या चरणाकडे आज आपण वळूं. यामध्यें साधुश्रेष्ठांनीं अभंगाची परिसमाप्ति करून आपल्याला शेवटीं कोणती स्थिति प्राप्त झाली, हें सांगितलें आहे. ती स्थिति म्हटली म्हणजे अंतर्बाह्यसुखाची होय. या प्रकारची तुकोबांची स्थिति झाल्यामुळें ते आनंदानें नाचूं वागडूं लागले. या चरणाचा आपण विचार करूं लागलों असतां यायोगें विचारामागून विचार, कल्पनामागून कल्पना ज्या आपणांस एकसारख्या सुचतात त्यांचा अल्प विचार करण्याचें मीं योजिलें आहे.

मनुष्यानें अनेक साधनांचा उपयोग करून, अनेक मार्गांचें अवलंबन करून सुखाचा शोध लावण्याचा आजपर्यंत प्रयत्न केला

आहे. ह्या सर्व प्रयत्नांचा इतिहास म्हणजे तो सगळ्या जगाचाच इतिहास होय असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. कारण, जगाच्या आरंभापासून मनुष्य सुखाचा शोध लावीत आहे, व तें मिळविण्याविषयीं त्याची धडपड सुरू आहे. सुखाची कल्पना त्याच्या मनांतून कधींही नाहींशी झालेली नाहीं; तथापि जेव्हां जेव्हां आपणांस सुख सांपडलें असें त्याला वाटतें, तेव्हां तेव्हां तें त्याच्या हातून निसटून जातें व दोघांची चुकामूक पडते !

असें जें हें सुख कीं ज्याच्या लाभासाठीं झालेल्या प्रयत्नांचा इतिहास म्हणजे जगाचा इतिहास होय, तें आहे तरी काय ? आपल्या शास्त्रांमध्यें त्याला अनेक नांवें आहेत. कित्येक अभंगांमध्यें तुकोबांनीं त्याला परमानंद, तर दुसऱ्यांमध्यें त्याला शांति असें म्हटलें आहे. इतर सारस्वतांत त्याला निर्वाण, कैवल्यावस्था, स्वाभाविक तन्मयावस्था किंवा ब्रह्मानंदमग्नता, परमेश्वराकडून प्राप्त झालेला प्रकाश वगैरे प्रकारचीं नांवें आहेत.

ह्या सर्व शब्दांचा जर आपण विचार केला, तर आपल्या असें अनुभवास येईल कीं, हे शब्द जरी निरनिराळे आहेत, तरी त्यांच्या योगें आपल्या मनाच्या एका प्रकारच्या स्थितीची, आत्म्याच्या एका प्रकारच्या अनुभवात्मक अवस्थेची कल्पना होते. आध्यात्मिक अनुभवाच्या द्वारें अखिल विश्वाची हालचाल अंतःकरणांत होत आहे, म्हणजे जगामध्यें जे कांहीं निरनिराळ्या प्रकारचे अनुभव येत आहेत त्यांचें प्रतिबिंब आपल्याला आपल्याच अंतःकरणांत पहावयास सांपडतें; बाहेर जें चाललें आहे, त्याचें जें रहस्य तें आपण जाणल्यामुळें आपल्या ठिकाणीं ऐक्याची भावना जागृत होते; व आपल्याला असा अनुभव येऊन चुकतो कीं, जें तेज, जो प्रकाश, जो आनंद, जें सामर्थ्य या विश्वांत दृग्गोचर होत आहे, तेंच विश्वाचें

नियमन करीत आहे, त्याचीच सत्ता आपल्या स्वतःच्या आत्म्यावर आहे. त्याच्या सत्तेचा, प्रकाशाचा, सामर्थ्याचा अनुभव प्रतिक्षणीं हा आत्मा घेत आहे. ही जी अनुभवाची स्थिति, हा जो परमानंद, त्याची कल्पना वरील शब्द कमी अधिक प्रमाणानें, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें करून देत आहेत.

अंतर्बाह्य सुख हा ब्रह्माचा एक गुण आहे, एवढेंच नव्हे तर तो ब्रह्माचा वरिष्ट प्रकारचा गुण होय. बाह्य व अंतर्विश्व हीं ब्रह्मामध्यें **प्रकृति** व **चैतन्य** म्हणून राहतात. ही जडसृष्टि, ही मनःसृष्टि ईश्वरापासून निर्माण झाली. ईश्वरानें उत्पन्न केलेल्या ह्या गोष्टी होत. **तैत्तिरीय** उपनिषदामध्यें म्हटलें आहेः—

> **तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः ॥ आकाशाद्वायुः ॥ वायोरग्निः ॥ अग्नेरापः ॥ अद्भ्यः पृथिवी ॥ पृथिव्या ओषधयः ॥ ओषधीभ्योऽन्नम् ॥ अन्नात्पुरुषः ॥**

या उपनिषदकाराच्या मनामध्यें विकासाच्या कल्पनेचें बीज होतें असें दिसतें. सृष्टि एकदम अस्तित्वांत आली असें त्याचें म्हणणें नाहीं. तो म्हणतो कीं, सावकाश व शांत रीतीनें हें विश्व निर्माण होत गेलें, व ईश्वराच्या मनाचें हें कृत्य होय. ऋषीच्या मतें **अन्न** म्हणजे **प्रकृति**, नुसती जडप्रकृति नव्हे, तर ज्यायोगें आपण जिवंत रहातो, असा जो **प्राणवायु** त्यानें युक्त अशी **प्रकृति**, नुसती जडसृष्टि नव्हे तर चैतन्यमय सृष्टि—कारण, झाडें देखील श्वासोछ्वास करितात.

ह्या विश्वामध्यें जें सामर्थ्य, जी शक्ति दिसते तिच्या द्वारेंही परमेश्वर प्रकट होत आहे. परंतु ही शक्ति (Energy) म्हणजे

तरी काय ? जडसृष्टीच्या मागील हा जो आत्मा, हें जें चैतन्यतत्व तें आहे तरी काय ?

भौतिक शास्त्रांनीं अनेक अत्यंत महत्त्वाचे व सर्वांस थक्क करून सोडणारे शोध लाविले आहेत; परंतु ही शक्ति काय आहे, हें शास्त्राला सांगतां येत नाहीं. येथें शास्त्रांनीं हात टेंकिले आहेत, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं, टिंडलनें ह्या शक्तीचें पृथ्थक्करण, ती एक अत्यंत सूक्ष्म परमाणू ( atom or molecule ) आहे असें म्हणून केलें आहे. पण ह्यानें कोणाचें समाधान होतें ? ह्या शक्तीचें, ह्या तत्त्वाचें, खरें वर्णन म्हणजे '**आनंद**' '**चेतनश्चेतनानामेकः**' किंवा '**सर्वभूतांतरात्मा**' असें होय. परमात्म्याचें स्वरूप **सत्**, **चित्**, व **आनंद** ( **सच्चिदानंद** ) या रीतीनें केलें जातें; परंतु हा **आनंद**, **सत्** व **चित्** यांच्यांमध्येंही असतो; तो आनंद त्याच्या स्वताकरितांच नसतो, पण त्यायोगें सर्व विश्व उल्हासित होतें. ज्याला हें दिसतें तो **ब्रह्माला** जाणतो.

जुन्या कराराच्या द्वारें देवाच्या आनंदस्वरूपाची, प्रेमस्वरूपाची ओळख इतकी स्पष्टपणें पटत नाहीं. त्यांतील पहिल्या म्हणजे उत्पत्तीच्या पुस्तकामध्यें असें आहे कीं, परमेश्वरानें ही सर्व सृष्टि उत्पन्न केली. नंतर पुरुष व स्त्री उत्पन्न केल्यावर, त्यानें एकदां सर्व सृष्टि निरखून पाहिली तों तींत सर्व कांहीं त्याला चांगलें आहेसें दिसलें. ह्या ठिकाणीं आनंदाच्या कल्पनेची उणीव आहे. **जुन्या करारां**तील देव मत्सरी दिसतो; परंतु **येशू ख्रिस्त** व **पॉल** यांच्या शब्दांवरून नव्या करारांतील ईश्वर मत्सरी नाहीं असें कळून येतें. ईश्वर प्रेमस्वरूप आहे, त्याच्यामध्यें आम्ही वावरतों, रहातों व आमचें सर्व जीवित्व त्यावर अवलंबून आहे.

आतां कोणी असें म्हणेल कीं, ईश्वर जर आनंदरूप आहे, प्रेमरूप आहे, तर मग ह्या संसारांत आम्हांला आनंदाचाच, सुखाचाच, प्रेमाचाच लाभ कां होत नाहीं ? आमच्यावर संकटें आलीं असतां प्रेममय देव स्वस्थ कां असतो ? तो आमच्या संकटांचें निवारण कां करीत नाहीं ? या आयुष्यामध्यें दुःख व संकट जिकडे पहावें तिकडे दिसत आहे. आणि सुखाच्या बरोबर संकट हें ठेविलेलेंच ! जेथें आनंद आहे तेथें दुःखही आहेच, मग ईश्वर जर प्रेममय आहे, तर मग सर्वत्र अनुभवास येणारी संकटपरंपरा काय म्हणून ? अशा प्रकारच्या विचारांनीं मन गोंधळून जातें व मग पुढला मार्ग कांहीं दिसत नाहीं. पण, आतां आधुनिक तत्त्ववेत्ते, धर्मप्रचारक व थोर पुरुष ह्या विषयाचा थोड्या निराळ्या दृष्टीनें विचार करूं लागले आहेत; देव आमच्यावर संकटें पाठवितो व आपण मौज पहात स्वस्थ बसतो ही कल्पना आतां मान्य होण्यासारखी नाहीं. देव आपल्या सांगातीं आहे, जेथें जातों तेथें आहे. दुःखाच्या वेळीं आपल्या दुःखाचा वांटेकरी तो होतो; सुखाच्या वेळीं आपल्या सुखांत भर घालून आपलें रक्षण तो करितो. म्हणजे देव आपणांला केव्हां सोडीत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो आपल्या संगें आहे हें आपणांस कळतें, ही जी भावना ती देवाच्या स्वरूपाविषयीं आपल्यास उच्चप्रकारच्या अनुभवाचा लाभ करून देते. प्रथम, मनुष्यांना ईश्वर हा कांहींतरी एक शक्ति आहे, सामर्थ्य आहे असें वाटे; म्हणजे त्यांच्या मनामध्यें ईश्वराविषयीं भीतीची कल्पना असे; नंतर ईश्वर ज्ञानमय आहे असें त्यांना वाटूं लागलें व त्यावेळीं तो मनुष्याच्या सुखदुःखाविषयीं बेपर्वा आहे, असा त्यांचा समज होता. यानंतरची तिसरी स्थिति म्हणजे ईश्वर प्रेममय किंवा आनंदमय आहे, ही त्यांना प्राप्त झाली. ईश्वर एकदांच विश्वरूपी घड्याळाला किल्ली देऊन आतां शांत व स्वस्थ बसून रहात नाहीं, तर आपल्या सर्व व्यवहारामध्यें तो आपला

चांटेकरी आहे, आपल्या सुखदु:खामध्यें तो समसुखदु:खी आहे, आपण त्याच्यापासून निराळे होत नाहीं, तो आपल्यापासून दूर जात नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो आपला जीवनाधार आहे, त्याच्या जीवनांतर्गत आपलें जीवन आहे हेंच सत्य आहे, असें आतां अनुभवानें कळून येत चाललें आहे आणि आमचे तुकोबांसारखे साधु 'जेथें जातो तेथें तूं माझा सांगाति' ह्या प्रकारच्या उद्गारांच्या द्वारें कंठरवानें हेंच आज किती तरि दिवस सांगत आहेत!

---

## अंतरींचें सुख.

धाई अंतरींच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥
विधिनिषेध उरफोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥
वाढे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ॥
आपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसें तसें ॥
साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ॥
तुका म्हणे वादें । वांया गेलीं ब्रह्मवृंदें ॥

एकोणीसाव्या शतकांत जीं मोठीं खोल बुद्धीचीं माणसें इंग्लंडला लाभलीं त्यांतच **थॉमस कार्लाइल**ची गणना केली पाहिजे. त्याच्या विविध लेखांचा सर्वांवर, विशेषत: तरुणांवर, पुष्कळ परिणाम झाला होता. कारण, ज्या वेळीं इंग्लिश समाजामध्यें गतानुगतिकत्वास अधिक मान मिळत होता, प्रामाणिकपणें श्रम करून आपला संसार उत्तम रीतीनें चालविणें हेंहि मध्यम स्थितींतील लोकांमध्यें कमीपणाचें लेखलें जात होतें, व ह्या विश्वाची व्यवस्था नियमांनीं बद्ध नाहीं, येथें वाटेल त्याला वाटेल तसें वागावयाची मुभा आहे अशा विचारांचें प्राबल्य ज्या वेळीं होतें त्या वेळीं कार्लाइलनें वरील कामगिरी बजाविली, म्हणून तिचें महत्त्व विशेष

आहे. खरें पहातां **कार्लाइल** म्हणजे एक विक्षिप्त व्यक्ति होती. एके रात्रीं **कार्लाइल** व **एमरसन** लंडन शहरांत फेरफटका मारीत असतां **एमरसननें कार्लाइलला** 'लंडन शहर पाहून तुला काय वाटतें?' असा सहज प्रश्न केला असतां **कार्लाइलनें** आपल्यास येथें सैतानाचें राज्य दिसत आहे असा जबाब दिला! उलट पक्षीं **एमरसननें** सांगितलें कीं, मला येथें देवाचा हस्त, देवाचें राज्य सर्वत्र दिसत आहे! कार्लाइल हा मोठा निराशावादी असे व एमरसन आशावादी होता. कार्लाइलला वाटे कीं, जगांत सर्वत्र अंधारच आहे व अंधाराचीच सत्ता सर्वत्र नांदत आहे. उलट पक्षीं एमर्सनला वाटावें कीं, जरी अंधार असला तरी तो, प्रकाश पुढें येणार ह्याची सूचना आहे. प्रचंड प्रकाशापूर्वीं जो अंधकार सर्वत्र पसरतो व जो पुढील प्रकाशाची कल्पना करून देण्यास कारणीभूत होतो तो हा अंधार आहे. कार्लाइलला भाषणें नको होतीं; शांतता हवी होती. मोठमोठ्या वक्त्यांना त्यानें wind bags हवेचीं पोतीं म्हणावें. सारखी बडबड करीत सुटूं नका, भाषणांची रेलचेल उडवूं नका, आपल्या घरीं जाऊन बसा आणि आपल्या जिभेला आंवरा अशा प्रकारचा उपदेश त्यानें केला आहे; परंतु त्याचा स्वतःचा आयुष्यक्रम पाहिला, तर तो मात्र ह्याच्या अगदीं उलट होता! लोकांनीं आपली जिह्वा आंवरावी व तोंडांना खीळ घालावी असें त्याला वाटत असे; पण त्याला स्वतःला कांहीं तें करितां आलें नाहीं. त्याचे स्वतःचे लेख, त्याचे ग्रंथ हे सर्व, स्वतः त्यालाच वरील नियम पाळतां आला नाहीं, असेंच अगदीं स्पष्टपणें दाखवीत आहेत. असें जरी आहे तरी त्यानें जो उपदेश केला आहे, त्यांत अर्थ पुष्कळ आहे व त्याचें महत्वही फार आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

हल्लींचा आपला काळ हा वक्तृत्वाचा काळ आहे हें कांहीं खोटें नाहीं. म्हणजे संभाषणें, भाषणें, व्याख्यानें, वादविवाद ह्यांवाचून

आपलें कांहीं आज चालावयाचें नाहीं. आणखी, अगदीं जगाच्या प्रारंभापासून जिव्हेनें आपली कामगिरी सारखी चालविली आहे! कधीं तिचा परिणाम इष्ट झाला असेल, कधीं अनिष्ट झाला असेल, ही गोष्ट निराळी, पण ती कांहीं स्वस्थ बसलेली नाहीं! मोठमोठ्या समुदायांसमोर भाषणें करून वक्त्यानें आपापले विचार कळविले आहेत, संदेश विदित केले आहेत व त्या वक्तृत्वाच्या ओघाचा लोकसमूहावर तात्काल परिणाम झालेला आहे. जोंपर्यंत मनुष्य-प्राण्यास जिह्वागात्र आहे, तोंपर्यंत वक्तृत्व व त्याचें सामर्थ्य हीं विफल होणार नाहींत; परंतु आपली जिह्वा ही इष्ट व अनिष्ट, चांगलें व वाईट साध्य करून देणारी व्हावी, व तिचें सामर्थ्य सर्वत्र दृग्गोचर व्हावें, अशी जरी ईश्वरी योजना आहे, तरी देवानें हा धडा कांहीं विशेष रीतीनेंच घालून दिला आहे, असें म्हटलें पाहिजे. देव शांत आहे, वाचाविहीन आहे. जणूं काय ही सृष्टि, सृष्टिसौंदर्य हीच त्याची जिव्हा, आणि ही सृष्टि किंवा हें सृष्टिसौंदर्य खुणांच्या द्वारें त्याचा संदेश आपणांस कळवीत असतें. सृष्टिदेवता आम्हांला जणूं काय सांगत आहे कीं, जो माणूस सारख्या शब्दौघानें आपल्याला आपलें कर्तव्य काय व अकर्तव्य काय याचा बोध करीत असतो, त्याच्यापेक्षां शांत स्थितींत राहून त्या स्थितीच्या द्वारें उपदेश करणारा शिक्षक हा मनुष्यजातीचें अधिक कल्याण करणारा होय. जिव्हेच्याठायीं मोठें सामर्थ्य आहे, शक्ति आहे हें खरें; परंतु तिनें फार धिंगाणा घालूं नये, बेताल होऊं नये, म्हणूनच जणूं काय तिची रचना देवानें कांहीं विलक्षण रीतीनें केली आहे. देवानें दातांच्या मागें जिभेला अडकवून ठेविलें आहे, आणि ह्या दातांच्या बाहेरही आपले हे ओंठ जणूं काय दोन रखवालदार ठेविले आहेत! मनुष्य बेताल होऊन आपला मनुष्यपणा विसरेल व पशूकोटीप्रत जाईल, म्हणूनच ही योजना केली नसेल कशावरून? असो. सारांश

ह्या कीं, आपल्या ठिकाणीं परमेश्वरानेंच आत्मसंयमनाचें सामर्थ्य ठेविलें आहे, व त्याच्या योगेंच शहाणपणाचा जो मार्ग त्याचें आपणांस अवलंबन करितां येतें. परंतु हें सामर्थ्य आपल्या अंतःकरणांत जो परमेश्वराचा अंश आहे, त्याच्या द्वारेंच आपणांस प्राप्त व्हावयाचें असतें. खरें पाहिलें तर आजच्या काळीं संभाषणें, वादविवाद, वादग्रस्त विषयांचा खल हीं सर्वच हवीं आहेत. तोंडी व लेखी उपदेश, व व्याख्यानें हीं निरनिराळ्या रूपांनीं फार पुरातन कालापासून मनुष्यसमाजामध्यें आहेत. आणि जेव्हां 'तुका म्हणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें' असें तुकोबा कंठरवानें सांगतात, तेव्हां आपण कोणत्याही गोष्टींचा वादविवादच करूं नये, असें त्यांचें ह्मणणें आहे, असें कांहीं नाहीं. त्यांच्या उपदेशाचा आशय इतकाच समजावयाचा कीं, विनाकारण वाद घालावयाचा म्हणून वादविवाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं; तर वादविवाद व वक्तृत्व यांस स्वतःच्या विचाराचा व मननाचा पाठिंबा असावा. आणि स्वतःच्या विचाराचें हें दृढीकरण आणि मनन आपण आपल्या अत्यंत शांत अशा वेळीं, अंतःकरण दुसऱ्या कोणत्याही व्यवसायांनीं रंगलेलें नसतांना, साधावयाचें असतें.

आयात आणि निर्गत; माल आंत येईल, तर तो निराळ्या रूपानें बाहेर जाईल, हा नियम फक्त व्यापारालाच लागू आहे, असें नाहीं. तर तो सर्वत्र लागू होण्यासारखा आहे. आपण आपल्या शरीराचा विचार केला तरी, ह्या नियमानें आपलें शारीरिक स्वास्थ्य व आरोग्य आपणांस राखतां येतें, असें आपल्याला आढळून येईल. विद्यार्थ्यानें प्रथम ज्ञानाचा लाभ करून घ्यावयाचा असतो, तेव्हां त्यास पुढें आपल्या ज्ञानाचा इतरांस लाभ करून देतां येईल. सारांश, आपल्या सर्व प्रकारच्या व्यवहारास हा नियम कमी अधिक प्रमाणानें लावतां येण्यासारखा आहे. कार्लाइलनें शांतीसंबंधानें प्रदर्शित

केलेल्या विचारांत बरेंच तथ्य आहे, मात्र त्यानें आपले विचारांस अतिशयोक्तीचें स्वरूप दिलें होतें. कारण आपल्याला हें माहित आहे कीं, सर्व सत्कृत्यें व उत्तमाचरण ह्यांच्या बुडाशीं शांतपणें व एकांतीं झालेलें मनन हें असतें; ह्मणजे एकांतामध्यें, चित्त स्थिर करून सर्व गोष्टींचा व स्थितींचा शांतपणें विचार केल्यानंतर त्या निश्चित विचारास कृतीचें स्वरूप येत असतें. आपल्या ठिकाणीं जो उत्तमांश आहे, त्याचा लाभ इतरांस जर करून द्यावयाचा आहे, तर प्रथमतः एकांतामध्यें शांतपणें मनन करावयास आधीं शिकलें पाहिजे. जगामध्यें जे अनेक प्रकारचे व्यवहार होत असतात, त्यांत स्वतः सामील झाल्यानेंच, किंवा जगामध्यें जो सारखा गोंगाट होत आहे, त्यांत आपणही भर घातल्यानेंच, अगर ज्या अनेक चळवळी चालू आहेत त्यांच्यांशीं अगदीं एकजीव झाल्यानेंच आपल्याला जगाचा अनुभव येतो, असें नव्हे. हें सर्व जरी करावयाचें असलें तरी, आपण प्रथम आपल्य ।नाशीं विचार करून नंतर सिद्ध झालें पाहिजे. उगाच लोक कोणतीही गोष्ट करितात ह्मणून ती आपण करावयाची असें नव्हे. प्रथम मनन करणें हेंच आपलें कर्तव्य आहे. पहा, आपल्यावर कांहीं अत्यंत बिकट अशी आपत्ति आली, आपलें अत्यंत प्रिय असें कोणी सुहृद् कालवश झालें, तर आपण किंकर्तव्यमूढ होतो व अगदीं आपल्याशींच आपल्या आपत्तीविषयीं विचार करीत बसतों. यासाठींच आपलें कोणी सुहृद गत झालें असतां, किंवा आपल्या एकाद्या मित्रावर असें संकट आल्यावर त्याच्या भेटीस आपण गेलों म्हणजे शांत बसणें, आपली मान जणूं काय खालीं घालून आपली खिन्नता त्याच्या अनुभवास आणून देणें, आणि कोसळलेल्या आपत्तीविषयीं अघळ पघळ न बोलणें हाच सरळ मार्ग होय, असें नित्य मानिलें जातें. अशा वेळीं दुःखाचे, संकटाचे वाटेकरी आपल्या स्तब्धतेच्या द्वारें फार चांगल्या रीतीनें होतां येतें.

आपल्या साधुसंतांनीं आपल्याला सांगूनच ठेविलें आहे कीं एकसारखा शोक करून नव्हे, किंवा आपल्या आपत्तीसंबंधानें इतरांशीं अघळपघळ भाषण करून नव्हे तर आपल्या अंतःकरणांत ठेवून तें सहन केलें पाहिजे, ह्मणजे मग त्या दुःखाच्या भारानें वांकून जाण्याऐवजीं तो दुःखाग्नि अंतःकरणाच्या आंतील गाभाऱ्यांत ठेवून दुःख सहन केल्यानें धैर्यवान् किंवा शूर माणसाप्रमाणें जगामध्यें आपणास पूर्ववत् वावरतां येतें.

धर्माच्या बाबतींत आपल्याला हें स्वानुभवानें शिकावयाचें असतें कीं, विश्वामध्यें एक प्रचंड शक्ति नांदत आहे. ही शक्ति आपल्या बऱ्यासाठीं नित्य झटत असते, आणि जरी आपल्यावर अनेक प्रकारच्या आपत्ति आल्या, अनेक प्रकारचीं दुःखें आपल्याला सहन करावीं लागलीं, तरी अंतीं सत्याचा व प्रेमाचा हा जय होतच असतो. ज्या वेळीं आपण आपल्या स्वतःसंबंधानें शांतपणें व शांत स्थळीं विचार करीत आहों व आपल्याला हें कळून चुकलें आहे कीं, बाहेरच्या साधनांनीं आपला तरणोपाय होणें नाहीं, अंतःकरणाच्या ठायीं वास करणारा जो मित्र, तोच आपला मार्गदर्शक, तारक होय, त्याच वेळीं हा आपला विश्वास दृढावतो व त्यायोगेंच आपल्या स्वतःला नीट मार्गावर ठेवितां येणें शक्य आहे, हें आपणास कळून चुकतें. वेद, बायबल, कुराण, झेंदावेस्ता इ० धर्मग्रंथ ज्यांनीं लिहिले, ते आपल्या अंतःकरणामध्यें देवास पहावयास प्रथम शिकले होते. देवाचें वास्तव्य आपल्या अंतःकरणांत आहे हें त्यांस कळून चुकलें होतें. आपण तर बोलूनचालून अपूर्ण आहोंत, पंगू आहोंत. परंतु आपल्याला जर पूर्णतेच्या मार्गाला लागावयाचें आहे, तर आपण प्रथम हें शिकलें पाहिजे कीं, आपल्याला येथें जें जें कांहीं ज्या ज्या वेळीं हवें असतें, तें तें त्या त्या वेळीं आपल्याला आयतें मिळणें शक्य नाहीं. आपण आपला स्वतःचा मार्ग

शोधून काढला पाहिजे, व आपणच आपल्या अडचणी दूर करण्यासाठीं झटलें पाहिजे. हा जो मोठा धडा आपल्याला शिकावयाचा असतो, तो आपण जेव्हां एकांतांत जाऊन स्वत:शींच विचार करतों, तेव्हांच तो आपल्याला कळतो. ज्या वेळीं संसारांतील सर्व गोंधळ, सर्व गडबड आपल्या दृष्टीपुढें असते, त्या वेळीं ही जागृति आपल्या-ठिकाणीं होत नसते. आजच्या काळीं वादविवाद व चर्चा ह्यांच्या-वांचून कांहीं आपलें चालावयाचें नाहीं, हें खरें. कारण, आपली अशी कांहीं रचनाच आहे कीं, आपण निरनिराळ्या दिशांनीं विचार करीत असतों. तथापि ईश्वरीसंकेत असा दिसतो कीं, निरनिराळीं माणसें जरी निरनिराळ्या दिशानीं विचार करीत असलीं, तरी आपापले मतभेद सर्वांनीं बाजूस ठेविले पाहिजेत. आणि हे विचारांतील व मतांचे भेद प्रेमाच्या साहाय्यानें आवरले पाहिजेत. ज्या वेळीं आपण स्वत:शींच मनन करूं, परमेश्वरानें आपल्या अंत:करणामध्यें जो मंजूळ ध्वनि ठेविला आहे, त्याजवर विश्वास ठेवूं व ज्या वेळीं परमेश्वर आपल्यासमोर आहे ही गोष्ट आपल्याला पटली आहे, असें आपण दाखवूं, त्या वेळीं आपल्या ठिकाणीं प्रेमभाव जागृत होईल. ज्या वेळीं सर्व माणसें निद्रावश झालीं आहेत, ज्या वेळीं माणसांचे सर्व उद्योगधंदे थांबले आहेत, ज्या वेळीं रस्त्यांतील आवाज व गोंगाट, व त्याचप्रमाणें चैनीचेही सर्व प्रकार थांबले आहेत, अशा वेळीं आपण बाहेर पडा, एकदां वर आकाशाकडे दृष्टि फेंका, वर अनंत तारे व खालीं पृथ्वी ह्यांचें एकवार निरीक्षण करा; अशा वेळीं जेव्हां सर्वत्र शांतता असते, त्या वेळीं अंत:करणामध्यें असा ध्वनि उमटतो कीं, काय! सर्वत्र सामसूम झालें ह्मणून काय झालें, मी तुझ्याबरोबर आहें. मी तुला सोडिलें नाहीं. आम्हांला जर असा भास होत नसला तर त्याचा अर्थ इतकाच कीं, आम्ही त्या ध्वनीकडे लक्षच देत नाहीं.

परंतु ज्याला मननाची संवय जडली आहे, त्याला त्याचें महत्त्व कळतें. त्याला आपल्या अंतःकरणांतून उमटणारा हा ध्वनि आपला खरा मित्र आहे, खरा सोबती आहे हें कळून चुकतें. ज्या वेळीं आपण अशा प्रकारच्या एकांतामध्यें असतों त्या वेळीं आपण अगदीं एकटे असतों असें कोणी समजूं नये. अशा वेळीं जेव्हां वरील अनंत तारे व खालीं पृथ्वी ह्यांचे जणूं काय आपण मित्र होत असतों; त्या वेळीं आपल्या सभोंवार जी गंभीर शांति पसरलेली असते, ती आपल्या कानांत जणूं काय मंजुळ ध्वनि काढीत असते. ते अनंत तारे आपल्याला सांगत असतात कीं, 'तूंच आपल्या स्वतःचा मित्र आहेस, कारण तुझ्या अंतर्यामीं तुझा खरा मित्र आहे, हा तुझा सहचारी आहे, तुझा मार्गदर्शक आहे, हा तुला केव्हांही सोडून जात नाहीं, मात्र तूं त्याला पाहिलें पाहिजेस व तुझा त्याचेवर विश्वास बसला पाहिजे.'

आणखी आपण हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पुष्कळसे ग्रंथ वाचणें किंवा उपदेशकांचे उपदेश ऐकणें ह्यानें कांहीं आपलें तारण होणें नाहीं. अंतरींचें सुख हेंच आपल्यांस अंतीं अत्यंत कल्याणकारक वाटतें. वादविवाद व भांडणें कितीही चाललीं तरी त्यांस कांहीं मर्यादा ही आहेच. आणि जरी तुम्हांला चांगल्या रीतीनें वाद-विवाद करावयाचा असला तरी प्रथम '**अंतरींचें सुख**' प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करा, असा आपल्या तुकोबांचा उपदेश आहे. दुसरें असें कीं, आयुष्यामध्यें आपल्याला जे निरनिराळ्या प्रकारचे अनुभव येतात, ते आपल्याला ग्रंथवाचन व वादविवाद ह्यापेक्षांही अधिक बोध प्राप्त करून देतात. आजकाल विचार करण्याची संवय व शोधकबुद्धि हीं आमच्यांतून जात चालल्याची ओरड वारंवार कानांवर येते. परंतु ही अशी स्थिति कां प्राप्त झाली, ह्याचा विचार केला तर असें आढळून येईल कीं, शांतपणें विचार करण्याची

**व मनन** करण्याची संवय आमची जात चालली आहे. आपल्या **सभों-वार** जो गोंधळ चालू असतो, जी गडबड व जो कोलाहल नित्य सुरू असतो त्याचीच आपल्याला संवय झाल्यामुळें स्वतंत्रपणें स्वतःसाठीं विचार करण्याचीच संवय नाहींशी होत आहे. ज्या वेळीं विद्वान्, राजकारणी माणसें व साधुसंत एकांतांत जाऊन आपल्याशींच शांतपणें विचार करून उपलब्ध साधनांचा लाभ घेऊन आचारास योग्य असा मार्ग निश्चित करीत असत, तो काळ आपल्या ह्या देशांत फार भाग्याचा असला पाहिजे. आतां ह्या वेळीं मी अंतरींच्या सुखाची, एकांतवासाची एवढी स्तुति करीत आहें एवढ्यावरून मी केवळ एकतर्फी विचार करीत आहें असें आपण समजूं नये; अंतरींचें सुख किंवा एकांतवास ह्यांचें पर्यवसान कृतींत झालें पाहिजे. कारण जो केवळ अंतरींच्या सुखाची महति गातो, किंवा हें अंतरींचें सुख भोगीत राहतो, पण जगापासून दूर राहतो, जगाचा धिक्कार करितो, व ज्या अनेक चळवळी देशाच्या हितास साधनीभूत होत आहेत किंवा होणाऱ्या आहेत त्यांत जाऊन मिसळत नाहीं, त्याला खरें अंतरींचें सुख प्राप्त झालें आहे, असें मुळींच नाहीं. ज्यांनीं अंतरींच्या सुखाचा लाभ घेतला, व शांतपणें ध्यान व मनन करून जगांतील दुःख, जगांतील यातना कमी करण्यासाठीं व दुःखी जनांच्या दुःखाचे वांटेकरी होण्यासाठीं जे व्यवहारांत राबले, अनेक प्रकारच्या उपयुक्त व लाभदायक चळवळींत जे पडले व ज्यांनीं इतरांच्या आनंदांत व समाधानवृत्तींत भर पाडिली, ते वास्तविक पाहतां ह्या विश्वाचे पुढारी होत. **बुद्ध, येशू, महंमद, तुकाराम** यांचीं चरित्रें कमी अधीक प्रमाणानें अशा प्रकारचीं होतीं. आपल्याला माहीत असेलच कीं, जेव्हां कांहीं वृद्ध गरीब बायांनीं आपलें तारण होण्यासाठीं आपण काय करावें असा **महंमदास** प्रश्न केला त्या वेळीं त्यानें **देवावर**

**विश्वास ठेवा व आपलें रोजचें दळण दळीत जा** असा त्यांस जो जबाब दिला, त्याचा अर्थ इतकाच कीं, ज्या स्थितींत देवानें तुह्मांला ठेविलें आहे त्या स्थितीस अनुरूप अशीं जीं कर्त्तव्यें, तीं तुह्मी प्रथम बिनबोभाट करा; ह्मणजे त्यांच्या द्वारेंच तुमचें तारण होईल, इह व परलोकीं तुह्मांला सुखाचा लाभ होईल व इतरांच्याही सुखास तुम्ही कारण व्हाल. अशाच प्रकारचा बोध आज जो अभंग आपण गाइला, त्याच्यापासून आपल्याला होत आहे. ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे, तो ईश्वराच्या प्रेमास अधिक पात्र नसून, जो संसारी आहे, जो नागरिक आहे, ज्याला एकांताच्या सुखाचा, अंतरींच्या सुखाचा लाभ घेतां येतो व आपल्याला जो अनुभव प्राप्त झाला, जो लाभ झाला, जें ज्ञान मिळालें, जो धर्मानुभव लाभला, आपल्या हातून जें धर्मसाधन झालें, त्यांचा इतरांस लाभ द्यावयास जो सिद्ध होतो, तो ईश्वराच्य प्रेमास निःसंशय अधिक पात्र आहे.

---

## भागवतधर्माचें अर्वाचीन स्वरूप.

१८९४ सालच्या उन्हाळ्यांतली ती गोष्ट. मी नाशकाहून लोणावळ्यास चाललों होतों. कल्याणच्या स्टेशनावर मला गाडीची वाट पहात कांहीं तास थांबावयाचें होतें. कांहीं उद्योग नव्हता, म्हणून वेळ घालविण्यासाठीं मी इकडून तिकडे कांहीं वेळ फिरलों व मंद शीतळ वाऱ्याच्या झुळकेचा लाभ घेण्यासाठीं मी एका झाडाच्या छायेखालीं उभा राहिलों. तेथेंच दोन अगदीं साधीं दिसणारीं व गरीब माणसें, एक मुसलमान व दुसरा मराठा, देव व मनुष्य यांच्या संबंधानें मोठ्या गंभीरपणें कांहीं तरी संभाषण करीत

आहेत, असें मला आढळलें. मुसलमान मनुष्य **कबिराचीं पदें** म्हणत होता व मराठा **तुकाराम, नामदेवाचे** अभंग गात होता. **कबिराचीं** पदें म्हटलेलीं ऐकून हा मराठा गडी व अभंग म्हटलेले ऐकून मुसलमानभाई अगदीं तल्लीन झालेला दिसत होता. मधून मधून दोघांचीं संभाषणें होत होतीं. ह्या अज्ञान दिसणाऱ्या माणसांचे, ह्या दिवसांत खऱ्या भावाचा, खऱ्या भक्तीचा लोप झाला आहे, हल्लींचा धर्म म्हणजे केवळ क्रियाकर्मांमध्यें अडकून बसला आहे, व हिंदु व मुसलमान एका देवाचीं बालकें आहेत, हा भाव जागृत करण्याच्या ऐवजीं ह्या दोन्ही धर्मांच्या लोकांना दूर दूर करण्यांत येत आहे, असे उद्गार व त्यांचीं तीं पदें व एकंदर संभाषण ऐकून मला फार मोठा लाभ झाल्यासारखें वाटलें, व माझ्या ठिकाणीं एक प्रकारचा नम्रभावही उदित झाला. त्यांना भक्तीचें रहस्य पूर्णपणें कळलें होतें आणि ज्ञानाची व शहाणपणाची रिकामी घमेंड मारणारे जे आम्ही, त्यांच्या दृष्टीनें ते जरी अगदीं गरीब व यःकश्चित् दिसत होते, तरी मला त्या वेळीं ते, ज्यांना कांहीं वर्षांपूर्वीं न्या. मू. **रानडे** यांनीं भागवतधर्माचे प्रचारक व प्रवर्तक असें म्हटलें, त्या संतांचे अनुयायी, त्या भागवतधर्माचे सेवक असे मला दिसले. मी दोघांजवळ गेलों, तेव्हां मला असें आढळून आलें कीं, तो मुसलमान एक झाडूवाला होता व मराठा पोरटर असून, दोघेही कल्याणच्या स्टेशनावर नोकर होते. हे असे प्रकार आपल्या देशामध्यें क्वचित्च आढळून येतात, असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं. हा आपला देश ज्ञातिबंधनांनीं जरी अगदीं बद्ध झालेला आहे, तरी सुद्धां अगदीं खालच्या वर्गाचे म्हणून ज्यांना मानिलें जातें त्या महारांत सुद्धां अशीं माणसें आढळतात कीं, त्यांचा भाव, त्यांची भक्ति, आपल्या अंतःकरणास अगदीं तल्लीन करून सोडणारीं पदें घोळून घोळून म्हणणें व भक्तांच्या व साधूंच्या कथांचें अगदीं साध्या रीतीनें

त्यांनीं केलेलें निरुपण ऐकून मनाला फारफार समाधान वाटतें. कांहीं वर्षांपूर्वीं खंडाळ्यास एका महारबुवानें हरिकीर्तन केलें, त्या वेळीं त्यानें साधुसंतांची आठवण करितांना अगदीं कळवल्यानें म्हटलें; 'अहो संत हो, आपण आमच्यावर फार उपकार केले आहेत. ज्या वेळीं आम्हांला वेदांनीं टाकिलें, ब्राह्मणांनीं झिडकारिलें व लोकांनीं आम्हांस बहिष्कृत केलें, त्या वेळीं आम्ही जे अगदीं पतन पावलेले, सर्वांस तिरस्करणीय वाटणारे महार त्यांना आपण जवळ केलेंत; आम्हांला आपण आमच्या उद्धाराचा मार्ग दाखविला व आमच्या ठिकाणीं आशा उत्पन्न केलींत, त्या आपले आम्ही कसे उतराई होणार ?' त्या जुन्या आठवणी आज आपल्यांपुढें ठेवण्याचा हेतु इतकाच कीं, प्रत्येक हिंदूच्या ठिकाणीं विचाराची जागृति करावयास व त्यानें आज ज्या भ्रष्ट मार्गाचें अवलंबन केलें आहे, त्याबद्दल त्याची कानउघाडणी करावयास संतमालिका तयार असते. ह्या साधुसंतांनीं आध्यात्मिक अनुभवाचा अत्यंत मौल्यवान् असा सांठा आमच्यासाठीं मागें ठेविला आहे. आम्हीं मात्र त्याचेपासून आमचें कल्याण करून घेतलें पाहिजे. दुसरें असें कीं, हीं अशीं भाषणें किंवा साध्या भोळ्या लोकांचीं कीर्तनें वगैरे ऐकिलीं म्हणजे आपल्या हें लक्षांत येऊन चुकतें कीं, सद्धर्माचें बीज येथें आहे, मात्र त्याची मशागत करणारीं माणसें पाहिजेत, पण मग येथें जुनें रडगाणें पुढें येतेंच. उत्पन्नाची वाण नाहीं, पण पुढें गोळा करावयास माणसांची वाण आहे ! तथापि आम्हीं सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्माच्या सुधारणेचा प्रश्न हा सर्व प्रकारच्या चळवळींना पायाभूत झाला पाहिजे. आणि लोकांच्या सुधारणेसाठीं त्यांच्या धर्मविषयक समजुतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न न करितां व धर्मास प्राधान्य न देतां दुसऱ्या मार्गानें प्रयत्न करणें म्हणजे विहिरींतून चाळणीनें पाणी काढण्याच्या प्रयत्नासारखें निष्फळ

होणारें आहे. **डॉ. टी. के. चेन** नामक एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, एकंदर समाजाची जर प्रगति व्हावयास हवी आहे, तर तीस धर्माच्या सुधारणेचें पाठबळ पाहिजे. युरोप व अमेरिका येथील लोकांचा जो ख्रिस्ती धर्म त्याचा उगम यहुदी धर्मापासून झालेला असल्यामुळें त्या लोकांनीं याच यहुदी धर्मांतील विचार, यहुदी लोकांच्या आकांक्षा, त्यांच्या आशा व त्यांची संस्कृति ह्यांची ओळख करून घेतली पाहिजे. आम्हीं देखील ह्या विचारांपासून बोध घेतला पाहिजे, तो असा कीं, आमच्या सामाजिक प्रगतीला धर्मसुधारणा ही पायाभूत झाली पाहिजे, आणि ह्या धर्मसुधारणेचा पाया आमची जी पूर्वपरंपरा व पूर्व संस्कृति तिच्यावरच घातला पाहिजे. म्हणून तर आमच्या प्राचीन साधुसंतांनीं जे उपदेश केले आहेत, त्यांचीं जीं वचनें आज आपणांस उपलब्ध आहेत, तीं आपलींशीं करण्याचा प्रयत्न करून त्यांनीं जो पवित्र जीवनाचा आदर्श आपल्यापुढें ठेविला व तें आपलेसें केलें, त्याची ओळख करून देण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत.

हें जें प्रचंड राष्ट्रकार्य त्याचा विचार मनांत येऊनच ह्या शतकांतील आमचे जे दोन मोठे धर्मसुधारक-राजा राममोहनराय व पंडित दयानंद सरस्वती, यांनीं हें ध्येय आपल्यापुढें ठेवून लोकांस उपदेश केले व त्यास अनुरूप कृति करून दाखविल्या. आणि राजा राममोहनरायांचे दोन मोठे अनुयायी महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर व ब्रह्मानंद केशवचंद्रसेन यांनीं ब्राह्मसमाजास दृश्य स्वरूप दिलें. राजा राममोहनराय यांनीं स्थापिलेला ब्राह्मसमाज व पंडित दयानंद सरस्वति ह्यांनीं उभारलेला आर्यसमाज ह्यांच्या सिद्धातांत कांहीं बाबतींत पुष्कळ भेद आहेत, ते विसरण्यासारखे नाहींत, हें खरें; तथापि आपलें राष्ट्रीय ध्येय आपल्यापुढें ठेवून त्यांना जो मार्ग योग्य वाटत आहे त्याचें अवलंबन ते समाज करीत आहेत. आर्यसमाजाचा

प्रतिमापूजनावर विश्वास नाहीं, पण त्याची सर्व भिस्त वेदांवर आहे. आर्यसमाजाच्या मतें पुरातन काळीं ज्यूच काय ते तेवढे देवाचे लाडके होते, असें नाहीं, तर तत्पूर्वीं हिंदूंनाही तो मान मिळाला होता. राजा राममोहनराय यांनीं आपल्या अनेक लेखांत आपण प्रतिमापूजनाचा त्याग करून एका सत्य, सनातन परमेश्वराच्या भजनीं कां व कसें लागलों त्याचें वर्णन केलें आहे. कारण, ते म्हणत, उपनिषदांची हीच शिकवण आहे कीं, ह्या विश्वाचा कर्त्ता एक परमेश्वर आहे, तो सर्वांशानें आम्हांस ज्ञात नाहीं, तो सत्यस्वरूप असून ह्या विश्वाचा कर्त्ता, रक्षक व अंतीं नाशही करणारा तोच आहे. देव एक आहे, हें उपनिषदें कंठरवानें सांगत आहेत; आणि असा जो एक देवाधिदेव त्याची मानसिकपूजा शुद्धरीतीनें कशी करावी, हेंही उपनिषदें सांगत आहेत. तथापि वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, म्हणून ते आपणांस सर्वांशानें मान्य असले पाहिजेत, असें मात्र त्यांचें मत नव्हतें. त्यांचें नेहमीं हें सांगणें असे कीं, आपले धर्मग्रंथ आस्थेनें वाचा, त्यांची हेळसांड करूं नका; त्यांची काय शिकवण आहे ती पहा व तसें करित असतांना आपल्याला जें सारासारविचारसामर्थ्य देवानें दिलें आहे, त्याचा उपयोग करा आणि देव व परमेश्वर ह्या संबंधानें आपलें काय कर्त्तव्य आहे, ह्याचा विचार करून शास्त्रांच्या आज्ञा पाळा.

भागवतधर्माचें हें तत्त्व आतां हळूहळू, पण निश्चयात्मकरीतीनें, विचारीलोकांस मान्य होऊं लागलें आहे. आणि प्रार्थनामंदिरांतील अगर आर्यसमाजांतील उपासनांस हजर असोत अगर नसोत, ह्या दोन्ही समाजांचे पुढारी, उपदेशक, उपनिषदें व साधुसंत ह्यांच्या तत्त्वांवर विशेष जोर देत असतात. तीं स्वीकारा, असें त्यांच्या नेहमीं सांगण्यांत येतें. ह्या गोष्टीचा लोकांच्या मनावर इष्ट परिणाम होत आहे. हें जें आध्यात्मिक बाबतींतील राष्ट्रीय ध्येय, तें नित्य

दृष्टीपुढें ठेवून पुण्यास डॉ. भांडारकर आणि मुंबईस न्या. मू. **रानडे** यांचे नित्य उपदेश होत असतात, व अशा उपदेशांच्या वेळीं उपनिषदें, भगवद्गीतादि ग्रंथ व साधुसंतांचीं वचनें यांचा सढळपणें उपयोग करण्यांत येतो. ‘ तेलंगांचा पक्ष ’ ह्या विषयावर आपलें सुंदर व्याख्यान देतेवेळीं ज्यांना न्या. मू. **रानडे** ह्यांनीं ‘ राजकीय ऋषि ’ ( Political Rishi ) असें म्हटलें आहे, त्या **नारायण महादेव परमानंदां**पुढें हेंच राष्ट्रीय ध्येय होतें. आमच्या पुढाऱ्यांत मामा परमानंद हेच एक खरे खुरे ऋषि होते, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. मामा फार गोड व उदार स्वभावाचे गृहस्थ होते आणि शांतपणें, विशेष गाजावाजा न करितां, ईश्वरावर सर्व भार टाकून, ते आपल्या देशाच्या उद्धारासाठीं देवाचें कार्य सतत करीत होते. आणि आपले भांडारकर, रानडे, तेलंग, नूलकर हे सर्व त्यांस मार्गदर्शक समजून प्रसंगीं त्यांच्या सल्ल्यानें, त्यांच्या विचारानें वागत व त्यांच्या उपदेशास योग्य महत्त्व देत. ते एक आदर्शवत् गृहस्थ होते. त्यांची एकदां ओळख झाली कीं, त्यांच्याविषयीं मनांत प्रेम व आदर उदित व्हावयाचींच, व त्यांचा व आपला परिचय झाला म्हणून आपणांस फार धन्यता वाटावी, इतक्या थोर योग्यतेचे गृहस्थ मामा परमानंद होते. राजा राममोहनराय यांनीं जो हा ब्राम्हसमाज स्थापिला, त्याच्या राष्ट्रीय स्वरूपाविषयीं आपल्या एका लहानशा पुस्तकांत परमानंद म्हणतात “राजा राममोहनरायांच्या आधीं फार वर्षांपासून प्रचारांत असलेले पंजाबांतील शीखपंथ, बंगाल्यांतील चैतन्यांनीं स्थापिलेला वैष्णवपंथ, आपल्या महाराष्ट्रांतील भक्तिपंथ, मध्यप्रांतांतील व गुजराथेंतील कबीरपंथ, ह्यांसारखे जे पंथ त्यांच्यांत व राममोहन रायांच्या पंथांत कमी अधिक सादृश्य असे.” **प. वा. डॉ. आत्माराम पांडुरंग**, तसेंच प. वा. रा. ब. **भोलानाथ साराभाई** त्यांच्यापुढें हेंच राष्ट्रीय ध्येय असे, आणि ज्यांचें साधुत्व,

ज्यांची धर्मशीलता, ज्यांची उत्कट भक्ति, पवित्र आचरण, साधा स्वभाव, व स्वार्थत्याग ह्यांच्या योगें सिंधप्रांतामध्यें ज्यांचीं नांवें लहानापासून थोरापर्यंत सर्वांच्या तोंडीं आहेत, ज्यांस लोक साधु असें एकंदर वर्तनावरून म्हणत आहेत, ते **हिरानंद** व **नवलराय** ह्यांच्यांहीपुढें हेंच राष्ट्रीय ध्येय, हेंच राष्ट्रीय धोरण होतें. परंतु हे जे भागवतधर्माचे सर्वप्रचारक त्यांचा आपल्या धर्मपुस्तकांवरील व आपले साधुसंत व भक्त ह्यांचेवरील विश्वास अंध नव्हता. सर्व कांहीं आपल्या धर्मपुस्तकांत आहे, किंवा इतरत्र कोठें साधुसंत भक्त प्रसिद्धीस आले नाहींत, असें वाटण्यापर्यंत कांहीं त्यांची मजल आलेली नव्हती. १८३० सालीं राममोहनरायांनीं ब्राह्मसभा जेव्हां स्थापन केली, त्या वेळीं स्वीकृत धर्मतत्त्वांचा पाया वेद व उपनिषदें होत, असें त्यांचें धोरण होतें खरें; परंतु पुढें नऊ वर्षांनीं त्यांचेच अनुयायी व ब्राम्हसमाजाचें काम पुढें चालविणारे जे महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर त्यांनीं वेदांचें पौरुषत्व व अपौरुषत्व ह्यासंबंधानें काशी येथील पंडितांपाशीं वाद करण्यासाठीं ४ शास्त्री पाठविले. व स्वतःचे शोध आणि ह्या चार शास्त्र्यांनीं दिलेला निकाल ह्यांच्या आधारें वेद धर्मविषयक बाबतींत सर्वप्रकारें सत्यमार्गदर्शक होत असें कांहीं मानतां येत नाहीं, असें त्यांस ठरवावें लागलें. ह्या प्रसंगासंबंधानें आपल्या एका व्याख्यानांत **केशव चंद्रसेन** म्हणतातः—" तो प्रसंग मोठा बिकट; अगदीं युद्धाचाच म्हणावयाचा. एके बाजूस विवेक, व दुसऱ्या बाजूस आजपर्यंतचा संस्कार, लोकमत, संवयीनें स्वतःच्या मनाला उत्पन्न झालेली आवड. एके बाजूस सत्य आणि कर्त्तव्य आणि दुसऱ्या पक्षाला आजपर्यंत आंगवळणी पडलेल्या विचारांचें व सहवासाचें गाठोडें ! पण, अखेरीस विवेकाचा, सत्याचा जय झाला, आणि बाबू देवेंद्रनाथांनीं वेदांबद्दलचा भ्रमाचा भोपळा फेंकून दिला, व ब्राह्मसमाज व

प्रचलित वेदांत यांची कायमची फारकत झाली." खुद्द दयानंद सरस्वतींनीं प्रार्थना व ब्राह्मसमाजांतील लोकांस आपल्या पक्षास आणण्यासाठीं कांहीं कमी खटपट केली नाहीं. पण त्यांस यश मुळींच आलें नाहीं. परंतु प्रार्थना व ब्राह्मसमाजांतील भागवतांस असें आज वाटत आहे कीं, पुरातन काळची कोणतीहि राजकीय, सामाजिक अगर धर्मविषयक संस्था एखाद्या सुधारकाला, अगर सुधारकांना, जशीच्या तशी आज उठवितां येईल असें म्हणणें अगदीं अन्यथा आहे. ह्या काळच्या जुन्या संस्थांच्या संजीवनाचा किंवा पुनर्जीवनाचा विचार करणें व्यर्थ आहे. पूर्वींचें जें कांहीं आहे त्याचा आज सर्वस्वीं त्याग करितां येणें ज्याप्रमाणें अशक्य, त्याप्रमाणें इतर धर्मांचे जे प्रवर्तक त्यांच्याकडे अगदींच दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. पूर्वींचे कित्येक सुंदर विचार, आचार व संस्थाही, विलक्षण धर्मभोळेपणाच्या वेष्टणांनीं अगदीं झांकून गेलेल्या आहेत; आणि न्या. मू. रानडे यांनीं सामाजिक परिषदेंतील आपल्या व्याख्यानांत म्हटल्याप्रमाणें आपण तर आज असा काळ पाहत आहों कीं, ज्या वेळीं आपलें एकंदर जीवन विस्तृत झालें पाहिजे, त्यास अधिकाधिक विस्तृत होण्यास अवकाश ठेविला पाहिजे. पूर्वींचे सिद्धान्त व मार्ग जितक्या अंशानें त्यांत सत्यांश आहे तितक्या अंशानें ठीक आहेत. आणि त्या सत्यांशाचा परम आदरानें स्वीकार करून भावी सुधारणायुग अवतरणार आहे. तथापि आज जी परिस्थिति आहे, तीस अनुरूप अशी पूर्वींच्या मार्गांची घडी बसविली पाहिजे. आजच्या गरजांचा विचार झाला पाहिजे; असें झालें तरच सुधारणेच्या कामीं त्यांचा कांहीं उपयोग होण्याचा संभव आहे. खरें पाहिलें तर भक्तिपंथाचे जे प्रवर्तक त्यांचे विचार, त्यांचे उपदेश, त्यांच्या आकांक्षा सर्व कांहीं पवित्र जीवनास पोषक अशा आहेत. परंतु हें मात्र खरें कीं, आमचे साधुसंत जगाला, संसाराला अगदीं कंटाळले होते व

त्यांची अशी शिकवण आहे कीं हें सर्व व्यर्थ आहे, ही माया आहे, म्हणून संसाराचा त्याग केला पाहिजे; तरच आपली घडगत; आपण दैवावर सर्व हवाला ठेवून असलें पाहिजे; प्रयत्नशील असावयाची कांहीं आवश्यकता नाहीं, असा सर्व साधारण समज आहे. म्हणून आजच्या व भावी सुधारकाला जें कांहीं करावयाचें आहे, तें हें कीं, आज ज्या विश्वांत आपण नांदत आहों, त्याचा हेतु काय, त्याचा व आपला संबंध काय, हें सांगून, लोकांच्या असेंही लक्षांत आणून द्यावयाचें कीं, आपण जर सन्मार्गानें चाललों, प्रामाणिकपणें वागलों, देवाची व पापाची भीति मनांत वागवून वर्तलों व सत्कृत्यांत काळ घालविला, तर आपल्याला आपला स्वर्ग ह्या येथें, आपल्या हयातींत, सांपडेल. म्हणूनच गेल्या वर्षीं न्या. मू. **रानडे** यांनीं ज्या पक्षाचे ते व त्यांचे इतर मित्र आहेत त्याचा नित्याचा मंत्र **संजीवन** हा नसून **सुधारणा -प्रगति** हा आहे, असें अगदीं निक्षून सांगितलें.

परंतु भागवतधर्माविषयीं ही जी जागृति आज दिसून येत आहे, व आपला समाज व आपला धर्म ह्यांचें केवळ संजीवन नव्हे, तर त्याची सुधारणा झाली पाहिजे, असें जें वाटत आहे, तें कशामुळें ? एतद्देशीय ख्रिस्तीसमाजाच्या तर्फे येथें **ज्ञानोदय** नांवाचें जें पत्र प्रसिद्ध होत असतें त्याचा, न्या. मू. **रानडे** हे उपनिषदांत जुन्या कराराप्रमाणें आज्ञा असून, त्यांत एका ईश्वराची उपासना प्रतिपादिली आहे व सन्मार्गानें चालण्याचा उपदेश आहे, असें आमच्या प्रार्थनामंदिरांतील वेदीवरून कंठरवानें सांगतात म्हणून त्यांचेवर राग आहे ! न्या मू. रानडे यांनीं आपल्या धर्मानुशासन ह्या उपदेशांत म्हटलें आहे कीं, " आईबापांचा मान ठेवीत जा, या आज्ञेखेरीज ख्रिती आज्ञा निषेधपूर्वक आहेत, आमच्यांतील बहुतेक आज्ञा विधिपूर्वक आहेत. " ज्ञानोदयाचें म्हणणें असें आहे कीं, बायबलांतील

आज्ञा व उपनिषदांतील अनुशासन ह्यांची तुलना करणें, हें अगदीं अन्याय्य होय. उपनिषदांना देव हा पुरुष आहे, ही कल्पनाच मुळीं झालेली नाहीं व त्यांत दुसऱ्या पुष्कळ भाकडकथा आहेत. हा वाद फार जुना आहे. राममोहनरायांच्या वेळींही हा वाद होताच. म्हणून त्यांनीं Appeal to the Christian Public ह्या आपल्या लेखांत उपनिषदांवर भिस्त ठेवून भागावयाचें नाहीं; कारण देवाचें वास्तविक स्वरूप व त्याचे गुण यांविषयीं उपनिषदांनीं अज्ञानच प्रकट केलें आहे असें ज्यांस वाटत असे, त्यांस समर्पक उत्तर देण्याचा यत्न केला आहे. राममोहनरायांनीं तर बायबलांतून वाक्येंचीं वाक्यें उतरून घेऊन असें दाखविलें आहे कीं, ज्या विधानांबद्दल उपनिषदांस दोष दिला जात आहे, तशीं विधानें इतरत्रही आढळतात, बायबलांतही तशीं आहेत. पण ह्या वादांत पडण्याची माझी इच्छा नाहीं. कारण खुद्द न्या. मू. रानडे यांनीं ह्या टीकेस समर्पक उत्तर देऊन असें दाखविलें आहे कीं, आज आमच्या लोकांचे देवपूजेचे प्रकार ठीक नाहींत, भलत्याच मार्गांचें त्यांनीं अवलंबन केलें आहे तें, उपनिषदें फार झालीं, किंवा त्यांतील विचार त्यांच्या हाडीं मासीं भिनले म्हणून नव्हे, तर आपल्या पूर्वजांनीं ज्या परमेश्वराची मोठ्या भक्तीनें उपासना केली, तो आपल्याला साध्य नाहीं, तो दूर आहे, तो गूढ आहे, गूढप्रदेशीं आहे, अशी कल्पना करून घेऊन काल्पनिक देव पुढें करून त्यांचे देव्हारे माजविले म्हणूनच होय. तथापि हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या आधुनिक भागवतांविषयीं मी बोलत आहें, त्यांच्या ठिकाणीं बायबल किंवा मिशनरी ह्यांच्या द्वारें आपलें जें हित झालें आहे, त्याची जागृति नाहीं असें बिलकुल म्हणतां यावयाचें नाहीं. कांहीं लोकांना मिशनरींची हेटाळणी करण्याची व त्याचप्रमाणें त्यांनीं आजपर्यंत आमच्या कल्याणासाठीं जे उद्योग केले आहेत, जे परिश्रम केले आहेत व करीत आहेत,

त्याबद्दल आपली उपकृति प्रकट न करण्याची चटकच लागून गेली आहे, हें मला माहीत आहे. आज समाजामध्यें धर्म व सामाजिक व्यवस्था ह्यांविषयीं जी कांहीं जागृति दिसत आहे, ती ख्रिस्ती मिशनरींनीं जो प्रकाश आणिला त्याचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष परिणाम आहे. त्यांनीं जो प्रकाश दाखविला, त्याचे किरण सर्वत्र पसरलें व त्यांपासून पुष्कळ हित झालें आहे. ख्रिस्ती मिशनरींनीं आम्हांला शिक्षण दिलें व देशी भाषांतील ग्रंथांचें पुनरुज्जीवन केलें, त्यांचा उद्धार केला, आणि आजपर्यंत जे पुष्कळ मिशनरी होऊन गेले, त्यांच्यापैकीं डॉ. वुइल्सन, डॉ. मरे मिचल, डॉ. पोप, डॉ. किटल, डॉ. मिलर व डॉ. मरडॉक इतकीं नांवें जरी घेतलीं तरी हीं नांवें ज्या चळवळींच्या योगें लोकांचें हित झालें आहे, ज्या चळवळींनीं बहुजनसमाजास वर आणण्याचा प्रयत्न केला त्या अनेक चळवळींची व त्या चळवळींच्या द्वारें ह्या गृहस्थांची सदोदित आठवण करून देतील. परवां अहमदनगरामध्यें जो अनुभव आला, तो दृष्टीपुढें असतांना ज्याला सत्याची चाड आहे, असा कोणता मनुष्य ख्रिस्ती मिशनरीनें आपल्यावर जे उपकार केले आहेत, त्याबद्दल त्याचे उपकार स्मरणार नाहीं बरें ? ज्या वेळीं आम्ही सर्व लोक औद्योगिक सुधारणेविषयीं निव्वळ वाचाळता करीत आहों, आमचे उद्योगधंदे कसे सुधारतां येतील, याविषयीं केवळ चर्पट-पंजरी चालविली आहे, त्या वेळीं कांहीं गवगवा न करितां अहमद-नगरच्या ख्रिस्ती मिशनरींनीं आपण स्वतः मेहनत करून आम्हांस मार्ग दाखविला आहे ! रेव्ह. जेम्स स्मिथ व पेटिट औद्योगिक शाळा आम्हांस असा बोध करून देत आहेत कीं, खोट्या देशाभिमानाच्या भरीं पडून आमच्यांतील कांहीं लोक मिशनरींच्या संबंधानें तिरस्कार व्यक्त करितात. सर्व बाबतींत मिशनरी जें कांहीं सांगतात, तें सर्व आम्हांला मान्य जरी नसलें, तरी

अनेक बाबतींत ते मार्गदर्शक झाले आहेत, याविषयीं कांहीं संशय नाहीं. त्यांचीं उदाहरणें व त्यांचे बोध यांत आम्हांस घेण्यासारखें असें पुष्कळच असून त्यांचेपासून आम्हांस पुष्कळ प्रकाश प्राप्त होणार आहे. 'क्रास ऑफ ख्राइस्ट' या वाक्यांतही किती तरी अर्थ, जादू भरली आहे, हें परवां अहमदनगर येथील उद्योगशाळेला पैशाची जरूर आहे, असें कळतांच कानडा येथील एका गरीब विधवेच्या लहान मुलीनें आपले स्वकष्टार्जित ४ रुपये ह्या शाळेसाठीं पाठविले, ह्या एका गोष्टीवरूनही स्पष्ट होतें.

सारांश, धार्मिक बाबतींत व सामाजिक प्रकरणांत जी जागृति झाली आहे, तिचें कमी अधिक श्रेय मिशनरींना देणें, हें अगदीं योग्य आहे, आणि आधुनिक भागवतधर्मविषयक चळवळ हें त्यांच्या प्रयत्नाचें अप्रत्यक्ष फळ आहे असेंही म्हटलें पाहिजे. असा जरी प्रकार आहे, तरी न्या. मू. रानडे बायबलाच्या आधारें आपले धर्मोपदेश करीत नाहींत म्हणून त्यांच्यावर ज्ञानोदय रागावतो! उलट पक्षीं, कांहीं वर्षापूर्वीं त्यांनीं बायबलांतील वचनांच्या आधारें उपदेश केले म्हणून, जणूं काय आपल्या धर्मग्रंथांत यांना आधार घ्यावयास कांहीं सांपडतच नाहीं, असें म्हणून, पुण्याच्या मराठापत्रानें त्यांची खूप निंदा केली! परंतु ज्ञानोदय काय, किंवा मराठा काय, दोघांच्याही ह्या नव्या भागवतधर्माचें मुख्य धोरण लक्षांत आलेलें नाहीं. न्या. मू. रानडे ह्यांच्या मतें ह्या भागवतधर्माचे जे प्रवर्तक त्यांचा असा सिद्धान्त आहे कीं, नवीन जो घटनात्मक विचार त्यास बंधुभाव पायाभूत असला पाहिजे, व ह्या बंधुभावाचें बाहेरही वर्धन झालें पाहिजे आणि जे आंत आहेत त्यांच्यांत दिवसेंदिवस अधिकाधिक निकट भाव उत्पन्न झाला पाहिजे. भागवत–धर्माच्या प्रसाराचें कार्य राष्ट्रीय पद्धतीनेंच चालेल; म्हणजे ज्या आमच्या जुन्या साधु-

संतांनीं हस्तपादादि क्रियांचा जो धर्म त्याचा त्याग करून भक्तिभावास प्राधान्य दिलें, व सर्वांस विश्वधर्म उपदेशिला त्या संतांच्या चरणीं लीन होऊन त्यांचेच बोध आधारभूत घेऊन आणि हें कार्य करीत असतां ख्रिस्ताचा जो धर्म, ख्रिस्ताचा जो उपदेश, ख्रिस्ताचें जें हृद्गत त्याच्यापासून जेवढें म्हणून साहाय्य होण्या-सारखें असेल तेवढें आम्ही घेऊं. प्रार्थनासमाज ही एक जी आपली लहानशीच संस्था आहे, ती स्थापन झाल्यास आतां ३० वर्षें होऊन गेलीं. त्याच्याबरोबर ज्या इतर संस्था स्थापन झाल्या, त्या जशा स्थापन झाल्या तशा विरामही पावल्या, आतां त्यांचीं नांवेंही कोणास आठवत नाहींत, परंतु आमची ही संस्था अद्याप चालू आहे. आमच्या ह्या संस्थेनें आजपर्यंत पुष्कळ कार्य केलें आहे, किंवा हजारों आणि लाखों लोकांनीं प्रार्थनासमाजास मान्य अस-लेल्या तत्त्वांचा अंगीकार केला आहे, असें म्हणण्याचा भाग नाहीं. परंतु आमचा समाज निदान एक कार्य तरी आज ३० वर्षें अगदीं नियमानें करित आहे. आणि तें हें कीं, प्रत्येक आठवड्यास अगदीं नियमानें डॉ. भांडारकर किंवा न्या. मू. रानडे यांच्यासारखीं व इतर कमी अधिक अधिकाराचीं माणसें, आपल्या व इतर धर्मग्रंथां-तील वचनांच्या आधारें धर्माचीं प्रमेयें व आपला नित्याचा व्यवहार यांचा कसा निकट संबंध आहे, व त्यांचा आपल्याला आपल्या नि-त्याच्या संसारांत कसा उपयोग करितां येईल, हें सांगत असतात. त्याचप्रमाणें सत्यनिष्ठा, व्यवहारांतील प्रामाणिकपणा, आपापसांतील नेकीचे व्यवहार, दीनांविषयीं अंतःकरण कळवळून त्यांच्या साहाय्या-साठीं धांवणें, व कितीही थोर माणसाशीं संबंध आला तरी न्याय व सत्यनिष्ठेपासून मुळीं सुद्धां न ढळणें ह्या सर्व गोष्टींचा धर्मामध्येंच कसा अंतर्भाव होत असतो, हेंही नित्य त्यांच्या सांगण्यांत येत असतें. आपल्या साधुसंतांना नित्य आपल्या सहवासांत त्यांनीं

आणिलें असून ते आपलें जीवन उच्च दर्जाचें करीत आहेत. नाहीं तर साधारण लोकांमध्यें त्यांच्या नांवाचा गजर करून त्यांची केवळ बाह्य साधनांनीं पूजा होते, किंवा आपण मोठे देशाभिमानी आहों असें दाखविण्यासाठीं व अज्ञ लोकांचा जो भाव आहे, तो तसाच ठीक असें सांगून त्यांचें पुढारीपण आपल्याकडे घेण्यासाठीं मात्र त्यांच्या नांवाचा उपयोग केला जातो! परंतु ज्या भागवतधर्मीयांविषयीं मी दोन शब्द आपणास सांगत आहें, ते केवळ जुनें जसें आहे, तसें न घेतां त्यांतील जो ग्राह्यांश त्याचा परम आदरानें स्वीकार करून ख्रिस्तीधर्मांतील जो उत्तमांश त्याचाही विचार व आदर करावयास तयार आहेत. कारण, ख्रिस्त झाला तरी तो एक भक्तच होता. प्रेमाचें वर्चस्व त्यानें उपदेशिलें आणि भक्तिमार्गाचें परमरहस्य तर प्रेम हेंच आहे. मग अशा प्रकारचें आमचें विवेचन ऐकून पुष्कळ लोक नित्य असा प्रश्न करितात कीं, तर मग आजपर्यंत आपण किती लोकांना आपल्या मताचें बनविलें? ज्यांचा ह्या संस्थेवर विश्वास बसलेला नाहीं, व ज्यांस संस्थेविषयीं अंतस्थ माहिती बिलकूल नाहीं, असे लोक हा प्रश्न नेहमीं करितात. आणि त्यांत कांहीं नवल नाहीं. कारण, माणसाचा मोठेपणा ज्या काळीं त्याच्या धनसंचयावरून ठरला जात आहे, त्या काळीं संस्थेची उपयुक्तता आंतील लोकांच्या संख्येवरून ठरविण्याची बुद्धि झाली तर त्यांत वावगें कांहींच नाहीं. ह्या बाबतींत परवां न्या० मू० रानडे ह्यांनीं आपल्या एका धर्मपर व्याख्यानांत म्हटल्याप्रमाणें, हेंहीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पुष्कळ लोकांना आमच्या समाजाचीं तत्त्वें अगदीं तंतोतंत मान्य असतात, त्यांत त्यांना वावगें असें कांहींच दिसत नाहीं, पण देवाची उपासना करावयास **समाजा**ची कांहीं आवश्यकता आहे, असें त्यांना वाटत नाहीं! पण, न्या. मू. रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें ही आपली कांहीं तरी सबब आहे झालें, खरा

प्रकार असा आहे कीं, भगवद्गीतेंतल्या अर्जुनाप्रमाणें पुष्कळांची स्थिति झालेली असते. अर्जुनाला देवाचें सौम्य, व आनंद स्वरूप तेवढें पहावयास हवें होतें. रागीट, किंवा क्रूर अगर भयंकर स्वरूप पहावयासहि नको होतें. तसलाच हा प्रकार आहे. जेव्हां आपण एखाद्या संस्थेचे सभासद होतों, त्या संस्थेचीं तत्त्वें आपल्याला आपलींशीं करावयाचीं असतात, त्यांच्याशीं आपल्याला एकजीव व्हावयाचें असतें, तेव्हां आपल्याकडे अमुक एका संस्थेचे घटक ह्या दृष्टीनें लोक पहातात, व त्या संस्थेचें जें ध्येय तें पुढें आदर्शवत् ठेवून आमच्या आचरणाचा विचार होत असतो; व त्यावर बरी वाईट टीका होत असते. आणि माझ्या मतें ह्यांत वावगें असें कांहींच नाहीं. म्हणून आधीं अशा संस्थेला मिळून पुढें मागें टीकेला पात्र होण्यापेक्षां व कोठें ह्या संस्थेला जाऊन मिळालों अशी टोंचणी मनाला लावून घेण्यापेक्षां, संस्थेपासून दूर राहणेंच पुष्कळांना बरें वाटतें. ज्या संस्थेनें सामाजिक किंवा धर्मविषयक सुधारणेचें कार्य आपल्या शिरावर घेतलें आहे त्या संस्थेला जाऊन मिळावयाचें, तर आपण जें कांहीं बोलतों व जें कांहीं करितों त्याबद्दल आपल्यावर मोठीच जबाबदारी येऊन पडते. त्यापेक्षां आहों त्या जातींत राहिलें, जुन्यांतलेच आपण आहों, असें दाखविलें, कीं मग काय वाटेल तें बोलावें व हवें तें करावें! मग आपल्यावर टीका करावयाचा हक्क कोणास पोंहोंचत नाहीं, एवढेंच नव्हे, तर उलट जे कोणी आपल्याला सुधारक म्हणवून घेत आहेत त्यांचेवर वाटेल तशी टीका करावयाचा अधिकार आपल्याला सहजच प्राप्त होतो! आमच्या समाजांत आजपर्यंत थोडे लोक कां दाखल झाले? त्याचें न्या. मू. रानडे ह्यांनीं हें कारण सांगितलें आहे व तें पुष्कळांस,—सर्वांस असें म्हणणें बरोबर होणार नाहीं, लागू पडतें यांत कांहीं संशय नाहीं. एका लहानशा संस्थेचा मी मोठा बडेजाव सांगत आहें, असें माझे कित्येक मित्र म्ह–

णतील, हें मी जाणून आहें; संख्येनें आम्हीं अगदीं अल्प आहों, व आमच्यापुढें जें ध्येय आहे, जीं तत्त्वें आहेत, त्यांस अनुरूप असें आमचें आचरण नसतें, ही अत्यंत लाजीरवाणी गोष्ट आहे, हेंहीं मी कबूल करितों. आमचें जें उच्चतम ध्येय त्यास न शोभण्यासारखें आमचें आचरण असतें, हें जरी खरें आहे, तरी आमची दृष्टी पुढील कालाकडे आहे; त्या काळासंबंधाच्या आमच्या ज्या अपेक्षा त्या स्वप्नवत् होत, असें जरी कित्येकांस वाटतें, तरी त्या काळीं आमच्या आशा फलद्रूप होणार, अशी आमची खात्री आहे. मागें एकदां चालू इतिहास देवाचें कार्य घडवून आणीत आहे असें मीं म्हटलें व त्याबद्दल उदाहरणें दिलीं म्हणून मी कित्येकांच्या रागास पात्र झालों, व एका टीकाकारानें ह्या शतकांत घडणाऱ्या गोष्टी दृष्टीपुढें ठेवून पुढें सुवर्णकाल म्हणजे सर्वपरीं उत्तम काळ येत आहे, असें प्रतिपादणें हें फार धोक्याचें आहे, असें निक्षून सांगितलें. ही जी सूचना माझ्या ह्या टीकाकारानें केली आहे तिचा मी नम्रभावानें स्वीकार करितों. परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हे माझे टीकाकार फारतर गेल्या दोनतीनशें वर्षांचा इतिहास मनांत आणून मजवर आक्षेप घेत आहेत, आणि मी तर पुष्कळ पुष्कळ शतकें मागें जात आहें, म्हणजे ज्या कालांचा आपल्याला कमी अधिक प्रमाणानें इतिहास माहीत झाला आहे, त्या सर्व काळांचा विचार करून मी म्हणतों कीं, जुन्या यहुदी लोकांप्रमाणें, आम्ही नित्य चुका करीत आलों आहों, आमच्या साधूंनीं, आमच्या संतांनीं, आमच्या थोर पुरुषांनीं वेळोवेळीं आम्हांला ज्या सूचना केल्या, त्यांच्याकडे आम्हीं बिलकुल लक्ष दिलें नाहीं, म्हणूनच आतां जणूं काय देवच भागवतधर्माच्या द्वारें, आर्यसमाज, ब्राह्मसमाज, व प्रार्थनासमाज ह्यांच्या द्वारें एक आश्रयाचें स्थान सिद्ध करीत आहे. आपण म्हणाल ही केवळ छाया आहे, भास आहे, पण छाया तर

छाया, भास तर भास; पण जीवंत जागृत भास आहे, कारण देशाचा उद्धार सच्छीलतेनें, साधुत्वानें होतो, वेडगळ विचार, वेडगळ समजुती व धर्मभोळेपणा ह्यांना चिकटून बसून होत नाहीं, हा विश्वास त्यास आधारभूत आहे. ही भागवतधर्माची चळवळ आज अल्प प्रमाणावर चालू आहे, हें खरें. परंतु ज्यांना पुढें मोठ्या चळवळींचें स्वरूप आलें, अशा पुष्कळ चळवळींचा प्रारंभ प्रथमतः अगदीं अल्प प्रमाणावरच झालेला आहे, आणि देवही धिमे धिमेपणेंच आपलें कार्य अशा संस्थांच्या व त्यांतील माणसांच्या द्वारें घडवून आणीत असतो. ह्या संस्थांचे जे प्रवर्तक आहेत, जे पुढारी म्हणून समजले जात आहेत, त्यांस निदान इतकें तरी खात्रीनें म्हणतां येईल कीं, जरी आम्हीं कांहीं विशेष कार्य करून दाखविलें नाहीं, व जरी आमच्या खऱ्या व मुख्य कार्यास अद्याप खरें पहातां प्रारंभही झालेला नाहीं, तरी लोकांचा जो धर्मभोळेपणा व अज्ञानमूलक समजुती त्यांचा फायदा घेऊन त्यांस आम्हीं नाचविलें नाहीं, एवढेंच नव्हे, तर आपले व परदेशींचे जे साधुसंत त्यांच्या चरित्रांचे हेतु, त्यांच्या उपदेशांचें रहस्य, त्यांच्या मार्गाची खरी योग्यता हीं स्पष्टपणें लोकांस विशद करून सांगण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहों, आणि तें अशासाठीं कीं, त्यांच्या जीवनाचें जें रहस्य तें एकदां आपलेसें व्हावें, आमचें जीवन व आमच्या सर्व चळवळी ह्यांचें तें केंद्रस्थान व्हावें व आमचीं सर्व कार्यें मोठ्या उत्साहानें व्हावींत. हें कार्य खरें राष्ट्रीय होय. यांत खरा देशाभिमान ओतप्रोत भरलेला आहे; कारण, अशा धोरणानें कार्यास लागल्यावर आपल्या वैगुण्याविषयीं ज्याप्रमाणें जागृति असते, त्याचप्रमाणें आपल्या हातून पुढें जें महत्कार्य व्हावयाचें आहे, त्याचीं साधनें आपल्यापाशींच आहेत, हेंही अशीं माणसें जाणून असतात.

---

# ईश्वरी प्रेरणा.

माझे नव्हती बोल मज कैंची वाचा ।
श्रीहरि गुणांचा पार कळे ॥ १ ॥
मागें ऋषिसंतीं मात सांगितली ।
माझी मज केली वाचा तैसी ॥ २ ॥
मना आलें तरी मानावें वचन ।
मिथ्या अभिमान देह सांडा ॥ ३ ॥
माझ्या देवाजीसी मागा प्रेमदान ।
होतील खंडण तापत्रय ॥ ४ ॥
तुका म्हणे मनीं स्मरा हरिनाम ।
तेव्हां होय श्रमपराभव ॥ ५ ॥

तुकोबा कीर्तनें करीत असत, हें आपणांस माहित आहे. तीं अंतःकरणास कशीं हालवून सोडणारीं असावींत, याची आपणांस कल्पना करितां येते. असें दिसतें कीं, अशा प्रकारचें एक कीर्तन आटोपल्यावर, श्रोत्यांपैकीं एकानें तुकोबास प्रश्न केला कीं ' ईश्वराचा महिमा इतक्या उत्कटतेनें गाण्यास तुम्ही समर्थ कसें होतां ! तुम्हीं तो स्वतः गातां एवढेंच नव्हे, तर तुमचें कीर्तन चाललं असतां श्रोत्यांच्या मनाला देखील आपण देवाच्या सहवासाचा प्रत्यक्ष लाभ घेत आहों, असें वाटतें, हें कसें ! ' हा प्रश्न विचारणाऱ्याच्या मनाच्या स्थितीची आपल्याला कल्पना करितां येण्यासारखी आहे. त्याला स्वतःला ईश्वराचें नामसंकीर्तन करितां येत नसावें. त्याच्या वैभवाचें वर्णन करितां येत नव्हतें, त्याला

देवाचा सहवास प्रत्यक्ष घडत नव्हता, म्हणून त्याला वाटलें कीं तुकोबामध्यें अशी काय जादू भरली आहे, कीं तिच्यायोगें जो ईश्वरी साक्षात्कार एरवीं श्रोतृवृंदाला होणार नाहीं, तो तुकोबा त्यांना प्राप्त करून देत असे? मला वाटतें, आपणांपैकीं पुष्कळांना कधीं कधीं असेंच कौतुक वाटत असतें.

वरील अभंगामध्यें तुकोबांनीं हें कोडें उकलिलें आहे. ते म्हणतात, ' जे शब्द माझ्या तोंडावाटे पडतात, ते माझे नव्हत. पुष्कळदां श्रीहरीच्या अपार गुणांचा महिमा गाण्याचें माझ्या वाणीमध्यें सामर्थ्य नसतें. मी जें करितों, तें एवढेंच कीं, पूर्वीं आपल्या ऋषिमुनींनीं जो मार्ग आपणांस दाखविला आहे, त्याचें अवलंबन करून त्यांना ईश्वराचा महिमा गाऊन ज्याप्रमाणें आनंद होत असे त्याप्रमाणें मला जो आनंद होतो, तो उघड करून दाखविण्यास मीं माझी वाणी तदनरूप केली आहे, मी जें बोलतों व करतों त्याजवर तुमचा विश्वास असेल तर देहाविषयीं मिथ्या अभिमान सोडून द्या. ' मी ' म्हणून जो आहे, तें हें माझें शरीर आहे, या शरीराव्यतिरिक्त दुसऱ्या कशानेंही प्रेरणा होणें नाहीं, असा भ्रम होतो. आतां तुम्ही असें विचाराल कीं, ऋषिमुनींनीं दाखविलेला मार्ग तो कोणता? तो मार्ग फार सोपा आहे. देवापाशीं अनन्यभावें असें मागा कीं, हे परमेश्वरा, शुद्ध प्रेमामुळें प्राप्त होणारा जो आनंद तो मला दे. तुम्हांस तें प्रेम व तो आनंद मिळाला म्हणजे तुमच्या सर्व श्रमांचें व दुःखांचें निरसन झालेंच असें समजा. नित्य देवाचें नामस्मरण करा; त्याच्या प्रेमाचें गान चालू द्या, त्याच्या प्रेमाचें स्मरण ठेवा; आणि मग तुम्हांला सर्व कांहीं सुसाध्य येईल. '

मनुष्य हा नेहमीं विचार करणारा प्राणी आहे, असें त्याचें वर्णन करितात; पण मला वाटतें त्याचा विशेष गुण म्हटला म्हणजे

त्याची वाणी होय. त्या वाणीच्या योगें तो आपल्या बांधवांना चांगलें किंवा वाईट आचरण करण्यास प्रवृत्त करतो. योग्य वेळीं योग्य शब्द बोलल्यामुळें म्हणजे अर्थात् ज्या वेळीं जसा पाहिजे तसा बोध मिळाल्यामुळें पुष्कळांच्या जन्माचें कल्याण झालें, अशीं आपणांस पुष्कळ उदाहरणें देतां येतील. यावरून हें उघड होतें कीं, एकमेकाचें मन वळविण्याचें सामर्थ्य एकमेकांमध्यें असतें. मनुष्य म्हणजे त्याचें क्षुद्र शरीर एवढेंच नाहीं. एखाद्या गोष्टीची वाखाणणी करण्याचें सामर्थ्य मनुष्यामध्यें आहे, यावरून दिसून येतें कीं, तो मनुष्य ज्याची वाखाणणी करितो, तें निदान बीजरूपानें तरी त्याच्यामध्यें असतेंच. तो जें पाहतो, त्यायोगें खळबळ उडून जाण्यासारखें त्याच्या अंतःकरणामध्यें कांहीं नसेल तर मग जगांतील अतिशय थोर व प्रौढ वस्तू या जणूं काय कांहींच नव्हत, असें त्याला वाटलें असतें. पेट्रार्च याजविषयीं असें सांगतात कीं, तो एकदां आल्प्स पर्वताच्या उंच शिखरावर चढला व आपल्या खालील भव्य पर्वताकडे त्यानें नजर फेंकली. त्यानें स्वतःस प्रश्न केला कीं हें सर्व पहाणारें कोण आहे ? स्वार्थी उदास व क्षुद्र अशा मनुष्यास हा सभोंवतालचा देखावा पाहून त्याचें कौतुक वाटणार नाहीं ! त्यानें स्वतःला उत्तर दिलें कीं, ' ह्या बाहेरच्या विश्वासारखें जें एक स्वतंत्र विश्व मजमध्यें आहे, त्याला ह्या बाह्य विश्वाच्या संवेदना होत असतात व त्यायोगें देखाव्याचें स्वरूप, मला उन्नत दिसत आहे.' कँट देखील असेंच म्हणतो: ज्या दोन गोष्टींमुळें त्याला आश्चर्य वाटलें, त्या गोष्टी म्हणजे वरील आकाशांतील तारे व आंतील मन ह्या होत. मनुष्यामध्यें अनंताचा अंश बीजरूपानें वास करीत आहे, म्हणूनच त्याला दुसऱ्याविषयीं सहानुभूति वाटते व आपल्या आत्म्याशीं तादात्म्य करितां येतें.

आपल्या स्वभावाचा ही बाजू, म्हणजे अपारता, तिची आपणांपैकीं पुष्कळांना जाणीव नसते, म्हणून तिची वाढ होत नाहीं, यामध्यें आश्चर्य तें काय? ज्या अभंगाचा आपण वर विचार केला, त्या अभंगावरून, तुकोबांनीं त्या बाजूची वाढ कशी केली, हें दिसून येतें. त्यांनीं जें केलें, तसें करण्याचा आपणांपैकीं प्रत्येकाला प्रयत्न करितां येईल.

ईश्वरापुढें उभें राहून प्रत्येकाची अशी प्रार्थना असावी कीं, "मी दुसऱ्यावर प्रेम करीत जाईन; जगामध्यें सर्वत्र सौंदर्य व लावण्य नांदत आहे; परंतु जगांतील या सर्व सृष्टिसौंदर्यापेक्षां मनुष्याचा आत्मा अधिक सुंदर आहे; मी त्याच्यावर प्रेम करीन; हे ईश्वरा, माझी सदा प्रेममय वृत्ति असू दे! माझ्या आत्म्याचें खरें जीवन प्रेमच आहे."

---

## सौंदर्याची आवड.

---

मुण्डकोपनिषदाच्या प्रथमारंभींच पुढील श्लोक आहे:—

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाꣳसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥

या श्लोकांतील अर्थाचें आपल्यांपैकीं प्रत्येकानें मोठ्या आस्थेनें मनन करावयास पाहिजे. यामध्यें ह्मटलें आहे कीं 'ईश्वरा, जगामध्यें भद्र ह्मणजे सुंदर जें आहे, त्याचें श्रवण आमचे कान करोत, आमचे डोळे तें पाहोत, आणि आह्मी आमचीं गात्रें बळकट करून ईश्वरानें आमच्या नशीबीं जें आयुष्य ठेविल आहे, तें आम्ही पूर्णपणें मिळवूं या.'

आह्मांस आमच्या आयुष्याचा मार्ग दाखविण्याकारितां या श्लोकांत जें ध्येय सांगितलें आहे, त्यापासून आम्ही च्युत झालों आहों, ह्मणून हा श्लोक वाचीत असतांना आह्मांस लज्जा वाटल्यावांचून रहाणार नाहीं. यांतील ध्येयाला आम्ही आजचे लोक किती पारखे झालों आहोंत ! जगांतील सौंदर्याचें निरीक्षण करणें व त्याच्याविषयीं मनांत विचार करणें, या गोष्टी आह्मांस आतां क्वचित्‌च सुचतात. फार काय सांगावें, आरोग्याची महति आह्मांस समजेनाशी झाली आहे ! वरील श्लोकांत फक्त तशा प्रकारची इच्छा दर्शविलेली आहे, पण ती गोष्ट व्यवहारांत कधींही आलेली नसेल, येथवर ह्मणण्याची देखील आमची सध्यांची स्थिति झाली आहे. परंतु ही गोष्ट खरी नाहीं. असा एक काळ होता कीं, त्या वेळीं या देशांतील लोकांचें सृष्टि-सौंदर्याकडे विशेष लक्ष होतें व त्यांचीं शरीरें मजबूत व उत्साही असत पूर्वींचे स्तूप, त्यांतील भव्य दिवाणखाने, मोठमोठीं कोरींव लेणीं, व देवळें हीं ज्या लोकांनीं बांधलीं त्या लोकांमध्यें किती शक्ति व उत्साह असला पाहिजे, याची साक्ष तीं देतात. हीं स्मारकें ज्या लोकांनीं मागें ठेविलीं आहेत, त्यांमध्यें पूर्ण उत्साहशक्ति आणि सृष्टिसौंदर्याविषयीं अलोट प्रेम नव्हतें असें म्हणतां येईल काय ?

आपण आपलीं जुनीं काव्यें वाचाल तर आपणांस कळून येईल कीं, आमच्या श्रेष्ठ ग्रंथकारांच्या ठिकाणीं सर्व प्रकारच्या सौंदर्या-विषयीं अतिशयच आवड असे. त्यांनीं आपल्यांमध्यें सौंदर्यशक्तीची वाढ केलेली होती व शारिरिक व मानासिक आरोग्याची त्यांना फार किंमत वाटे. त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांमध्यें फुलें, झाडें, नद्या व पर्वत यांच्याविषयींचें प्रेम ओतप्रोत भरलेलें आढळतें. सृष्टीच्या कोण-त्याही रूपामध्यें त्यांना तिजविषयीं सहानुभूति वाटत असे.

पूर्वींच्या वैभवसंपन्न कालांतील तें वैभव आपणांस पुनः अंशतः प्राप्त व्हावें यात्रिषयीं सध्यां आपल्यांमध्यें थोडी जागृति झालेली

दिसते, परंतु ज्याविषयीं आपण तपास करणार तें काय आहे, सौंदर्य ह्मणजे काय आणि तें मिळविण्यास काय खटपट केली पाहिजे, या गोष्टी जोंपर्यंत आपल्या स्पष्टपणें ध्यानांत येणार नाहींत, तोंपर्यंत आपली इच्छा साध्य होईल, असें मला वाटत नाहीं. फक्त बाहेरचा आकार व रंग हें त्या पदार्थांचें सौंदर्य नव्हे. सौंदर्य हें आंत असतें. परंतु आपणांस हेंही विसरतां कामा नये, कीं आंतील सौंदर्य आपल्या बाहेरच्या चालीरीतींमध्यें व आचाराविचारांमध्यें दिसलेंच पाहिजे.

सर्व लोकांस साधारण, असा जरी सौंदर्याचाही अर्थ आहे, तरी त्याची वाढ मोठ्या काळजीनें केली पाहिजे. डोळे आणि कान यांना अशा प्रकारचें वळण लावलें पाहिजे कीं, जेव्हां जेव्हां त्यांना सौंदर्य दिसेल, तेव्हां तेव्हां त्याविषयीं त्यांच्यामध्यें आवड उत्पन्न झाली पाहिजे. सौंदर्याचा आपल्या कानांवर व डोळ्यांवर तात्काळ परिणाम झाला पाहिजे, पण तो दोषरहित असावा. आपलीं गात्रें तीक्ष्ण तर असावींच, पण तीं बळकटही असावयास पाहिजेत, असें वरील श्लोकांत ह्मटलें आहे. कारण तीं तशीं नसतील तर इंद्रियांच्या नुसत्या तीक्ष्णपणानें आपणांस सौंदर्याचें मर्म कळणार नाहीं. आरोग्याशिवाय जीवित ओझ्यादाखल आहे. जेव्हां शरीरप्रकृति दृढ असेल, तेव्हांच आनंद व संतोष यांचें सुख प्राप्त होतें.

**याज्ञवल्क्य** ऋषीचेंही आपणांस असेंच शिकविणें आहे. तो म्हणतो कीं '**कोणताही मनुष्य ८० वर्षांचा झाल्याशिवाय त्याची स्तुति करूं नये.**' मला वाटतें, या म्हणण्याप्रमाणें पुष्कळ शहाणपण आहे. कारण मनुष्य या वयाचा झाला म्हणजे त्यानें योग्य रीतीनें आपल्या शरीराची जोपासना केली, शरीरास पूज्य मानून तें सुंदर व पवित्र ठेविण्याचा प्रयत्न केला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तो सर्व गोष्टींमध्यें व्यवस्थेशीर व नेमस्त असला पाहि-

जें, व्यायाम दररोज करीत असला पाहिजे, स्वच्छपणा व पवित्र-पणा यांची किंमत तो पूर्णपणें जाणत असला पाहिजे, त्याची इच्छा-शक्ति प्रबळ असली पाहिजे.

ह्या सर्व गोष्टींची आमच्या सुशिक्षित तरुणांना विस्मृति झाली आहे व त्यांना त्यांची चाड नाहीं, असें दिसतें. आपल्या अभ्यासाच्या पाठीमागें सतत लागल्यामुळें ते आपल्या प्रकृतीची हेळसांड करितात, व मग याचा परिणाम जो व्हावयाचा तो होतोच. ते आजारी पडतात आणि वारंवार त्यांना आपला अभ्यास बंद करणें भाग पडतें. एवढेंच नाहीं, तर कधीं कधीं तरुण सुशिक्षित लोक यामुळें अकालीं मरण पावतात. ईश्वरानें आपणांस हें आयुष्य अनामत ठेव म्हणून दिलेलें आहे, आणि या आयुष्यामध्यें आपण आपलीं कर्तव्यें करून त्याची जतन केली पाहिजे ही गोष्ट आपणांपैकीं पुष्कळांना समजत नाहीं, हें यावरून उघड होतें.

याच दृष्टीनें आपण आयुष्याचा विचार केला, तरच तें आपणांस सुखावह व आनंददायक होईल. आपल्या जीवनाचा आपण याच दृष्टीनें विचार केला पाहिजे व आपल्या आयुष्यासंबंधानें हीच भावना योग्य होय. खऱ्या सुखाकरितां आपलीं कर्तव्यें योग्य रीतीनें आपल्या हातून व्हावींत म्हणून हें तत्त्व समजणें फार महत्त्वाचें आहे. सृष्टीमध्यें नियम, पात्रापात्र विचार, शिस्त व परस्पर-संबंध आहे.

अशा प्रकारें जगांतील वस्तूंविषयीं आपली वृत्ति झाली व त्या बरहुकूम आपल्या आयुष्याचें नियमन केलें असतां, जगाची किंमत आपण योग्यपणें जाणण्यास समर्थ होतों. आपल्याला जें चर्मचक्षूंनीं दिसतें त्यांतच सौंदर्य आहे असें नव्हे. जें कांहीं बाहेर दिसतें तें फक्त आंतल्याचें प्रतिरूप किंवा चिन्ह असतें; म्हणून आंतलें सौंदर्य

आपल्याला चर्मचक्षूंनीं न दिसतां तें पाहण्यासाठीं ज्ञानचक्षु, आपले दिव्यचक्षु, उघडले पाहिजेत. ज्यांनीं आपली इच्छाशक्ति वाढविली आहे, ज्यांचीं मनें स्थिर,समतोल,व शांत आहेत अशांनाच जगचालक जो परमेश्वर त्याच्याशीं तादात्म्य करून घेतां येतें, आणि मनाची अशा प्रकारची रचना ठेवून जेव्हां ते जगाचा विचार करितात, तेव्हांच त्यांच्या अंतःकरणास संतोष होतो, व मग तीं पवित्र व उन्नत होतात. अशाच मंगल प्रसंगीं, मनुष्याच्या अंतःकरणामध्यें ईश्वराचा अनुग्रह होतो; दया व धैर्य हीं तेथें उदित होतात; ज्या अतिपरिचयाच्या पडद्याखालीं साधारण देखाव्यांचें सौंदर्य लपून राहिलेलें असतें तो आड पडदा नाहींसा होतो; गृहसुखाची गोडी व शुद्ध प्रेमामुळें उत्पन्न होणारा आनंद, यांची किंमत कळते व परमेश्वरानें आपलें हें जीवित इतकें सुंदर व आनंदी केलें आहे, त्याबद्दल आपण ईश्वराचे उतराई होऊन आपल्या अंतःकरणामध्यें त्याजविषयीं आदरबुद्धि उत्पन्न होते.

---

## दिवाळीचा पुण्य संदेश.

दिवाळी हा मोठा दैवी उत्सव आहे. हिंदूंचा तर तो सर्वांत मोठा सण आहे. ज्याच्या ठिकाणीं आपलें आर्यत्व, आपला धर्म आणि आपले पूर्वज ऋषि यांच्या संबंधाची स्मृति जागृत आहे, अशा कोणाही हिंदूच्या मनांत दिवाळीविषयीं विचार येतांच त्यामध्यें त्याला स्वतःस बोधकारक, व स्फूर्तिकारक, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, स्वतःचा आयुःक्रम शुद्ध, व दैविकसंपत्तियुक्त करण्याची महत्त्वाकांक्षा अंतःकरणांत जागृत करणाऱ्या अशा बऱ्याच गोष्टी आढळून आल्याशिवाय राहणार नाहींत. रोषणाईचा लखलखाट

करून आणि मिष्टमिष्ट पदार्थ सेवन करून आबालवृद्ध दिवाळीचा सण साजरा करितात; परंतु दिवाळीच्या दिवसांत हिंदुलोकांच्या घरोघरीं होणाऱ्या दीपोत्सवापासून आणि मिष्टपदार्थसेवनापासून जो हा आनंदी आनंद होत असतो, तो हृदयांतर्गत प्रेमाचें, गृहसौख्याच्या माधुरीचें, कुटुंबांत नांदणाऱ्या ऐक्याचें, स्नेहभावयुक्त आगत स्वागताचें बाह्य चिह्नच होय. हीं सुखें उत्पन्न व्हावीं, असलेल्याचें नवीकरण व्हावें, हाच प्राचीन काळापासून दिवाळीच्या उत्सवाचा हेतु आहे. 'दिवाळी' म्हटल्याबरोबर शांति व धर्मनिष्ठा हीं सूचित झालीं पाहिजेत. दिपवाळीच्या महोत्सवामध्यें इंद्रियविषयक अशा सुखांशिवाय दुसरींहि सुखें आहेत. तीं ज्याला दिसत नाहींत व उपभोगितां येत नाहींत, तो हिंदु असला तरी नांवाचाच हिंदु म्हटला पाहिजे. खऱ्या हिंदूचें अंतःकरण इतकें दुर्बल, उच्च सुखास्वाद घेण्यास असमर्थ, असें कधींहीं नसतें.

आपल्या पूज्य ऋषींनीं व्यावहारिक ज्ञानदृष्टीनें मनुष्याच्या आयुष्याचे चार विभाग यथाक्रम केलेले आहेत. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, आणि संन्यास, हे ते चार विभाग होत. ब्रह्मचारी व वानप्रस्थ या दोन आश्रमांचेंच हिंदुधर्मांत व वेदान्तपर ग्रंथांत जास्त महत्त्व मानिलें आहे; व तोच आयुष्यक्रम सर्वांत श्रेष्ठ, असें त्यांत सांगितलेलें आहे, अशी कित्येकांची समजूत आहे; परंतु ती चुकीची होय. ऋषी हे त्या काळचे सर्वांत ज्ञानसंपन्न पुरुष होते. त्यांना गृहस्थाश्रमाचें महत्त्व कळून चुकलें होतें. कुटुंब म्हणजे समाजाचा पाया आहे; आणि नुसते जीवितास उदात्तता प्राप्त करून देणारेंच नव्हे, तर लोकसमुदायास श्रेष्ठत्व प्राप्त करून देण्याच्या कामीं साहाय्यभूत होणारे सद्गुण गृहस्थाश्रमांतील कर्तव्यक्षेत्रांत वावरूनच संपादितां येतात, हें ऋषींना पूर्णपणें अवगत होतें. सन्मार्गानें अर्थार्जन करणारा, सम्यक्–ज्ञानानें संपन्न, अति-

थिप्रिय, श्राद्धादि विधि करणारा आणि सत्यवादी असा गृहस्थाश्रमी मनुष्यहि मोक्षाप्रत जातो, असें याज्ञवल्क्य ऋषीनें म्हटलें आहे. विष्णुपुराणांत तर गृहस्थाश्रम हा सर्वांत श्रेष्ठ व उदात्ततम, असा मानिलेला आहे.

गृहामध्येंच प्रेमाचा पहिला धडा आपण शिकतों. प्रेमाचा दीप तेवत नसला तर, जग भयाण, निराशापूर्ण भासेल, आणि जीवित दुःखमय, केवळ भारभूत असें वाटेल. प्रेमप्रकाशाचें उगमस्थान म्हणजे गृहच होय. जें जें कांहीं मनुष्याला चांगुलपणा देणारें आहे, जें राष्ट्रीय महत्त्व प्राप्त करून देणारें आहे, आज्ञाधारकता, स्वार्थ-त्याग, आणि कर्तव्यें मग तीं कितीही क्षुल्लक असोत, तीं निष्ठापूर्वक करण्याची प्रवृत्ति, हे सर्व गुण गृहांमध्येंच आढळतात, आणि ते शिकण्याची उत्कृष्ट जागाहि पण तीच. गृह अर्थात् कुटुंब हें जगाचा एक भाग असून 'पिंड ब्रह्मांड' न्यायानें तें एक लहानसें जगच आहे, असें समजलें जातें. समाजाचे घटक, स्त्रीपुरुष, राज्यांतले नागरिक, कार्यकर्ते माणसें, साधु, वीर आणि विद्वान् पुरुष जन्माला येण्याचें स्थान गृहच होय. सारांश, एखाद्या देशांतल्या बहुतेक कुटुंबांचे विचार, भावना, कृत्यें आणि महत्त्वाकांक्षा हीं कशा प्रकारचीं आहेत, तें मला सांगा, म्हणजे तो देश कोणत्या दर्जाचा आहे, श्रेष्ठ दर्जाचा आहे, कीं कनिष्ठ दर्जाचा आहे, तें मी सांगेन.

घरामध्येंच आपणांस पहिल्यानें कर्तव्य करणें भाग पडतें, आणि तें कर्तव्य म्हणजेच प्रेमाचे धडे शिकण्याची शाळा होय. मातापितरें व मुलें, पति व पत्नी, बंधु व भगिनी यांच्यामधलें नातेंच स्वाभा-विकपणें आयुष्यक्रमांतील पवित्र कर्तव्यें अशीं जीं गृहकृत्यें तीं करून आपल्या जवळच्या सर्व माणसांना सुखी करण्यासाठीं आप-ल्यांस झटावयास लावतें. या दिवाळीच्या सणामध्यें स्नेहीसंबंधी ब्र

आप्तइष्ट जेव्हां परस्परांना भेटतील, तेव्हां त्यांनीं या सणाचें धार्मिक दृष्ट्या असलेलें महत्त्व लक्षांत ठेवण्यास विसरूं नये. कारण, ज्ञान व प्रेम यांच्या उज्ज्वल प्रकाशांत आयुष्यक्रमण करण्याचा आम्हीं प्रयत्न केला पाहिजे, या गोष्टीची आम्हांस आठवण करून देण्यासाठींच या सणाची योजना आहे. कुटुंब हेंच सद्गुणाचें निवासस्थान होय, आणि प्रेमापेक्षां उच्चतर असा कोणताहि सद्गुण नाहीं. ‘ प्रेम ही एक नियामक शक्ति आहे,’ असें एक थोर पुरुष म्हणतो. दुसऱ्या एका मोठ्या सूज्ञ पुरुषाचें असें वचन आहे कीं, “ चिरकाल टिकणाऱ्या सर्व प्रकारच्या वैभवाचा आधार प्रेमच होय. प्रेम नष्ट झालें कीं, आमचें जीवित मातीमोल झालेंच म्हणून समजावें ! ”

प्रेमाला निरनिराळीं माणसें निरनिराळ्या रीतीनें ओळखतात. स्वार्थी, विषयसुखांच्या पलीकडे ज्याला कांहीं दिसत नाहीं असा ऐहिक दृष्टीचा मनुष्य त्याला **प्रीति** म्हणतो; कवि त्याला **प्रेम** या नांवानें ओळखतो; परंतु प्रेमाचा उगम परमेश्वरापासून आहे, हें जाणून त्या उगमापाशींच ज्यानें प्रेमरसाचें पान केलें आहे, असा भगवद्भक्त त्याला **भक्ति** या नांवानें संबोधितो. एकच वस्तु पण निरनिराळे इसम तिला निरनिराळ्या नांवांनीं ओळखतात. कवि आणि साधु हें मात्र तिला तत्त्वतः ओळखतात. ‘ **सर्वः सुखमवाप्नोतु सर्वः सर्वत्र नन्दतु** ’ हेंच प्रेमाचें रहस्य होय. मनूनें धर्माचें विवरण करतांना देखील असेंच सांगितलेलें आहे कीं, “ **समः सर्वेषु भूतेषु न लिंगं धर्मकारणम्.** ” भगवद्गीतेंतहि म्हटलें आहे कीं,

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ॥**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ १ ॥**

आमचें प्रेम, आमची न्यायबुद्धि, आमची सत्यप्रीति, आमचा स्वार्थत्याग, आमची कार्यप्रवृत्ति, कर्तव्य म्हणजे एक कटकट नव्हे, तर

एक प्रकारची भक्ति आहे, असें मानण्याचा स्वभाव, हीं सर्व शिकण्याचें स्थळ म्हणजे गृहच होय. यांच्यामुळेंच समाजचक्राला गति मिळत असते. ही नसली, अथवा ह्यांचा ऱ्हास होऊं लागला, तर समाज अवनत दशेस पोंचतो, त्याची जीवनकला नाहींशी होऊं लागते. कुटुंबप्रीतीपासून स्वदेशप्रीतीस सुरवात व्हावी असाच ईश्वरी संकल्प आहे. स्वदेशप्रीतीसहि परिणतावस्था आहे व ती अखिल मानवजातीवरील प्रीति ही होय. आमचा देश पतित झाला आहे, याचें कारण आमच्यांतली फाटाफूट हें होय. ही फाटाफूट होण्याचें कारण म्हणजे पंथ, जाति व पोटजाति यांच्यामुळें आमचा समाज सहस्रधा विदीर्ण झाला आहे, हें होय. आमच्या अंतःकरणांतली प्रेमज्योति निर्वाणास गेली. प्रेमज्योतीच्या प्रकाशामध्यें उदार मनानें व शुद्ध अंतःकरणानें सर्व मानवजातीच्या विस्तीर्ण जगांत वावरावयाचें सोडून कूपमंडूकवत् स्वार्थ दृष्टीनें आम्हीं आमच्या पुरतीं लहान लहान जगें निर्माण केलीं; स्वतःच्या व्यक्तीपुरतें अथवा जातीपुरतेंच पाहूं लागलों, हें या सर्व अवनतदशेचें कारण होय. आमच्या अंतःकरणावर तिमिराचें आवरण पडलें आहे. त्या ठिकाणीं प्रकाश पडण्याची आवश्यकता आहे. तो प्रकाश दिवाळी आणून देत आहे; तर त्या प्रकाशाचा आम्हीं आमच्या हृदयमंदिरांमध्यें संचार होऊं देऊन तीं दीपावलीप्रमाणें सुप्रकाशित, सुरम्य, सुप्रसन्न, व तेजःसंपन्न करूं या.

दिवाळीच्या संदेशाकडे कान द्या. ‘ प्रेम ’ हाच तो संदेश आपल्या अंतःकरणांत, आपल्या निवासस्थानांत आणि अंतःकरणांत, प्रेमाचेंच साम्राज्य होऊं द्या; आपण कलह करण्याचें सोडूं; क्षुद्र भेद विसरूं; आपल्या आकुंचित विचारांस व स्वार्थी कल्पनांस रजा देऊं; जग म्हणजे परमेश्वराचें बाह्य स्वरूप आहे, अशा दृष्टीनें

आपण त्याच्याकडे पाहूं; म्हणजे प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या ठिकाणीं बंधुभगिनीभाव आपणांस प्रतीत होईल.

दिवाळीच्या संदेशाचा हा एक भाग झाला. काळ बदलत असतो; जुने प्रघात जातात; नवी परिस्थिति व नवे प्रचारही उत्पन्न होतात. मनुष्य परिस्थित्यनुरूप बनतो अशी म्हणच आहे. त्यानें चळवळ केली पाहिजे, त्यानें वाढलें पाहिजे, ही गति आणि वाढ यांना प्रयत्नाची जरूरी असते. आपण ज्या काळांत व ज्या परिस्थितींत असूं त्या काळाला व त्या परिस्थितीला अनुरूप असेंच आपलें वर्तन पाहिजे. त्या काळीं असलेल्या बौद्धिक, नैतिक, सामाजिक, राजकीय आणि औद्योगिक परिस्थिती-प्रमाणें आपण वागलें पाहिजे, भूतकाळाची परंपरा आपणांस तोडतां येणें शक्य नाहीं. त्या परंपरा आपल्या समागमें आहेत व नेहमीं असणारहि; परंतु भूतकाळाविषयीं बोलतांना एक शाश्वत व दुसरा अशाश्वत असे त्याचे दोन विभाग आहेत, हें विसरतां कामा नये. एका काळांत जें योग्य असेल तें दुसऱ्या काळांत तसें असेलच असें नाहीं. अशाश्वत तें हेंच. शाश्वत भाग असतो तो सत्य, धर्म्य गोष्टींत ईश्वरावर दृढ श्रद्धा ठेवून सत्कार्यार्थ झटण्यामध्यें असतो. हिंदुधर्मांतील आकुंचित विचारांचा त्याग करून, हिंदु-धर्माचे उदारबुद्धिमीमांसक जे साधु त्यांनीं उपदेशिलेल्या उदारतत्त्वां-प्रमाणें जो आचरण ठेवितो, तोच खरा हिंदु होय. तोच हिंदु-धर्माच्या अंतःस्वरूपाचें रक्षण करतो, इतर नांवाचेच हिंदु होत. कालानुसार प्रगति करावयाला धर्मशास्त्रांची आडकाठी नाहीं. पूर्वीं धर्मप्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञांत पशुवध करणें हें धर्मशास्त्रांमध्यें विहित मानलेलें असे; परंतु नंतरच्या काळीं रूढीनें पशुवध निषिद्ध ठरविला. "**अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्नतु**" याचा वास्तविक अर्थ हाच कीं, प्रत्येक काळच्या लोकांना आपल्या

परिस्थितीस अनुसरून अशा प्रकारचीं नवीन नवीन ध्येयें अस्तित्वांत आणण्याचा, नवीन नवीन रूढी प्रचलित करण्याचा अधिकार आहे. दीपमालांनीं विभूषीत दिवाळीचा सण येतो, तो, तुम्हीं प्रकाशपुत्र व्हा, प्रगतीच्या मार्गास लागा, जुन्या चालींना अंधपणानें चिकटून राहूं नका, मन्वंतराला अनुरूप असें वर्तन ठेवा, असेंच आम्हांस सांगतो.

हाच दिवाळीचा संदेश आहे. या महोत्सवप्रसंगाची योजना हाच अति उदात्त विचार सूचित करण्यासाठीं आहे. पण लक्षांत ठेवा कीं, खरा विचार म्हटला म्हणजे नुसता विचारच नसतो, तर त्याप्रमाणें आचारहि असावा लागतो. अर्जुनानें श्रीकृष्णास विचारलें ' ज्ञान म्हणजे काय ? ' श्रीकृष्णानें सांगितलें कीं, ' अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, क्षान्ति, व आर्जव ( सरळपणा ) यांतच ज्ञान समाविष्ट होतें ' याचा अर्थ काय ? अर्थ एवढाच कीं, विचार व कृति ह्यांचें नेहमी साहचर्य असलें पाहिजे. प्रख्यात् तत्ववेत्ता मार्टीनो म्हणतो 'आमचा विचार व आमची कृति यांच्यामध्यें मेळ असावा,अशी ईश्वराची आग्रहपुरःसर इच्छा आहे. कारण एखादा विचार सत्यास धरून असला तरी त्याला अनुसरून वर्तन ठेवणाऱ्या माणसाचा तो क्रम बंद झाला आणि तीच स्थिति कायम राहिली म्हणजे त्या माणसाच्या ठिकाणीं त्या सत्य विचाराला असत्यत्व प्राप्त होतें. ' आपल्या विचाराप्रमाणें जें जें कांहीं शुभ व सत्य असेल तें तें आपण कृतींत दाखविलें पाहिजे.

एवंच, दिवाळीचा संदेश म्हणजे ईश्वरीसंदेश आहे, तो संदेश प्रकाशाचा आहे आणि प्रकाश म्हणजे प्रेम होय. नुसत्या जातीपुरतें किंवा विशिष्ट कंपूपुरतें प्रेम नव्हे, तर सर्व मानवजातीपुरतें प्रेम अंतःकरण उदार करणारें, दृष्टी फांकविणारें आणि सत्य

व धैर्य कार्यार्थ प्रवृत्त करणारें असें हें प्रेम आहे. सुविचारसंमत धोरणानें, दिव्य उत्साहानें, प्रगतिपथ क्रमण करावा असाही या संदेशाचा अर्थ आहे. हा संदेश खऱ्या स्वदेशभक्तीचा आहे, कारण प्रेमानें व प्रगमनेच्छेनें प्रेरित होण्याचा उपदेश करीत असतां हा संदेश आम्हांला सांगत आहे कीं, तुम्ही स्वदेशभक्त झाला तरी गृहस्थ या नात्यानें प्राप्त असलेले शिष्टाचार पाळण्यास विसरूं नका; धिम्मेपणानें योग्य काळाची वाट पहात, विचारानें वागत, अनुकंपा बाळगीत आणि उदात्त व पुण्य अशीं कृत्यें करीत रहा.

---

## अंधकार कीं अरुणोदय ?

गेल्या शतकाच्या प्रारंभीं बंगाल्यांत एकेश्वरी धर्माची, **ब्राह्मसमाजाची**, व या मुंबई शहरांत १८६७ सालीं **प्रार्थनासमाजाची** स्थापना झाली. ह्या दोन संस्था निर्माण होण्यास ज्या गोष्टी घडून आल्या त्यांच्यामध्यें बरेंच सादृश्य आहे. दोन्ही संस्था अस्तित्वांत आल्यानंतर आतांपर्यंत बऱ्याच घडामोडी झाल्या आहेत. तथापि आपल्या आजच्या परिस्थितीचा विचार करितां व आज आपल्यापुढें ज्या निरनिराळ्या प्रकारच्या विवंचना आहेत, त्यांचा विचार मनांत आणितां, ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज कां अस्तित्वांत आले यासंबंधाचा थोडा विचार येथें केल्यास, तो अस्थानीं होईल असें मला वाटत नाहीं.

एतद्देशियांची स्थिति सुधारून, व त्यांचीं मनें सुसंस्कृत करून, त्यांना, भ्रममूलक कल्पना, भिक्षुकांचे डावपेंच व जातिभेद यांच्या बंधनापासून कसें मुक्त करितां येईल, या गोष्टीचा विचार करण्याकरितां १८१९ मध्यें मे महिन्याच्या १५ व्या तारखेस **राजा राम-**

**मोहन रॉय** यांच्या येथें एक सभा भरली होती. कलकत्त्यामधील हिंदु पुढाऱ्यांपैकीं पुष्कळ लोक ह्या सभेस हजर होते, व त्या वेळीं **डेविड हेअर** नांवाचा एक इंग्रज गृहस्थही हजर होता. त्याचें नांव बंगाल्यांत सर्वतोमुखीं आहे. राममोहन व हेअर यांचा स्वभाव परस्परभिन्न होता. राममोहनाचे ठिकाणीं जाज्वल्य धार्मिक वृत्ति नांदत होती. त्या वेळच्या सर्व मुख्य धर्मांचें त्यानें मोठ्या आस्थेनें अध्ययन केलें होतें. एकेश्वरी धर्मावर त्याचा पूर्ण विश्वास होता व त्याच्या मनानें असें पक्कें घेतलें होतें कीं, देशाची धार्मिक स्थिति सुधारून सर्वांचा भाव, एक ईश्वर, एक धर्म व एक मनुष्यजात या गोष्टींवरच बसेल, याविषयीं प्रयत्न केला असतां हिंदुस्थानचें कल्याण होईल, त्याची सर्व प्रकारें भरभराट होईल व त्याची भवितव्यता सुखदायी होईल. उलट पक्षीं, डेविड हेअरचें शिक्षण बेताचेंच होतें, त्याच्या ठिकाणीं वक्तृत्वशक्ति फार अल्प होती किंवा मुळींच नव्हती म्हटलें तरी चालेल. त्याच्या मनाचा असा ठाम ग्रह बनून राहिला होता कीं, ह्या देशाची मुक्तता, ह्या देशांतील ज्ञानाची वाढ किंवा ह्या देशाची उन्नति जी होणार, ती ह्या देशांतील लोकांना ऐहिक शिक्षण सढळ हातानें रेलचेल दिलें असतांच होणार आहे. राममोहनाच्या घरीं जी सभा झाली म्हणून वर सांगितलें, त्या सभेमध्यें राममोहनानें अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, आपण एक साप्ताहिक सभा स्थापन करावी; त्या सभेमध्यें धार्मिक व्याख्यानें व्हावींत, साप्ताहिक उपासना कराव्यात, वेद व उपनिषदें यांच्या अर्थांचें स्पष्टीकरण करावें, एकंदरींत त्या सभेमध्यें धार्मिक, शुद्ध विचारांचाच खल व्हावा. असें केलें असतां लोकांची प्रवृत्ति पुनः शुद्ध अशा एकेश्वरी धर्माकडे वळेल. याच्या उलट डेविड हेअरचें मत पडलें व ज्या ठिकाणीं ऐहिक शिक्षण मिळेल असें

एक कॉलेज स्थापन करावें, असा त्यानें हट्ट धरिला. त्या वेळीं त्यानें असे उद्गार काढले कीं, हिंदुस्थानची उन्नत्ति व्हावी अशी जर तुमची मनापासून इच्छा असेल, तर ज्या गोष्टीनें हिंदुस्थानांतील सात्त्विक गुणांचा ऱ्हास झाला आहे, त्या तुम्हीं आपल्यामधून काढून टाकल्या पाहिजेत. तुमचा देव, तुमचा धर्म, तुमचा भिक्षुकवर्ग व तुमची जात ह्या सर्वांना हद्दपार करा. तुमच्या अधोगतीस हीं सर्व कारण झालीं आहेत. करितां एक कॉलेज काढा व तेथें लोकांना शिक्षण द्या. तरच हिंदुस्थानास इष्ट स्थिति प्राप्त होऊन, बरे दिवस येण्याची आशा आहे. त्या सभेमध्यें बरीच वाटाघाट झाली, परंतु सभेनें कोणतेंच मत निश्चित असें केलें नाहीं. सभा विसर्जन होऊन लोक आपापल्या घरीं गेले; पण राजा राममोहन रॉय व डेविड हेअर हे दोघे पूर्ण निश्चयी व निग्रही होते. प्रत्येकानें आपापल्या परीं कामास सुरुवात केली. ईश्वराची उपासना करण्याकरितां राममोहनानें '**ब्राह्मसभा**' स्थापन केली व तेथें तो धर्मावर व्याख्यानें देऊं लागला व उपनिषदें व वेद यांच्या अर्थांचें विवरण करूं लागला. उलट पक्षीं, कलकत्त्यांतील त्या वेळचे हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश **सर एडवर्ड हाइड ईस्ट** यांची सहानुभूति डेविड हेअरनें स्वीकृत कार्यास मिळविली, त्या वेळच्या पुढारी हिंदु लोकांकडे अर्ज पाठवून पुष्कळ पैसा जमा केला व एक कॉलेज स्थापन होऊन तेथें वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणास सुरुवातही झाली. त्या कॉलेजांतील शिक्षकवर्गामध्यें **डेरोझिओ** नांवाचा एक ईस्ट इंडियन गृहस्थ शिक्षक होता. त्याचें नांव बंगालच्या इतिहासामध्यें नुसत्या शिक्षणाच्या बाबतींशींच नव्हे, तर सामाजिक सुधारणेशींही नेहमीं संलग्न राहील. डेविड हेअरप्रमाणेंच या गृहस्थालाही धर्माची फार थोडी चाड होती; त्याची स्वतःची वृत्ति साधारणपणें नास्तिकपणाकडे होती, आणि विद्यार्थ्यांवर तर त्याचें बरेंच

वजन असे. पुष्कळ विद्यार्थी त्याच्या भोंवतीं जमत, त्याच्यावर प्रेम करीत व त्याचा प्रत्येक शब्द शिरसा वंद्य मानावयास तत्पर असत. डेरोझिओ त्यांना नेहमीं असा उपदेश करी कीं, तुमच्या भिक्षुकवर्गाचें बंड मोडून टाका व तुमच्या देवाच्या मूर्तींचा नायनाट करा. याचा परिणाम असा झाला कीं, पुष्कळसे विद्यार्थी नेहमीं त्याच्या घरीं जमून जातिभेदाचा तीव्र रीतीनें निषेध करीत असत व त्या वेळच्या भ्रममूलक गोष्टींचा आपणांस किती तिटकारा वाटतो, याचीं सत्यता पटविण्याकरितां ते डेरोझिओबरोबर जेवत असत. अशा रीतीनें त्यांच्या मतें जीं पाखंड मतें होतीं त्यांविषयींचा तिरस्कार ते विद्यार्थी अधिकाधिक प्रमाणानेंच दाखवूं लागले. असें म्हणतात कीं, एके दिवशीं **के. एम्. बानरजी,** जो पुढें ख्रिस्ती मिशनरी झाला त्याच्या नेतृत्वाखालीं ते एका घरामध्यें जमले व तेथें त्यांनीं गोमांसावर यथेच्छ ताव मारिला. जेवण झाल्यावर सर्व तरुण विद्यार्थी आपापल्या हातांत गोमांसाचा तुकडा घेऊन रस्त्यांतून मिरवूं लागले व त्यांनीं ते तुकडे त्या वेळच्या एका कव्या हिंदुधर्माभिमानी गृहस्थाच्या घरामध्यें फेंकून दिले! या योगें सर्वत्र हाःहाःकार उडून गेला! त्या विद्यार्थ्यांचा सर्व लोक तिटकारा करूं लागले, त्यांचा छळ झाला व पुष्कळांवर खटलेही झाले. याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वींचा त्यांचा तो उत्साह एकदम मावळून जाऊन पार विलयास गेला व त्याचा मागमूसही उरला नाहीं; सुधारणेविषयींच्या त्यांच्या सर्व कल्पना मनांतल्या मनांत जिरून गेल्या. अशा प्रकारची स्थिति त्या विद्यार्थ्यांपैकीं बहुतेकांची झाली; पण जे थोडे बाकी राहिले, त्यांपैकीं कांहींजण ख्रिस्ती झाले, त्यामध्येंच के. एम्. बानरजी हे एक होते, व दुसरे, राममोहन यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्मसभेला येऊन मिळाले. प्रथम जातिभेदाचें निर्मूलन केलें पाहिजे; अशी सुधारणेविषयीं या तरुण मंडळींची मूळ कल्पना होती. त्यांना वाटे कीं हिंदु-

स्थानच्या लोकांनीं आजपर्यंत धर्मावर फार भिस्त ठेविली आहे. म्हणून लोकांच्या धार्मिक कल्पनांवर प्रथम प्रहार केला पाहिजे. नुसत्या धार्मिक कल्पनांवरच नव्हे, तर ईश्वरासंबंधाच्या व मानवजातीसंबंधाच्या कल्पनांवरही आघात केले पाहिजेत.

आतां आपण आपली दृष्टि मुंबई शहराकडे वळवूं. आमचा समाज स्थापन होण्याच्या वेळची हकिकत जवळ जवळ वरीलप्रमाणेंच आहे. देशाची सुधारणा करण्याकरितां केवळ ऐहिकाकडेच लक्ष देऊन इकडेही कामास सुरुवात झाली. प. वा. **दादोबा पांडुरंग** यांचें नांव आपणांपैकीं कांहींजणांनीं ऐकिलें असेलच. इकडील शाळांमध्यें व कॉलेजांमध्यें शिकणारे बरेचसे विद्यार्थी त्यांच्या सभोंवतीं नेहमीं जमत व त्यांची फार वाखाणणी करीत. १८४० पासून १८६० च्या दरम्यान तरुणांवर त्यांचें फार वजन असे. कारण सरकारी शाळांचे ते इन्स्पेक्टर होते. प्रथम कांहीं वर्षें मुंबईच्या बाहेर नौकरी केल्यानंतर ते मुंबईंत बदलून आले. जातिभेदाचा समूळ नाश करावयाचा; या गोष्टीचा त्यांना इतका ध्यास लागून राहिला होता कीं, त्यांनीं बरेचसे तरुण आपल्या सभोंवतीं गोळा केले, व '**परमहंस**' नांवाची एक संस्था स्थापन केली. सावकाश पण खात्रीनें जातिभेदाचें बंड मोडावयाचें, असा त्या सभेचा हेतु होता. हिंदुस्थानामध्यें प्रचलित असा जो जातिभेद त्यामुळें त्याचें अतिशय नुकसान झालें आहे; म्हणून जातिभेदाचें निर्मूलन केल्याशिवाय कोणतीही सुधारणा यशस्वी होणार नाहीं व इतर राष्ट्रांबरोबर हिंदुस्थानची उन्नति होणार नाहीं, असें त्या तरुणांना वाटत होतें. ह्या परमहंससभेचा सभासद होतांना अशी प्रतिज्ञा करावी लागे कीं, मी जातिभेद बाळगणार नाहीं. या प्रतिज्ञेची सखता पटविण्याकरितां सभासद झाल्याबरोबर प्रत्येकाला ख्रिस्ती मनुष्यानें तयार केलेल्या पावाचा तुकडा खावा लागे व मुसलमानाच्या हातचें पाणी

घ्यावें लागे. एकांतीं जमा होऊन तेथें गुप्तपणें वादविवाद करतां यावा, या करितां परमहंससभेच्या मंडळींना एका इमारतीची आवश्यकता होती. एकांतीं म्हणण्याचें कारण असें कीं, आपण आपली जात सोडली आहे, असें उघडपणें जाहीर करण्याचें नीतिधैर्य या तरुण मंडळीमध्यें नव्हतें. **फ्रीमेसन**च्याच पद्धतीवर त्यांनीं कांहीं अंशीं सुरवात केली; जातीचा निषेध करावयाचा, तिचें बंधन तोडावयाचें, पण या सर्व गोष्टी गुप्तपणें करावयाच्या असा त्यांचा मानस होता. कारण, त्यांना वाटे कीं या गोष्टी राजरोस धैर्यानें करण्याची वेळ अद्याप आली नाहीं. म्हणून ज्या ठिकाणीं ख्रिस्ती मनुष्यास पाव तयार करण्याकरितां व मुसलमान मनुष्यास पाणी देण्याकरितां ठेवतां येईल, असें एकांतीं असलेलें घर त्यांना हवें होतें. अशा प्रकारचें एक घर त्यांना भाड्यानें मिळालें. त्याच्या मालकानें तें त्यांना तात्काळ देण्याचें कबूल केलें, परंतु तेथें एक भाडेकरी होता; त्याला ती जागा सोडून दुसरीकडे जावेंसें वाटेना. पुढें या तरुण मंडळीच्या पाखंडी मतांविषयीं थोडा बभ्रा झाला; पण त्यांच्या चळवळीचा हेतु काय याची नक्की कल्पना अद्याप कोणास नव्हती. एके दिवशीं, तो भाडेकरी ह्या घरास कुलूप लावून बाहेर गेला असतां, या तरुणांनीं तीं कुलपें फोडून घरांतील देवांच्या सर्व मूर्ति रस्त्यावर फेंकून दिल्या, व त्या घराचा ताबा आपणांकडे घेतला!

त्या सभेचें काम त्या घरामध्यें कांहीं वर्षें गुप्त रीतीनें चालल्यावर, अशा प्रकारच्या पायाविरहित गुप्त संस्थांची जी वाट लागावयाची तीच ह्या संस्थेचीही लागली. कोणी एकानें जमाखर्चाच्या वह्या व परमहंससभेच्या सभासदांच्या नांवाची यादी लांबविली. ही बातमी हां हां म्हणतां सर्वत्र पसरली व प्रत्येक सभासदास आपल्या नांवाचा बभ्रा होईल म्हणून भीति वाटूं लागली, व शेवटीं ती परमहंस सभा ढांसळली. देशामधील जातिभेद नष्ट करितां

येईल, व हिंदुस्थानास इतर राष्ट्रांमध्यें उच्च पद मिळेल; अशा पुढें येणाऱ्या काळाकडे ज्या तरुणांची दृष्टि होती त्यांपैकीं बहुतेकांनीं ज्ञातीविषयीं व सुधारणेविषयीं विचार करण्याचें अजिबाद सोडून दिलें ! ह्यांच्यापैकीं बाकीचे थोडेजण जे प्रगल्भ विचाराचे व योग्य दिशेनें आपलें ध्येय आपल्यापुढें ठेवणारे होते त्यांना वाटलें कीं, देशाची सुधारणा करावयाची ती नुसत्या जातिभेदाचा निषेध करून किंवा भिक्षुकवर्गाचा तिरस्कार करूनच होणें नाहीं. नवीन जीवन म्हणजे नवीन उत्साह होय, व नवीन उत्साह म्हणजे आपल्या पूर्वींच्या साधुसंतांनीं ग्रंथ लिहून किंवा कृति करून जें ध्येय आपणांकरितां मागें ठेविलें आहे त्याप्रमाणें वागणें होय. देशाचा जीर्णोद्धार करावयाचा असेल तर सर्व लोकांचें परिवर्तन झालें पाहिजे,आणि त्यास खरा उपाय म्हणजे देवास शरण जाऊन त्याच्याच साहाय्यानें अंतःकरण उन्नत केलें पाहिजे, शुद्ध केलें पाहिजे, अखिल मनुष्यजातीविषयीं अनुकंपा आपल्याठायीं उदित झाली पाहिजे व धर्माच्या आश्रयानें सर्व उद्योग झाले पाहिजेत.

प्रथम इ० स० १८६४ मध्यें **केशव चंद्रसेन** मुंबईस आले; परंतु त्या वेळीं मुंबईमध्यें व्यापारी घडामोड कळसास जाऊन पोहोंचली होती. प्रत्येकास श्रीमंत होण्याची हांव सुटलेली होती, शेअर बाजाराच्या गोंधळांत सर्व गुंग झाले होते; कोणत्याही धर्मोपदेशकाच्या उपदेशाकडे लक्ष देण्यास कोणाला फुरसुत नव्हती व कोणास स्वस्थताही नव्हती त्यामुळें केशव चंद्रसेन आले तसेच निराश होऊन परत गेले; परंतु १८६४ नंतर लवकरच त्या घडामोडीचें पर्यवसान भयंकर नाशामध्यें झालें. पैसा मिळविण्याविषयीं ज्यांना लोभ सुटला होता,त्यांना संपत्तिरूपी मृगजळामागें लागल्यामुळें कशी फसवणूक होते हें आढळून आलें. पूर्वींचे लक्ष्मीपुत्र गरीब व दीन झाले होते.आणि मग १८६७मध्यें केशव चंद्रसेन जेव्हां पुन्हां मुंबईंत

आले तेव्हां सर्वत्र स्थिरस्थावर झालेलें असल्यामुळें त्यांना टाऊन-हॉलमध्यें एक व्याख्यान देतां आलें. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून तें ऐकलें आहे, त्यांच्या त्यांच्या मनावर त्याचा विलक्षण परिणाम झालेला आहे. त्या वेळींच प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. सन १८१५ मध्यें राजा राममोहनराय यांनीं ब्राह्मसभा ज्या उद्देशानें स्थापन केली, त्याच उद्देशानें प्रार्थनासमाजाचीही स्थापना झाली. ज्यांनीं हा समाज स्थापन केला, त्यांना असें वाटत होतें कीं, ईश्वर एक आहे, व सर्व मनुष्यजात एक आहे, हें तत्त्व आपणांमध्यें जोंपर्यंत बाणलें नाहीं, किंवा आपण सर्व जण एकाच ईश्वराचीं लेंकरें आहोंत म्हणून आपलें परस्परांशीं बंधुभगिनीचें नातें आहे, हें समजण्याइतकी आपली बुद्धि प्रगल्भ झाली नाहीं, तोंपर्यंत इतर राष्ट्रांच्या मानानें हिंदुस्थानची आहे तीच अवनत स्थिति रहाणार व जगांतील इतर सुधारलेल्या लोकांबरोबर टक्कर देण्याचें सामर्थ्य हिंदुस्थानामध्यें येणार नाहीं. १८६७ नंतर ज्याला तरुणावस्था प्राप्त झाली, तो किती तरी भाग्यशाली होय ! त्या वेळीं तरुण असणें म्हणजे ईश्वरी-कृपाच होय, असें मी समजतों. मी तो काळ पाहिलेला आहे. त्या वेळच्या व्याख्यानांपैकीं बहुतेकांस मी हजर असें. त्या वेळीं मी तरुण होतों, चौकस होतों व त्यामुळें त्या वेळच्या चळवळी, त्यांचे हेतु मी समजून घेण्याचा प्रयत्न करीत असें. माजी व्हाइसराय लॉर्ड लॉरेन्स यांच्या आमंत्रणावरून, सन १८७० मध्यें केशव चंद्रसेन हे विलायतेस गेले व इंग्लंडमधील एका विशाल अशा हॉलमध्यें त्यांनीं २० हजार इंग्रज लोकांपुढें व्याख्यान दिलें. असें म्हणतात कीं, केशव हे आपल्या अप्रतिम वक्तृत्वाच्या भरांत असतांना त्यांनीं इंग्रजस्त्रीपुरुषांना आठवण करून देऊन म्हटलें कीं, ब्रिटानिया व हिंददेवीचें दैवयोगानें भगिनीचें नातें जुळून आलें आहे; व

ब्रिटानिया हिंददेवीच्या द्वाराशीं येऊन जणूं काय म्हणत आहे कीं, ‘ हे प्रिय भगिनी, पुष्कळ वेळ तूं घोरत पडली आहेस, तर चल आतां उठ आणि आपल्या कामास लाग. ’ त्यांचें भाषण ऐकण्याकरितां जे लोक आले होते, त्यांपैकीं प्रत्येकाचें अंतःकरण त्या वेळीं जागृत झालें व त्यांना वाटलें कीं, हिंदुस्थानांतील इंग्लंडचें कार्य म्हणजे एक पवित्र कार्य होय, या दोन देशाचा जो संबंध जुळून आला आहे, तो केवळ ईश्वरी इच्छेमुळेंच, व पुरातन काळीं सुधारणेच्या शिखरास पोहोंचलेल्या अशा या देशाचीं सूत्रें परद्वीपस्थ लोकांच्या हातीं गेलीं आहेत, यावरून ईश्वराचा हेतु असा दिसतो कीं, इंग्लंडच्या मदतीनेंच हिंदुस्थानास आपली पूर्वस्थिति प्राप्त व्हावी व इंग्लंडच्या साहाय्यानें हिंदी लोकांस आपल्या पूर्ववैभवाची, संस्कृतीची आठवण व्हावी व त्यांनीं जागें होऊन आपली उन्नति करून घेऊन इतरांच्याही उन्नतीस कारणीभूत व्हावें.

त्या वेळीं चालू असलेल्या चळवळींचा आमच्या मनावर चांगला परिणाम झाला; आम्ही तेव्हां शाळेंत किंवा कॉलेजांत होतों, आणि आपल्या देशांतील निरनिराळे धर्म हें एक प्रकारचें गूढ कोडेंच बनून गेलें आहे, व देशामध्यें अनेक प्रकारच्या जाति व धर्म प्रचलित होऊन देशाचे तुकडे तुकडे झाले आहेत, ही गोष्ट आम्हांस पूर्ण पटली होती. उत्साहानें काम करणाऱ्या प्रगल्भ विचारांच्या थोर पुरुषांचीं उदाहरणें आमच्यांपुढें होतीं, व सध्यां जरी चोहोंकडे अंधार पसरला आहे, तरी कांहीं वर्षांचे आंतच त्या अंधकारानंतर अरुणोदय हा होणारच, इतकेंच नव्हे, तर सहस्ररश्मी अरुणाचलावर आरुढ झालेलाही आहे व देशाचा लवकरच भाग्योदय होणार, असें दर्शवित आहे, ही गोष्ट आम्हांस स्पष्ट दिसत होती. जे आम्हीं कॉलेजमध्यें होतों, त्या आमच्या अंतःकरणांत

प्रेरणा उत्पन्न होऊन देशसुधारणेच्या उद्योगामध्यें आपणही सामील व्हावें, अशी महत्त्वाकांक्षा आम्हांस उत्पन्न झाली. ईश्वराचें पितृत्व व मनुष्यांचें भ्रातृत्व या तत्त्वांचा प्रसार करणारा हा समाज आज जरी लहान दिसत आहे व लोक त्याची उपेक्षा करीत आहेत, तथापि पुढें उत्पन्न होणाऱ्या अनेक संस्थांचें हें मूळबीज आहे, ही गोष्ट आम्ही जाणून होतों. त्या वेळीं आम्हांला वाटावें कीं, आतां आपल्या देशामध्यें नाना प्रकारच्या संस्था निघतील, नानाविध चळवळी सुरू होतील; मग आपल्यांतील घातक जातिभेद नष्ट होईल; आम्ही सर्व तरुण एक विचारानें वागूं; सर्वांच्या आशा, आकांक्षा सारख्या ठेवूं व ज्या देशाचा व लोकांचा आपल्या देशाशीं आपल्या बऱ्यासाठींच ईश्वरी संकेतानें संबंध जडला आहे, त्या व स्वदेशाच्या कल्याणासाठीं दृढ निश्चयानें व उल्हासानें आपण झटूं !

हें जें भावी स्थितीचें दिव्य चित्र व ज्याच्या प्रकाशानें आम्हां तरुणांचे त्यावेळीं डोळे दिपून गेले, त्याला आतां ४० वर्षें झालीं. त्या वेळीं आमच्या दृष्टीपुढें असलेलें चित्र पहा आणि त्याच्याविषयीं कल्पना करा; आणि मग आजच्या परिस्थितीचें चित्र आपल्यापुढें ठेवा. असें केलें म्हणजे आज आपल्याला काय आढळून येतें ? आजच्या स्थितीचा विचार केला, आणि माझ्या पूर्वींच्या सर्व आकांक्षा, सर्व आशा, सर्व विचार, सर्व बेत सिद्धीस गेले काय, असा प्रश्न जर मीं स्वतःलाच केला, तर सकृद्दर्शनीं मला निराशाजनक उत्तर मिळतें, व असेंही वाटतें कीं, पूर्वींचे ते सर्व बेत व विचार जागच्या जागींच राहिले, आणि आपल्याला तें जणूं काय स्वप्नच पडलें, असें म्हटलें पाहिजे. कारण, आज असा अनुभव येतो कीं, जातिबंधनें शिथिल व्हावयाच्या ऐवजीं तीं नवीन तऱ्हेनें दृढतर होत आहेत, जुना धर्मभोळेपणा नष्ट व्हावयाच्या ऐवजीं नवीन त्याच्या मदतीस येत आहे; उपाध्यायांचें बंड कमी व्हावयाच्या ऐवजीं

जोरांत आहे, आणि मला वाटतें कीं, एवढें शिक्षण मिळालें, निरनिराळ्या संस्था निघाल्या, पाश्चात्यांशीं संबंध जुळून आला, प्रागतिक चळवळी, मिशनरींचे उद्योग, शाळा व कॉलेजें ह्यांच्या द्वारें ज्ञानाचा प्रसार झाला, इतकें सर्व झालें, तरी ४० वर्षांमागें आम्ही जसे जेथें होतों तसेंच आहों, तेथेंच आहों एवढेंच नव्हे, तर कित्येक बाबतींत मागें मागें जाण्याची प्रवृत्ति विशेष जोरांत असल्याचा अनुभव येत आहे ! आणि त्यायोगें पुढलीं चिन्हें कांहीं ठीक नाहींत असें वाटून मन उद्विग्न होतें व भावी उन्नतीविषयीं मन साशंक होतें.

पहा, **लॉर्ड मोर्ले** यांनीं प्रागतिक धोरणाचा स्वीकार करून हिंदी लोकांना कांहीं विशेष हक्क दिले. पण, त्याचा परिणाम असा झाला कीं, मुसलमान भाईंना आपणांस **मुसलमान** या नात्यानें तसे हक्क असावेत असें वाटूं लागलें व तशा मागण्या मोठ्या निकरानें आतां सुरू झाल्या आहेत ! एवढ्यानेंच संपलें नाहीं. नंतर वर्तमानपत्रांतून व इतरत्र वादविवाद सुरू झाले व त्याचा असा परिणाम झाला कीं, हिंदूंच्या हक्कांचें संरक्षण करण्याकरितां हिंदुसंस्था व मुसलमानांच्या हक्कांचें संरक्षण करण्याकरितां मुसलमानी संस्था स्थापन झाल्या आहेत ! आतां हें खरें कीं, पूर्वीं हिंदु व मुसलमान अगदीं एक होते असें कांहीं नाहीं, ते विभक्तच होते; परंतु पूर्वींचा भेदभाव आतांच्या इतका तीव्र नव्हता. सध्यां त्यांच्यांमध्यें भयंकर दुफळी झालेली दिसून येते. तेव्हां प्रश्न असा उद्भवतो कीं, हा काय निबिड अंधकारच आहे, किंवा ही अरुणोदयाचीं चिन्हें आहेत ? आणखी, हा जो भेदभाव तो हिंदु व मुसलमान यांचेमध्येंच आहे, असें नव्हे, तर हिंदु–हिंदूंमध्यें देखील तो खिळून राहिला आहे. आपण सर्व हिंदु एक आहों, असें न वाटतां प्रत्येक जात पुढें येऊन मुसलमानांचें अनुकरण करून म्हणत आहे कीं, आपापल्या जातीं-

तून प्रतिनिधि निवडून आले पाहिजेत. लिंगायत जात आजपर्यंत हिंदुसमाजाचा एक घटकावयव आहे, असें समजलें जात होतें, व न्यायकोर्टांनीं देखील ती जात तशी आहे, असा आपला अभिप्राय दिलेला आहे; पण आपण हिंदुसमाजाचे घटकावयव आहों, असें आतां लिंगायत लोकांना वाटेनासें झालें आहे ! त्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपण हिंदुलोकांपासून अगदीं भिन्न आहों, तेव्हां आपले निराळे प्रतिनिधि काउन्सिलमध्यें पाहिजे आहेत ! जैन लोक सुद्धां असाच कोटिक्रम करूं लागले आहेत ! अशीं उदाहरणें दुसरीं पुष्कळ देतां येतील. सध्यांच्या काळीं कोणत्या प्रकारची स्थिति आढळून येत आहे, ती मजप्रमाणें तुम्हांसही अवगत आहेच. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सध्यांच्या काळीं ह्या भेदाभेदाचें प्राबल्य देशामध्यें फार माजलेलें दृष्टोत्पत्तीस येत आहे. एकाद्या मनुष्यास सरकारानें जे. पी. ची पदवी दिली, तर त्याचे जातभाई सभा भरवून त्याचें थाटानें अभिनंदन करितात. एकादा मनुष्य एल्. एल्. बी. ची परीक्षा पास झाला, तर त्याचे जातिबांधव त्याचा गौरव करितात. मोठमोठ्या संस्थानांमध्येंच ही गोष्ट दिसून येते असें नव्हे; तर लहान मोठ्या सर्व समाजांमध्यें हें जातीचें बंड, हा भेदाभेदाचा पुंडावा इतक्या स्पष्ट रीतीनें नजरेस पडतो कीं, त्यायोगें मनामध्यें सकृद्दर्शनीं निराशा उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. बॅकबेवर जा, म्हणजे तेथें पार्शी जिमखाना निराळा, हिंदु जिमखाना निराळा व महॉमेडन जिमखाना निराळा, असें दिसून येईल; हें पाहून कोणाच्याही मनांत असा प्रश्न उद्भवतो कीं, खेळासारख्या साधारण बाबतींत जर आपणांस एक होतां येत नाहीं तर मग आपल्या या शिक्षणाचा व विद्वत्तेचा काय उपयोग ? आपलीं क्रीडांगणें निरनिराळीं तर आहेतच, पण कधीं काळीं आपण जेव्हां खेळण्यासाठीं व मौज पहाण्यासाठीं एकत्र जमतों,

तेव्हां एकमेकांचीं डोकीं फोडण्यास आपण मागें पुढें पहातें नाहीं! अशानें आपणांस जें शिक्षण प्राप्त झालें आहे, त्यास आपण किती अपात्र आहों हें मात्र सिद्ध करित आहों !

मित्रहो, मीं आपल्यापुढें हें एक काळें बेरें चित्र ठेविलें आहे. इतिहासाचा आपण वरवरच विचार केला, किंवा कोणत्याही गोष्टीच्या बाहेरच्या बाजूकडेस पहाण्याची आपणांस संवय असली तर सध्यां आपल्या इकडे जें घडत आहे, त्यायोगें आपल्या उत्साहाचा भंग होऊन आपली निराशा होण्याचा बराच संभव आहे व असेंही वाटेल कीं, सुधारणेविषयीं इतकें बोलणें व करणें झालें तरी देशाची प्रगति होण्याऐवजीं अधोगतिच होत आहे, व त्यायोगें आपल्या अंगावर शहारे उत्पन्न होत आहेत. जातिभेद हें खरोखर आपल्या पिच्छेहाटीचें लक्षण होय; आपली प्रगति न होतां आपली पिच्छेहाट होत आहे याचें तें दर्शक आहे, यांत संशय नाहीं. इतिहासाच्या विस्तीर्ण क्षेत्रांत वावरणारा असा एक गरीब मानवी प्राणी मी आहें; त्याचप्रमाणें ईश्वर व मानवजात यांपासून माझ्या मनामध्यें शुभ प्रेरणा उत्पन्न होते व ईश्वराच्या राज्यांत प्रगतिच होत जाणार हा विश्वास मजमध्यें आहे, म्हणून मला वाटतें कीं, जीं चिन्हें आपणांस दिसत आहेत तीं निराशाजनक नसून आम्ही प्रगतीच्याच मार्गामध्यें आहों याचें द्योतक होत; परंतु, ज्या गोष्टी सध्यां घडून येत आहेत त्यांयोगें ज्या अर्थी अंधकार भासत आहे, त्या अर्थी हा अंधकार म्हणजे अरुणोदयाचा पूर्वगामी होय. परंतु, हा अंधार तसाच कायम राहूं देणें किंवा अंधारामागून येणारा अरुणोदय करणें हें तुम्हां आम्हांवर, व तुम्ही आम्ही योग्य दिशेनें जे प्रयत्न करूं त्यांवर अवलंबून आह.

होय; मुसलमान लोक स्वतंत्र निवडणुकीचे हक्क मागत आहेत व लिंगायत लोक इतर हिंदूंपासून विभक्त राहून आपल्या जाती-

पुरतेंच प्रतिनिधित्व मागत आहेत, हें सर्व खरें आहे. पण मी तर म्हणतों कीं, प्रत्येक जात या रीतीनें कामास लागली तर तें एक फार चांगलें व आशाजनक चिन्ह समजावयास कांहीं हरकत नाहीं. कारण, आत्मत्याग अतिशय प्रमाणानें प्रचारांत आणित गेल्यामुळें सर्व वाढ खुंटलेली दिसत होती, व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींच्या लोकांच्या आशा व महत्वाकांक्षा सफल होण्याच्या वाटेमध्यें तें एक विघ्न होतें. पण पाश्चात्यांच्या सहवासानें प्राप्त झालेली नवीन ज्योत, ज्या सरकारच्या आश्रयाखालीं आपण आहों, त्या सरकारचें आपणांवरील वजन, आम्हांस प्राप्त झालेलें शिक्षण व इतर सर्व गोष्टी यांमुळें आपणांमध्यें एक नवजीवन उत्पन्न झालें आहे, नवीन आशा प्राप्त झाली आहे, व आतां आत्मत्याग जाऊन त्या ठिकाणीं आत्मविश्वास येत चालला आहे. हिंदुधर्म किंवा त्याच्याशीं निकट संबंध असलेले हिंदुस्थानांतील इतर धर्म यांनीं मनुष्याच्या मनावर असा परिणाम झाला होता कीं, त्याला जग तुच्छ वाटून आपलें स्वतःचें जीवित कःपदार्थ आहे, त्याच्यावर फारशी आसक्ति ठेवण्याची किंवा त्यावर प्रेम करण्याची जरूरी नाहीं, तर उलट पक्षीं त्याचा प्रतिकारच केला पाहिजे असें वाटे. ह्या धर्मांची अशी शिकवणूक आहे कीं या जगापासून जितकें दूर पळून जातां येणें शक्य आहे, तितकें दूर जा. कारण, त्यामध्यें पापाचे ढीग सांठलेले आहेत व त्यामध्यें पूर्ण निराशा भरून राहिली आहे. तुम्हांला जें मोठें व खरें काम करावयाचें तें हें कीं, तुम्ही आपल्या जीवनाच्या गरजा कमी कमी करा व हें आयुष्य ओझ्यादाखल आहे, हें लक्षांत ठेवा.

आत्मत्याग याचा अर्थ जगाशीं फटकून वागून दैवावर हवाला ठेवणें हाच जर असेल, तर त्यायोगें व्यक्तीस उच्च प्रकारचें चारित्र्य

किंवा राष्ट्रास थोरपणा मिळणें शक्य नाहीं. ज्यायोगें आपणांमध्यें प्रत्यक्ष दैविवृत्ति उत्पन्न होते असें ध्येय पुढें न ठेवतां, आत्मत्यागाचें अवलंबन केलें तर आपण त्यायोगें निर्जिव बनण्याचा संभव आहे. पाश्चात्य शिक्षणामुळें आमच्यामध्यें जीवित्वाचें एक खरें ध्येय उत्पन्न झालें आहे व नकळत कां होईना, Self-assertion is the law of cosmic progress. ( आत्मप्रतिपादन हा विश्वाच्या प्रगतीचा एक नियम आहे. ) या हक्स्लेच्या वचनावर आपला विश्वास बसत चालला आहे. प्रत्येक जात पुढें येऊन आपापल्या पुरते हक्क मागत आहे ही गोष्ट खरें पहातां चांगली आहे असें नाहीं. कारण, स्वदेशाभिमानाचें खरें लक्षण जें विश्वबंधुत्व त्याची आपल्यामध्यें वाण आहे व प्रत्येक जात स्वतः पुरताच विचार करीत आहे, हें त्या योगें दिसून येतें. पण, असेंही त्यावरून अनुमान काढितां येतें कीं, प्रत्येक जातीमध्यें कांहींना कांहींतरी जागृति उत्पन्न होऊन नागरिक या नात्यानें आपल्या हक्कांची त्यांच्यामध्यें जाणीव उत्पन्न झाली आहे. पुढें येऊन प्रत्येक जात सरकारापाशीं हक्क मागत आहे, त्यावरून या आयुष्यामध्यें आपल्याला कांहीं कर्तव्यें आहेत व कांहीं हक्क आहेत याची जाणीव उत्पन्न होणें ही जी प्रथमची पायरी ती त्या जातीनें गांठली आहे, हें उघड होतें. या त्यांच्या जागृतीच्या बुडाशीं जरी स्वार्थपरता आहे, तरी पण प्रत्येक जातीला असें वाटूं लागलें आहे, कीं आपल्यास कांहीं विशेष हक्क आहेत, त्याबद्दलचें आपलें म्हणणें सरकारानें ऐकिलें पाहिजे व ते हक्क आपल्याला मिळालेही पाहिजेत. शास्त्रवेत्ते म्हणतात कीं, स्वमतप्रतिपादन हा विश्वव्यापाराचा एक नियम आहे. परंतु स्वार्थबुद्धीनें व नीच गोष्टींकरितां आत्मप्रतिपादन केलें तर त्याचा परिणाम आत्मनाशामध्यें होतो. म्हणून जेव्हां हक्स्ले म्हणाला कीं, आत्मप्रतिपादन हा विश्वव्यापाराचा नियम आहे, तेव्हां

मिस फ्रान्सिस वुइलर्ड म्हणते कीं, 'जर आत्मप्रतिपादन हा विश्वव्यापाराचा नियम आहे तर ईश्वराकारितां आपलें मत प्रतिपादन करण्याचा प्रयत्न आपण करूं या.' स्वमतप्रतिपादणें तें दुसऱ्याविषयीं तिरस्कार व असूया यांनीं युक्त अशा नीच बुद्धीनें प्रतिपादणें योग्य नव्हे, तर त्याचा उद्देश थोर व उदात्त असावयास पाहिजे, आणि असें झालें म्हणजे काळोखाची छाया जी आज आपणांवर दिसत आहे, ती नाहींशी होईल. आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, स्वमतप्रतिपादन करणें म्हणजे स्वार्थी मनुष्यानें स्वार्थाकारितां केलेलें प्रतिपादन नव्हे, तर उच्च प्राप्तव्यासाठीं केलेलें प्रतिपादन होय. त्यायोगें ईश्वर हा सर्वव्यापी असल्यामुळें आपलें मुख्य कर्तव्य म्हणजे विश्वबंधुत्वाचा होतां होई तों प्रसार करावयाचा, हें आपणांस समजतें. आपणांमधील कांहीं लोक असें म्हणतांना मीं ऐकिलें आहे कीं, पाश्चात्य देशांतील लोक देहात्मवादी आहेत व प्रापंचिक तृष्णेनेंच ते बद्ध झाले आहेत. हें खरें कीं खोटें, हें येथें सांगण्याची मला गरज नाहीं, परंतु मी येथें एवढेंच सांगतों कीं सध्याचीं क्षणैक टिकणारीं अशीं पुस्तकें आपण वाचलीं तर त्यांवरून आपला असा ग्रह होतो कीं, युरोपमध्यें धार्मिक कल्पनांचा ऱ्हासच होत चालला आहे, परंतु सध्याचीं धार्मिक व प्रागतिक विचारांचे ग्रंथ आपण पाहिलें तर एक गोष्ट विशेष तऱ्हेनें आपल्या दृष्टोत्पत्तीस येते, ती ही कीं, इंग्लंड, जर्मनी, स्वीडन, अमेरिका किंवा राशिया या देशांतील प्रगल्भ बुद्धीच्या माणसांना व उत्तम तत्त्ववेत्यांना असें वाटत आहे कीं, ईश्वर हा एके जागीं बसून राहत नाहीं, तर तो सर्वव्यापी आहे. त्या सर्वांनीं असें कबूल केलें आहे कीं, ईश्वर सर्वव्यापी आहे, हें तत्त्व युरोपच्या लोकांनीं हिंदुस्थानच्या धर्मपुस्तकांतून घेतलें आहे, घेत आहेत, व पुढेंही घेत रहातील. जुन्या करारामध्यें जिहोवा हा पवित्र (या ठिकाणी पवित्र

म्हणजे स्वतंत्र ) असून तो तुम्हांमध्यें किंवा माझ्यामध्यें सांपडावयाचा नाहीं, तर तो एका स्वतंत्र व पवित्र, त्याच्याचकरितां राखून ठेविलेल्या जागेमध्यें सांपडतो, तो स्वर्गांतून सर्व जगावर देखरेख करतो, ही कल्पना फार स्पष्ट रीतीनें दाखविली आहे. ख्रिस्ताला, परमेश्वर अमुक ठिकाणीं आहे, म्हणजे त्याचें वास्तव्य एका विवक्षित स्थळीं आहे, ही गोष्ट मान्य नव्हती. देव चैतन्यस्वरूप आहे, हें त्यानें जाणिलें होतें, म्हणूनच देवाचें राज्य ( स्वाराज्य ) आपल्या अंतःकरणांत आहे, असें त्यानें प्रतिपादिलें आहे. याच विचारास सर्वपरिपोषक सेंट पॉलचें पुढील सुंदर वाक्य पहा. " In Him we live, move and have our being." परंतु, हिंदुधर्माचें हें विशेष लक्षण आहे कीं, इतर सर्व धर्मांपेक्षां हिंदुधर्मानें ईश्वराच्या व्यापक स्वरूपावर फार जोर दिला आहे. टेनिसननें म्हटल्याप्रमाणें त्याला Pantheism म्हणा किंवा दुसरें कांहीं म्हणा, पण त्यायोगें ईश्वर येथें आहे, तेथें आहे, सर्वत्र आहे, हा बोध होतो, ईश्वराच्या व्यापकस्वरूपाविषयींचें यूरोप आतां विशेष रीतीनें प्रतिपादन करूं पाहत आहे. युरोपमधील सर्व तत्त्ववेत्ते, सर्व धर्मोपदेशक, सर्व मोठे गुरु यांच्या लक्षामध्यें नेहमींपेक्षां जास्त स्पष्ट रीतीनें ही गोष्ट आली आहे कीं, ईश्वर हा सर्वत्र आहे, व आमच्या अंतःकरणांत आहे व आमच्या स्वतःमध्येंही आहे. या देशच्या लोकांना ही कल्पना कांहीं नवीन नाहीं; परंतु नुसती ही कल्पना जुनी असून उपयोगी नाहीं, तर आपल्या आयुष्यांतील सर्व गोष्टींमध्यें हा आपला ग्रह दृढ असला पाहिजे, नाहीं तर सध्यांच्या काळीं सामाजिक, राजकीय औद्योगिक इ० सर्व चळवळींमध्यें मुख्यत्वेंकरून दिसून येणारा आत्मप्रतिपादनाचा जोम आपणांस मारून टाकील व आपणांस अंधकारामध्यें लोटून देईल. आपण आपल्या थोर धार्मिक ग्रंथांमुळें ईश्वराचें व्यापकत्व युरोपच्या

लोकांना कांहीं अंशानें शिकवीत आहों, तर पाश्चात्य लोकांपासून आपणांस दुसरें एक तत्त्व शिकलें पाहिजे. तें ख्रिस्तीधर्माचें एक विशेष लक्षण होय. ख्रिस्तानें उपदेशित असा जो ख्रिस्तीधर्म त्याची ज्याच्या पायावर उभारणी केली आहे, तें प्रेमाचें तत्त्व आपणांस त्यांच्यापासून घेतलें पाहिजे. विश्वबंधुत्वाची ही कल्पना महाभारत, भगवद्गीता वगैरे आपल्या हिंदुग्रंथांतही आहे व बुद्धानें तर यावर विशेष जोरही दिला आहे; परंतु जातिभेदामुळें उत्पन्न होणाऱ्या हिंदुलोकांमधील जातिभेदादि आनुवंशिक दोषांमुळें ही प्रेमाची बुद्धि, परोपकाराची बुद्धि ख्रिस्तामध्यें किंवा बुद्धामध्यें जितकी विकसित झाली होती, तितकी आम्हांमध्यें झालेली नाहीं. राष्ट्रीयत्वाविषयीं आपण बोलत असतांना एकवाक्यता होत नाहीं, कारण सध्यांच्या हिंदुधर्मामध्यें प्रेमास जितकें महत्त्व द्यावयास पाहिजे तितकें आपण देत नाहीं. म्हणून ख्रिस्तीधर्मापासून किंवा बौद्धधर्मापासून प्रेमाचें तत्त्व आपण घेतलें पाहिजे. प्रेम हें आपल्यांपैकीं प्रत्येकाच्या आयुष्याचें मुख्य तत्त्व बनून राहिलें व परोपकारबुद्धि आपण आपल्या सर्व व्यवहारांत व कृत्यांत दाखविली तर सध्यां जो काळोख आपणांसमोर दिसत आहे, तो नाहींसा होऊन खात्रीनें अरुणोदय होईल.

हाच मार्ग दाखविण्यासाठीं **प्रार्थनासमाजा**ची स्थापना झाली आहे. याला कित्येक जण इतर धर्मांतून निवडलेल्या तत्त्वांवर उभारलेला धर्म असें म्हणतात. कोणी असेंही म्हणतात कीं, प्रार्थनासमाजास स्वतःचा म्हणून धर्म नाहीं, तर एका धर्मापासून एक तत्त्व, दुसऱ्यापासून दुसरें याप्रमाणें या समाजानें तत्त्वें दुसऱ्या-धर्मांपासून घेतलीं आहेत. म्हणजे ही हजार ठिगळें लाविलेली गोधडी आहे ! परंतु प्रागतिक व प्रगल्भ विचारांच्या माणसांना आतां असें वाटूं लागलें आहे कीं, प्रत्येक धर्मामध्यें मनुष्याच्या प्रगतीस साह्यभूत होणारें असें कांहींतरी असतेंच; केवळ ख्रिस्तीधर्म,

हिंदुधर्म किंवा बुद्धधर्म यांच्या योगेंच नव्हे, तर निरनिराळ्या धर्मांतील उदात्त तत्त्वें एकत्र करून असा एक धर्म तयार केला पाहिजे कीं, तो मानवी अंतःकरणाची आध्यात्मिक तळमळ शांत करूं शकेल. ईश्वरानें आपलें स्वरूप सर्व देशांना सर्व काळीं प्रकट केलें आहे. त्याचे भक्त, विशेष कर्तृत्वान्, पक्षीं अवतारी पुरुष, साधुसंत, धर्मसंस्थापक ह्यांनीं अखिल मनुष्यजात आपलीशी केली आहे. सर्वांकरितां त्याचा एकच नियम आहे व तो नियम म्हटला म्हणजे मनुष्यमात्रावर प्रेम करणें हा होय. मत्सराच्या योगें नव्हे तर प्रेमाच्या योगें राष्ट्रें जिवंत राहतात व त्यांच्यामध्यें टक्के टोणपे खाण्याचें सामर्थ्य येतें. सध्यांच्या युगास अशा प्रेमाची विशेष जरूर आहे. हेंच खरें तत्त्व होय, असें सर्वत्र मान्य होत आहे, व आमच्यामध्यें ही जागृति उत्पन्न होत आहे. इंग्रज लोकांच्या राज्य-पद्धतीमुळें आपले विचार उदात्त बनून आपणांस नवजीवन प्राप्त होत आहे; म्हणून आपण त्यांचे फार आभारी आहों.

परंतु आमचीं अंतःकरणें विस्तृत व्हावयास पाहिजेत, व आमचें प्रेमाच्या क्षेत्राचा विस्तार झाला पाहिजे. आपल्या सर्व चळवळींमध्यें दिसून येणाऱ्या आत्मप्रतिपादनाच्या जोरास ह्या योगेंच योग्य दिशा लागणार आहे. आत्मप्रतिपादनाचा हा प्रवाह कोणीकडे जात आहे व तो कोठपर्यंत भेदाभेदाचें प्राबल्य माजविणार आहे, हें खरोखरच आपणांस माहित नाहीं व सांगतांही येत नाहीं. तरी पण आपण सर्वांनीं ईश्वरावर पूर्ण विश्वास ठेवून वागलें पाहिजे. आणि आपण हें पहात आहोंच कीं, आपणांपैकीं जे खरे पुरातनमताभिमानी आहेत, पुरातन काळची श्रेष्ठ संस्कृति, ज्ञान व अनुभव ह्यांचा आश्रय केल्यामुळें ज्यांचे विचार स्थिर झाले आहेत, ते अलीकडे जातिभेदाच्या तर्फे चाललेला जो गिल्ला त्यांत सामील होत नाहींत, त्या प्रवाहांत ते सांपडत नाहींत व त्या प्रवा-

हाच्या अगदीं नजीक ते जरी असले, तरी ते स्थानभ्रष्ट होत नाहींत. म्हणून प्रेम, निःस्वार्थी प्रेम, हेंच साध्य म्हणून त्यासाठीं आपण झटूं या. प्रार्थनासमाजास जय येवो वा न येवो, या समाजानें मनुष्यामनुष्यामधील भेदाभेदाचा निषेध केला आहे व प्रगति जर योग्य मार्गानें होणें जरूर आहे, तर या समाजानें प्रतिपादित असा जो भाव तोच प्रत्येकास योग्य आहे, हें उदाहरण नेहमीं सर्वांच्या दृष्टीपुढें राहील. या समाजाच्या सभासदांची संख्या जरी मोठी वाढली नाहीं तरी समाजाचीं जीं तत्त्वें तीं नकळत कां होईनात प्रत्येक हिंदी मनुष्याच्या अंतःकरणास मग तो ख्रिस्ती हिंदु किंवा मुसलमान असो, व्यापून टाकल्याशिवाय राहणार नाहींत व त्या योगें आपल्यास असें वाटल्याशिवाय रहाणार नाहीं कीं, प्रचलित संस्थांच्या वतीनें आपण किती जरी बोललों तरी आपलें मुख्य कर्तव्य हें आहे कीं, आपण ईश्वरावर व मनुष्यावर प्रेम केलें पाहिजे व ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व हें तत्त्व पूर्ण लक्षांत ठेवून त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवलें पाहिजे.

---

## भक्ताच्या जीवनाचें रहस्य.

**जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥**
**मग मीं व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळां आंत पद्मपत्र ॥**
**ऐकूनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनीं योगिराज ॥**
**तुका म्हणे ऐसें झालियावांचून । करणें तें तें सीण वाटतसे ॥**

अलीकडे प्रार्थनामंदिरांत उपासनेसाठीं श्रोतृवर्ग अधिकाधिक जमत असतो, हें एक सुचिन्ह आहे. समाजाचे सभासद

नाहींत असेहि पुष्कळ तरुण नियमानें उपासनेसाठीं हजर राहतात. त्यांच्या भाविक व प्रेमळ चेहऱ्यांकडे पाहून मला आनंद होतो, व उत्तेजन येतें. परंतु केव्हां केव्हां मात्र एका गोष्टीची मनाला रुखरुख वाटते. येथें माझ्यासारखे जे कोणी उपासना चालवितात, त्यांनीं ह्या कामासाठींच आपणांस वाहून घेतलेलें नसल्यामुळें हें काम आमच्या हातून व्हावें तितकें चांगलें वठत नसेल, असें केव्हां केव्हां मला वाटतें. हा विचार मनांत आला म्हणजे पुनः असेंहि वाटतें कीं, येथें जे तरुण येतात ते भाविक असल्यामुळें उपासनेंत कोणतेंहि न्यून पडूं नये. उपासना चालविणारे व श्रोते ह्या दोघांच्या अंतःकरणांत एकच भाव असल्यावर आणखी तें काय पाहिजे ? उपासना चालविणारांनीं कांहीं अवडंबर न माजवितां आपल्या अंतःकरणांत उद्भवणारा ईश्वरी संदेश कळकळीनें व साध्या सरळ रीतीनें आणि साहजिक येणाऱ्या शब्दांनीं सांगितला, तर तरुणांच्या कोमल अंतःकरणावर त्याचा चांगला परिणाम होईल, असें मला वाटतें.

बंधुभगिनींनो ! आतां जो गोड अभंग गाण्यांत आला, त्यापासून आपणांस काय बोध घेतां येईल, तें पाहूं; हा तुकारामाचा अभंग फारच सुंदर असून त्याचा अर्थ खोल आहे. दिसण्यांत अभंग साधाच दिसतो; परंतु त्यांत कितीतरी अर्थश्री भरलेली आहे. जसजसें आपण त्याचें अधिक मनन करावें, तसतसा मनास अधिकाधिक आल्हाद होतो. ह्या अभंगांतील तत्त्वाचें आकलन करावयाचें असेल तर प्रथम अंतःकरणपूर्वक त्याचें मनन केलें पाहिजे.

ह्या अभंगांत तुकारामाचें देवाजवळ मागणें आहे. प्राणिमात्राच्या हितासाठीं आपल्या जीविताचा व्यय करावा असें तुकारामाच्या मनांतून होतें. व तसें करतां येण्यासारखी मनाची स्थिति व्हावी म्हणून तो देवाजवळ प्रार्थना करीत आहे. तुकाराम म्हणतो 'देवा मला तुझी भक्ति दे. तुजविषयींचें प्रेम हृदयांत सांठलें म्हणजे तेथें जाणीव

असून जाणीव नसल्यासारखें होईल; मी जीवन्मुक्त होईन- मग माझें जीवित कमळासारखें होईल, कमळ पाण्यांत वाढतें; परंतु ते पाण्याच्या वर असतें; निंदास्तुतीचा माझ्यावर मग कांहीं परिणा होणार नाहीं. योग्याला बरें वाईट कांहीं स्पर्शूं शकत नाहीं, त्या प्रमाणें मलाहि निंदास्तुति स्पर्शूं शकणार नाहीं. माझ्या मनाची अशी स्थिति होईपर्यंत मी करतों तें सर्व कांहीं व्यर्थ आहे-'

ह्या अभंगांत विलक्षण माधुर्य भरलेलें आहे. तो संगीतां म्हटलेला ऐकून आपल्या वृत्ति अगदीं तल्लीन होऊन गेल्या थोडें खोल पाण्यांत जाऊन ह्या अभंगांत आपणां गारेगार करण्यासारखें काय आहे, तें आपण पाहिलें पाहिजे ह्यांतील प्रत्येक शब्दाचा नीट विचार करून ह्या अभंगाचा अ काय, ह्यांत तुकाराम आपणांस काय बोध करीत आहे तें आप पाहिलें पाहिजे. कारण, ह्यांतील प्रत्येक शब्द त्याच्या भारंभा सुवर्णाच्या मोलाचा आहे.

संतांच्या जीवनचरित्रांत काय रहस्य असतें, तें ह्या अभंगावरू आपणांस कळून येईल. संतांच्या हातून जगाचें हित कसें साधतें हें ह्यांत सांगितलें आहे. साधूंचें अंतिम ध्येय काय असतें, व ते साध्य झाल्यावर त्यांच्या प्रत्येक वचनापासून व कृतीपासून मनुष्य मात्राला आनंद व सौख्य लाधून त्यांची श्रेयोमार्गाकडे प्रवृत्ति कशी होते, हें ह्या अभंगापासून कळून येतें,

संतांचें मन हें कोमल असून त्याला सर्व कांहीं कळतें. जगास जीं सुखदु:खें भोगावीं लागतात, तीं सहृदय साधूंस विशेष जाणव तात. इतकें असून एखाद्या मुलाच्या मनाप्रमाणें त्यांचें मन निर्मल प्रफुल्ल व प्रसन्न असतें. पापाच्या संपर्कानें मनुष्य दु:खांत कस

निमग्न होऊन जातो ह्याची जाणीव साधूंस चांगली असते; परंतु मनुष्यजातीवर त्यांचें निस्सीम प्रेम असतेंच. मनुष्याच्या हृदयाचें पूर्ण ज्ञान जर संतांस आहे तर हें हृदय पापानें कसें कलुषित झालेलें आहे, त्याला शुद्ध करून सन्मार्गाप्रत नेणें व आनंदित करणें हें काम किती प्रयासाचें आहे, हें जाणून हताश होऊन जगाचा उद्धार करण्याचें काम ते कसें सोडून देत नाहींत, दुःख व पाप ह्यांचा त्यांच्या मनावर परिणाम कसा होत नाहीं, ह्याचें आपणास आश्चर्य वाटतें.

पण आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कां कीं, ईश्वराचें मनुष्य-जातीवर किती प्रेम आहे तें साधूंस माहित असतें. मनुष्याविषयीं देवाचें प्रेम किती थोर व अगाध असतें ह्याची कल्पना आपणांपेक्षां साधूंसच विशेष असते. नेहमीं दृष्टीस पडणारे सृष्टींतील चमत्कार ह्यांपासूनहि त्यांना ईश्वराच्या प्रेमाचा बोध होतो. सूर्य सज्जन व दुर्जन ह्यांवर सारखाच प्रकाशतो; पर्जन्य सर्वांवर सारखी वृष्टि करितो, सूर्याचा प्रकाश व पर्जन्याची वृष्टि ह्यांपासून साधूंस ईश्व-राच्या दयेचा बोध होतो; त्यांना वाटतें कीं, ज्याप्रमाणें भाजून निघालेली जमीन पावसाचें पाणी चांगल्या रीतीनें शोषून घेते, त्याप्रमाणें व्यथित व विद्ध झालेलें, पंकांत मग्न झालेलें, आर्त असें हृदयच ईश्वराच्या दयेस विशेष पात्र असतें. ईश्व-राच्या ठायीं ह्या असलेल्या प्रेमाची जाणीव संतांस असल्या-मुळें, मनुष्यजातीविषयीं त्यांना सहानुभूति वाटते आणि त्यांना एक प्रकारचें दिव्य ज्ञान होतें. गेटी ह्मणतो, सूर्याचें तेज पाहून तुम्हांला विस्मय वाटतो, परंतु मनुष्याच्या हृदयांत सूर्य आहे तो ह्यापेक्षांहि सुंदर आहे! भक्तांस हा अंतःकरणांत वास करणारा सूर्य दिसतो, वरवर असणारें दुःख आणि पाप तेवढें आपल्या दृष्टीस पडतें; परंतु आंत वसणारें निर्मळ व

शुद्ध, पुण्याचें आणि सौंदर्याचें बीज साधूंच्या दृष्टीस पडतें. दुःख व पाप पाहून ते मागें सरत नाहींत, कारण, त्यांची दृष्टि त्यांच्या पलीकडे पोंचत असते; दुःख आणि पाप ह्यांचा भर अगदीं वर आहे तो काढून टाकला, धुऊन काढला, तर शुद्ध व निर्मळ अंतःकरणाचें तेज फांकूं लागेल हें त्यांना माहीत असतें.

संतांचें मन कसें असतें व ईश्वराच्या पवित्रपणापासून त्याला शक्ति कशी प्राप्त होते, हें वर ठोकळ मानानें सांगितलें. तुकारामानें त्यांना कमलपत्राची किंवा कमळाची उपमा दिली आहे, ती ह्यासाठींच. कमळ तळ्यांत उत्पन्न होतें, परंतु त्याची दृष्टि आकाशांत प्रकाशित होणाऱ्या सूर्याकडे लागलेली असते. ही कमलपत्राची किंवा कमळाची उपमा किती सुंदर आहे! कमळ हें हिंदुस्थानांतील कवीचें आवडतें पुष्प आहे. पवित्रपणा व प्रेम ह्यांचें तें निदर्शक आहे. तें तळ्यांत—चिखलांत रुजतें; परंतु त्या चिखलाची त्याला बाधा होऊं शकत नाहीं. इतकेंच नाहीं, तर तें नेहमीं सूर्याकडे दृष्टि लावून त्यापासून सौंदर्याचा लाभ व पोषण करून घेतें व तळ्यावर आपली प्रभा पसरतें. तळ्याचें पाणी घाणेरडें किंवा क्षुब्ध असलें, तथापि कमळ सर्वदां किती शांत, सुंदर व निर्मल असतें!

संतांच्या चरित्रांत हीच शांति दिसून येते; आपली कोणीं स्तुति केली कीं आपणांला आनंद होतो, आणि निंदा केली कीं, वाईट वाटतें; परंतु संतांची गोष्ट तशी नाहीं, त्यांची तुम्ही निंदा करा कीं स्तुति करा, त्यांच्या मनांवर त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं. योगी तपःसाधन करीत असतां ध्यानमग्न झाल्यावर जसें त्याचें मन होतें, तसें संतांचें मन विकाररहित असतें. सूर्य प्रखर तापानें साधूला दग्ध करूं लागला, पाऊस भिजवूं लागला, किंवा थंडी फार पडूं लागली, तरी त्याचेवर ह्या सर्वांचा कांहींच

परिणाम होत नाहीं, तो पूर्वीप्रमाणेंच अगदीं निश्चल असतो. संतांचा छळ केला किंवा निंदा केली तर त्यांना दुःख वाटतें, परंतु आत्मसंयमन करून ते दुःख बाहेर दाखवीत नाहींत, एवढेंच तुकारामाचें म्हणणें नाहीं, तर निंदा किंवा छळ ह्यांच्या योगानें त्यांची शांति मुळींच ढळत नाहीं ! व त्यांना त्रास देऊं पाहणाऱ्या मनुष्याबद्दल अंतःकरणापासून दयाच वाटते. त्यांच्या मनाची अशी स्थिति असते म्हणूनच त्यांच्या हातून एवढी चांगलीं कृत्यें घडून येतात. आपल्या मनाची अशीच स्थिति करण्यास आपण सर्व काळ झटलें पाहिजे.

---

## खरा पुरुषार्थ.

तीस चाळीस वर्षांपूर्वींच्या आपल्या बालपणाकडे आपण नजर फेंकली तर जे आज माझ्या वयाचे आहेत अशा आपणांपैकीं पुष्कळांस आठवेल कीं, आपण पहाटेस जागे झाल्याबरोबर आपल्या कानांवर प्रथमच जो शब्द पडत असे, तो आपल्या घरांतील वृद्ध बाईचा स्तोत्रपाठ होय; या वृद्ध बाया सर्वांच्या आधीं उठत, आणि घरांतील सडासंमार्जन किंवा दुसरें कांहीं गृहकृत्य करीत असतांना तोंडानें त्या तुकारामाचे किंवा नामदेवाचे अभंग म्हणत. या अभंगांमुळें त्यांच्या मनाला स्वास्थ्य प्राप्त होई, स्वतःचीं कर्तव्यें करण्यास हुशारी वाटे व आयुष्यांतील कष्ट सोसण्यास सामर्थ्य येई. ज्यांच्या ज्यांच्या कानांवर हें गाणें पडे, त्यांसही पहाटेच्या वेळीं मोठी हुशारी वाटे व पुढील कार्यक्रम उत्तम रीतीनें पार पाडण्यास ते उत्साहित अंतःकरणानें सिद्ध होत.

यासाठीं आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आज अनेक बाबतींत आपणांस कितीहि निकृष्टावस्था प्राप्त झालेली असली तरी हे अभंग म्हणजे आपली वडिलोपार्जित जिनगी आहे; आपल्या थोर साधूंच्या आध्यात्मिक अनुभवाचा या अभंगांत संग्रह केलेला आहे. यामुळेंच आमच्यांमध्यें थोडें आध्यात्मिक जीवन टिकून आहे, व आमच्या संसारांत अद्याप देखील जें माधुर्य उरलें आहे, तें या साधूंच्याच जीवनाचा आमच्या संसारावर अनुवांशिक रीतीनें झालेल्या परिणामाचें फळ होय. म्हणून आमच्या साधुसंतांच्या ज्या उक्ति त्यांत चांगलें व सुंदर म्हणून जें कांहीं आहे, तें आपल्यामध्यें सतत जागृत व जिवंत राहील व त्यांतील जें माधुर्य व स्वारस्य तें आपल्यामध्यें आणण्याचा प्रयत्न करूं या.

**'जाणोनि नेणतें करीं माझें मन'** या अभंगाच्या द्वारें दिलेल्या गेल्या व्याख्यानांत मीं त्या अभंगांतील अर्थाचें साधारण स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. या अभंगाचा विचार करितां सुचलेले आणखी कांहीं विचार व्याख्यानाच्या द्वारें आज आपणांपुढें ठेवण्याचें मीं योजिलें आहे. या अभंगांतील विचार मुख्यतः पौरुषाच्या वाढीकडे आहे, ही गोष्ट आपल्या लक्षांत येऊन चुकली असेलच. आपल्या आयुष्यांतील अनुभवामुळें तुकोबाला पुरुषार्थाचा खरा अर्थ समजला होता, आणि त्यांनीं तो आपल्याला अभंगाच्या द्वारें सांगितला आहे.

आपल्या ठिकाणीं पौरुषाचा संचय होणें म्हणजे आपली वाढ होणें होय. दिवसानुदिवस आमची वाढ होत आहे. आपल्या सर्व आयुष्यभर सतत एकसारखी वाढ चालू आहे, व ती वाढ म्हणजे आपल्या व्यक्तित्वाची वाढ होय. कारण, आपल्या शरीराची वाढ कांहीं मर्यादित कालपर्यंतच होते. परंतु ह्या वाढीचें तसें नाहीं.

आपल्या आयुष्याचा सर्व रोंख स्वत्व प्राप्त करून घेण्याकडे आहे. परंतु आतां प्रश्न हा कीं, कोणत्या प्रकारच्या पुरुषार्थाची आपण वाढ करावयास पाहिजे? व आपण कोणती वाढ जोडीत आहों? आपल्या ही गोष्ट ध्यानीं येत असो अगर नसो, आयुष्यांतील प्रत्येक क्षणीं आपण आपलें शील बनवीत असतों. एकादा विचार आपल्या मनांत येतो, तो वाईट असेल किंवा चांगला असेल; तो तेथेंच आपण राहूं दिला तर झोंपेमध्यें देखील त्याचा ताबा आपल्या मनावर चालतो व पुढें तो विचार आपल्या आयुष्याचा एक भागच बनतो. याप्रमाणें आमच्या मनाची वाढ होत आहे. पण आपण पाहिलें पाहिजे, तें हें कीं, आपण केवळ परिस्थितीच्या ओघाबरोबर वाहत जात नसून आपलें कांहींतरी शील बनत आहे किंवा कसें? केवळ परिस्थितीच्या ओघाबरोबर जर आपण वाहत जात असलों, आपल्या स्वत्वाची जर कांहीं वाढ होत नसली, तर ह्या ओघवाह्य-तेनें आपलें समाधान होणार नाहीं. ही ओघवाह्यता खरें पौरुष प्राप्त करून घेण्याचें आपल्या अंगीं असलेलें जें सामर्थ्य त्यास शोभत नाहीं. मनुष्याच्या ठिकाणीं स्वतःविषयीं जागृति आहे; आपण कोण आहों, आपणास अधिकार काय आहे हें जाणण्याचें सामर्थ्य आहे, त्याच्यांत आपली योग्यता वाढविण्याची शक्ति आहे. आणि हाच मनुष्य व पशु यांतील भेद आहे. म्हणून आपल्या ठिकाणची पशुवृत्ति ती आपण जिंकिली पाहिजे. ही पशुवृत्ति नष्ट करून मग आपल्याला वरच्या पायरीवर चढावयाचें असतें हें आपल्या दृष्टीपुढें असलें पाहिजे. **याज्ञवल्क्य** स्मृतीवर टीका करणाऱ्या **विज्ञानेश्वरानें विद्या** या शब्दाची व्याख्या करितांना, या आयुष्यामध्यें प्राप्तव्य काय आहे याचें उत्तम वर्णन केलें आहे. तो म्हणतो, **विद्या म्हणजे पुरुषार्थसाधन.** या आयुष्यांतील मनुष्याचें उच्चतम ध्येय तें प्राप्त करून घेण्याचें साधन म्हणजे **विद्या** होय. नुसती माहिती

मिळविणें हा विद्येचा मुख्य हेतु नव्हे, असा **विज्ञानेश्वर** याच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. आपलें सामर्थ्य वाढविणें म्हणजेही विद्या नव्हे; तर जें ध्येय आपल्या सर्व आयुष्यभर आपल्या ठिकाणीं ईश्वरी प्रेरणा जागृत ठेवावयास साधनीभूत होईल, अशा ध्येयाविषयीं उत्कट प्रेम उत्पन्न होणें हें खऱ्या विद्येचें कार्य होय.

आतां हें खरें आहे कीं, आपणांस हल्लींच्या काळीं ज्ञान संपादिलें पाहिजे, तें वाढविलें पाहिजे; आपण आपली आकलनशक्ति, ग्राहकशक्ति वाढविली पाहिजे व आपली कर्तृत्वशक्तिही वाढीस लाविली पाहिजे. पण **विज्ञानेश्वराच्या** म्हणण्याचा अर्थ असा कीं, प्रथम अत्यंत श्रेष्ठ असें ध्येय आपण आपल्यापुढें ठेविलें पाहिजे; नंतर तें साध्य करून घेण्यासाठीं आपण सारखें झटलें पाहिजे. त्यासाठीं आपलें सर्व सामर्थ्य व आपलें जीवनही आपण वेंचिलें पाहिजे. असें जर झालें तर आपल्या ठिकाणीं स्पष्ट व गूढरूपें वसत असलेल्या सर्व शक्ति वाढतील व आपलें सामर्थ्य वाढेल.

हिंदुधर्मासंबंधानें सर्वसाधारण समज असा आहे कीं, तो पूर्णपणें निवृत्तिपर आहे. कांहीं विशेष उद्योग करूं नका; प्रवृत्तीच्या भानगडींत पडूं नका; त्यागाचें अवलंबन करा व स्वस्थ बसा असें हिंदुधर्म सांगतो; असें सर्व म्हणतात. परंतु सगळ्या हिंदुधर्माची अशी शिकवण आहे असें म्हणणें हें कांहीं ठीक नाहीं. उपनिषदांमध्यें अनुकरणीय शिष्य म्हणून जो दाखविला आहे, त्यास अशा प्रकारचें वर्णन लागू पडण्यासारखें नाहीं. फार लांब जावयास नको. ब्रह्मचारी म्हणजे स्वस्थ बसणारा व ज्याची कर्तृत्वशक्ति करपून गेली आहे असा ब्रह्मचारी या शब्दाचा अर्थ उपनिषदांत नाहीं. तर उलट आपल्या प्रबळ इच्छाशक्तीनें आपले मनोविकार ताब्यांत ठेवणारा, ज्याचा विवेक जागृत आहे, ज्याचा अंतरींचा ज्ञानदिवा प्रज्वलित आहे, जें जें

म्हणून वाईट व अनिष्ट त्याच्याविषयीं ज्याच्या ठिकाणीं अत्यंत तिटकारा आहे, उलट पक्षीं जें जें म्हणून चांगलें आहे, उदात्त आहे, त्याच्या विषयीं ज्याच्या ठिकाणीं उत्कट प्रेम आहे; आपलें जें निश्चित उद्दिष्ट तें नित्य ज्याच्या दृष्टीपुढें असतें व तें साधण्याठीं त्याचा सतत प्रयत्न चालू असतो, असें उपनिषदांतील ब्रह्मचाऱ्याचें वर्णन करितां येतें.

मला वाटतें, **कठोपनिषदामध्यें नचिकेता**ची जी गोष्ट सांगितली आहे, त्या गोष्टीनें वरील अर्थाचें जसें स्पष्टीकरण होईल तसें दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं. सर्व गोष्ट येथें सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, म्हणून त्या गोष्टीचें फक्त तात्पर्य मी आपणांस सांगतों. छात्रा-श्रमाविषयीं आपल्या ऋषींची काय कल्पना होती हेंही आपणांस ह्या गोष्टीवरून कळून येतें. **वाजश्रवा** यानें एकदां कांहीं गाई दान दिल्या. गाई आपल्या रोडक्या, म्हाताऱ्या, कशा तरी जीव धरून राहिलेल्या अशा होत्या. कारण, तें दान कांहीं मनापासून केलेलें नव्हतें. **वाजश्रवा** याचा मुलगा **नचिकेता** यानें जेव्हां हें पाहिलें, तेव्हां त्याच्या कोंवळ्या मनाला तें कसेंसेंच वाटलें व तो आपल्याशीं म्हणाला 'ज्या अर्थीं मरणोन्मुखस्थितींत असलेल्या गाईचें दान माझ्या बापानें केलें आहे, त्याअर्थीं माझा बाप ज्या लोकाला जाणार तो लोक खरोखर दुःखी असला पाहिजे. दान जर करावयाचें तर तें असल्या मरतुकड्या गाईचें करण्यांत काय लाभ? असा विचार करून तो आपल्या बापास म्हणाला 'अहो प्रिय बाबा, तुम्ही आपल्या सर्व मालमत्तेचा दानधर्म करीत आहां, तर मग मला कोणास देऊन टाकण्याचा तुमचा विचार आहे?' हा प्रश्न त्यानें आपल्या पित्याला एकदां, दोनदां, तीनदां केला! आपला मुलगा असा चमत्कारिक प्रश्न कां करीत आहे, तें वाजश्रवाच्या ताबडतोब लक्षांत आलें. मुलगा मुळीं अशाचे उप-

रोधिक रीतीनें व टोंचून प्रश्न विचारीत होता कीं, त्यास तो प्रश्न न टोचणें कांहीं शक्य नव्हतें. दोन तीनदां त्यानें तोच तो प्रश्न विचारलेला पाहून चिडून जाऊन वाजश्रवा म्हणाला, ' मृत्यूचा राजा जो **यम** त्याच्या स्वाधीन मी तुला करणार आहें. ' नचिकेता स्वतःशीं म्हणाला ' आज **यमा**चें माझ्याशीं काय कर्तव्य आहे ? माझा आत्मा अमर असल्यामुळें खरोखर माझ्या आत्म्यावर यमाचा ताबा राहणें शक्य नाहीं. बीं जमिनीमध्यें टाकलें असतां तें दिसेनासें होतें; पण त्याचें रोप होऊन तें पुनः वर येतें. त्याचप्रमाणें मरणामुळें नाश होत नाहीं तर नवीन आयुष्यास त्यामुळें प्रारंभ होतो. ' असा विचार करून व आपल्या बापाच्या मनांतून खरोखरच आपल्याला यमास द्यावयाचें असेल असें वाटून तो यमलोकास गेला. त्या मुलाचें प्रेमळ मन, जागृत विवेक व आत्म्याच्या शाश्वततेविषयीं त्याचा दृढ विश्वास पाहून यमास फार आनंद झाला, व तो त्या मुलाचें अभिनंदन करून त्यास म्हणाला, " तूं माझा सन्मान्य पाहुणा ( अतिथि ) आहेस, वाटेल तो वर माग. " **नचिकेता** म्हणाला ' तूं जर संतुष्ट झाला आहेस तर मीं घरीं गेल्यावर मला पाहून माझ्या बापास आनंद होईल, मजविषयींचा त्याचा सर्व राग नाहींसा होऊन तो माझ्याशीं चांगल्या रीतीनें बोलेल व त्याच्या मनास शांति मिळेल असा मला वर दे.' यमानें हा वर त्यास दिला व आपल्या बापाविषयींचें त्या मुलाचें प्रेम पाहून आणखी एक वर मागण्यास त्या मुलास सांगितलें. **नचिकेता** म्हणाला, ' स्वर्गलोकांत भय नाहीं, तेथें तुला किंवा वृद्धापकाळाला कोणी भीत नाहीं, तेथें तुझी सत्ता असत नाहीं तेथें क्षुधा किंवा तृषा यांची व्यथा होत नाहीं, कोणत्याही प्रकारचीं दुःखें सोसावीं लागत नाहींत तर, सदां तेथें आनंद नांदत असतो. याकरितां, अशा सुखाच्या आणि शांतीच्या स्थानाप्रत जाण्याचा

मार्ग मला सांग.' त्याला कसास लावण्याच्या इराद्यानें यम त्यास म्हणाला 'या एकाच गोष्टीशिवाय दुसरें कांहींही पसंत कर. शतायुषी होणारे मुलगे किंवा नातू माग; पाहिजे तितके हत्ती, घोडे माग, पाहिजे तितकें धन माग; पृथ्वि माग, तुला वाटेल तितकें आयुष्य माग; ह्या सुंदर तरुण स्त्रिया, त्यांचे रथ व वाजविण्याची त्यांचीं वाद्यें यांसह मी तुला बक्षिस देतों. पण स्वर्गलोकाचा मार्ग मला विचारूं नकोस.' हें यमराजाचें म्हणणें ऐकून घेतल्यावर नचिकेता यानें पुढीलप्रमाणें बाणेदार उत्तर दिलें:—

श्वोभावा मर्त्यस्य यदन्तकैतत
सर्वेन्द्रियाणां जरयन्ति तेजः ।
अपि सर्वं जीवितमल्पमेव
तवैव वाहास्तव नृत्यगीते ॥

'यममहाराज, ह्या गोष्टी फक्त क्षणैक टिकणाऱ्या आहेत. त्यांच्या योगें सर्व इंद्रियांतील रग नाहींशी होते. सर्व आयुष्यदेखील अपुरें आहे. तेव्हां आपले घोडे, आपला नाचरंग आपल्यालाच लखलाभ होवो. हा **नचिकेता** दुसऱ्या कोणत्याही वराची इच्छा करीत नाहीं, कोणत्याही ऐहिक ऐश्वर्याच्या मोहाला हा मुलगा बळी पडावयाचा नाहीं. तो मुलगा पूर्णपणें आपल्या कसोटीस उतरला, हें पाहून यमानें तें गूढ तत्त्व त्याला सांगितलें. यम म्हणाला:—

"तयोः श्रेय आददानस्य साधुर्भवति
हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते"

दोन मार्ग आहेत. जो श्रेयोमार्गाचें अवलंबन करितो, श्रेयस्कर मार्गाचा जो स्वीकार करितो, त्याचें परम कल्याण होतें, पण (यः प्रेयः वृणीते,) जो प्रेयोमार्गाचा स्वीकार करितो, तो (अर्थात्

उ. हीयते ) आपल्या कृतार्थतेपासून भ्रष्ट होतो. **श्रेयस्** व **प्रेयस्** मनुष्याजवळ येतात, शहाणा मनुष्य पहिलें पसंत करतो पण मूर्ख मनुष्य अज्ञानांत चांचपडत असल्यामुळें दुसऱ्याचा आश्रय करतो, त्यामुळें त्याला परलोक दिसत नाहीं. याशिवाय दुसरें जगच नाहीं असें त्याला वाटतें. याप्रमाणें तो पुनः पुनः माझ्या तावडींत सांपडतो. परंतु, शहाणा मनुष्य दृढनिश्चयानें **श्रेयाला** चिकटून रहातो व त्यामुळें त्याला अमरत्व प्राप्त होतें.

सारांश, 'जाणोनि नेणतें करी माझें मन,' ह्या अभंगामध्यें जें मागणें केलें आहे कीं, देवा मला तुझी प्रेमखूण दे, आणि मग मी व्यवहारीं असून नसल्यासारखा वागेन तें व श्रेयोमार्गाचें अवलंबन करण्याचा आणि प्रेय जें आहे, त्याचा त्याग करण्याचा उपनिषदांत जो उपदेश आहे, त्याचा इत्यर्थ सारखाच आहे. आपल्याला श्रेयाचा मार्ग अवलंबावयाचा आहे आणि त्यांतच आपला पुरुषार्थ आहे.

---

## कमळिणीचा न्याय.

---

फुलावर कोणाचें प्रेम नसतें? मुलांना तें आवडतें, बायकांना आवडतें आणि आम्हां हिंदुलोकांना तर देवांना अर्पण करण्याकरितां फुलांपेक्षां पवित्र, सुंदर व चांगलें असें कांहींच दुसरें वाटत नाहीं. आपले उत्तमोत्तम विचार प्रदर्शित करण्याकरितां कवीच्या मनाची प्रवृत्ति स्वाभाविकपणेंच फुलाची उपमा देण्याकडे असते, आणि आमच्या संस्कृत काव्यांमध्यें तर कवि, जणूं काय, फुलांनीं वेष्टित अशाच जगामध्यें रहात होते, असे पुष्कळ दाखले सांपडतात, आणि ही गोष्ट केवळ कवींस नव्हे, तर साधारण सहृदय

लोकांसही लागू पडण्यासारखी आहे. कवींना आसपासच्या लोकांची परिस्थिति, सृष्टिसौंदर्य, लोकांचे आचारविचार, समकालीन लोकांचे नित्याचे व्यवहार, त्यांच्यांत घडणाऱ्या विशेष गोष्टी व आपल्या स्वतःच्या सर्व स्थितींचें निरीक्षण करण्याचें सामर्थ्य ह्यांच्यायोगेंही काव्य करण्याची स्फूर्ति होत असावी, आणि मग अर्थात्च ज्यांच्यामुळें कवीला काव्यस्फूर्ति झाली त्या लोकांच्या ठिकाणीं काव्यविषयक जें सृष्टिसौंदर्य, फुलें वगैरे त्यांच्याविषयीं आवड असली तर त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. **कालिदास** व **भवभूति** ह्यांच्या काव्यांचा जर आपण विचार केला, तर असें आपल्या अनुभवास येईल कीं, त्यांच्या वेळीं लोकांना फुलांचें सौंदर्य व लावण्य यांची गोडी होती, आणि झाडें व रोपें यांची ते, आपण सध्यां घेतों त्यापेक्षां विशेष काळजी बाळगीत असत. **कालिदासानें** आपल्या काव्यामध्यें अनुकरणीय लावण्यवती स्त्रीचें जें चित्र रेखाटलें आहे, त्यामध्यें असें दाखविलें आहे कीं, ती स्त्री सदां फलपुष्पांनीं समृद्ध अशा बागेंतील पर्णकुटिकेंत राहत असे; स्वतःच्या हातांनीं तेथील झाडांना पाणी घालीत असे, व त्या झाडांवर तिचें नुसतें प्रेमच होतें असें नाहीं, तर तीं झाडें तिला मित्राप्रमाणें वाटत व त्यांच्याशीं ती एकजीव होऊन जाई.

परंतु, आतां हें सर्व गेलें आहे. ह्या सर्व आतां जुन्या गोष्टी झाल्या! झाडें, लता, वेली, फुलें यांच्या जीवनाशीं आपलें जीवन जणूं काय संलग्न करून घेऊन त्यांच्यावर प्रेम करणें हें आह्मांला मुळीं माहीत नाहींसें झालें आहे; फुलांची आमची आवड अगदींच गेली असें कांहीं नाहीं. माळी फुलें आणतो, किंवा आह्मी बाजारांत जाऊन तीं विकत घेतों. पुरुष त्यांचा वास घेतात, स्त्रिया आपल्या डोकींत त्यांच्या वेण्या करून घालतात; परंतु हें निराळें,

आणि पुष्पवाटिका आपण स्वतः तयार करणें, प्रत्येक फुलझाडाच्या जीवनाची वाढ आपण पाहणें, त्यांची जोपासना करणें, हें निराळें. सारांश हाच कीं, फुलांविषयींचें पूर्वींचें तें खरें प्रेम नाहींसें झालें आहे. पूर्वीच्या लोकांना फूल म्हणजे ईश्वराच्या पावित्र्याचें, सौंदर्याचें व प्रेमाचें चिन्ह आहे असें वाटत होतें. फूल म्हणजे नेत्रास आनंद देणारें किंवा मनास आराम देणारें, एवढेंच नव्हे तर, त्यामध्यें फार गूढ तत्व भरून राहिलें आहे व त्यायोगें पुष्कळ विचार सुचण्यासारखे आहेत, असें पूर्वींच्या लोकांना वाटत असे. आह्मांला फुलें ह्मणजे इतर कित्येक वस्तूंप्रमाणें क्षुल्लक वाटतात. त्यांच्या सौंदर्यांनें त्यांच्या सुगंधानें, रमणीयतेनें आह्मी दंग होऊन जात नाहीं. यावरून आमचा कसा ऱ्हास झाला आहे, हें कळतें. आमच्या पूर्वजांना जणूं काय असेंच वाटे कीं फुलें हीं स्वर्गलोकाहून खालीं आलीं आहेत. ही जी त्यांची समजूत, तींत खरें पाहतां किती तरी अर्थ भरलेला आहे! एकाद्या फुलाकडे पहा ! साधारण मनुष्यापेक्षां त्याचें जीवित कितीतरी वरिष्ठ दर्जाचें असून तें किती विविध आहे ! गुलाब एक प्रकारचें सौंदर्य आपणास दाखवितें, तर जाईजुई दुसऱ्याच प्रकारचें; पण सर्वांपासून पावित्र्याचा, सौंदर्याचा, आनंदाचा, उल्हासाचा धडा आपणांस मिळतो. अशीं कित्येक फुलें आहेत कीं, तीं दिसण्यांत अतिशय मोहक दिसतात व त्यांच्यामध्यें विशेष हें असतें कीं, तीं जणूंकाय आपली मान खालीं घालून उभीं असतात ! एखाद्या विनयशील तरुणीनें आपल्या पवित्र विचारांनीं, आपल्या सुंदर शीलाच्या मधुर परिमलानें ज्याप्रमाणें सर्वांस वेडें करावें, तसाच हा प्रकार होय !

'**जाणोनि नेणतें करीं माझें मन**' या सुंदर अभंगामध्यें तुकोबांनीं ज्या फुलाचें आदरपूर्वक वर्णन केलें आहे, तें कमलपुष्प होय. आपण या पुष्पाविषयीं विचार करूं लागलों असतां हें पुष्प

आपल्यांमध्यें किती तरी सुंदर विचार व मनोवृत्ति जागृत करितें. आणि ह्या फुलापासून आपल्याला किती तरी धडे घेतां येण्यासारखें आहेत.

प्रथम आत्मसाहाय्य, व आत्मविश्वास हा धडा हें फूल आपणांस शिकवितें. कमलपुष्प एकांत अशा कोनाकोपऱ्यामध्यें वाढत असतें, ह्याची कोणी काळजी घेत नाहीं, किंवा निगा बाळगित नाहीं, तथापि आपल्या सौंदर्यानें व आपल्या सुगंधानें तें कोणत्याही फुलास हार जात नाहीं. घाणेरड्या अशा परिस्थितींत तें वाढतें, यावरून तें आपणांस शिकवितें कीं, आपली परिस्थिति कितीही प्रतिकूळ असली तरी प्रथमच आपण हात पाय न गाळतां निश्चयानें वागलें पाहिजे. आणि मग अशा प्रकारें आपण आपल्या स्वतःशींच इमानानें वागलों, आपल्या उच्च ध्येयापासून वरीलप्रमाणें प्रतिकूल स्थितींतही किमपि ढळलों नाहीं, कीं त्याचा परिणाम इतरांवर तात्काळ होतो व हें आपलें बाणेदार वर्तन त्यांच्या अंतःकरणाचें परिवर्तन घडवून आणावयासही कारण होतें. हा धडा कमलपुष्पापासून आपण घेण्यासारखा आहे. त्याचा धीटपणा व त्याची निर्भयता व या सर्वांपेक्षांही त्याचा विशेष गुण जो पवित्रपणा तो आपण लक्षांत नित्य ठेविला पाहिजे.

सर्वांस मोहित करून टाकणारें असें शांत, स्थिर जें प्रेम त्या प्रेमाचेंही चिन्ह कमलपुष्प आहे. अशी एक कल्पना आहे कीं, मंदिरांत जातेवेळीं प्रथम जो दरवाजा लागतो, त्यास सौंदर्यद्वार असें म्हणतात. हें जर खरें तर मग, कमलपुष्पापेक्षां अधिक सुंदर तें काय आहे ! आपणांस त्याच्या आकाराचें किंवा रंगाचें यथातथ्य वर्णन कसें करतां येईल ! आपण एवढेंच फार तर म्हणूं कीं, त्याला पाहून आपलें अंतःकरण उन्नत होतें, प्रसन्न होतें व आनंदित होतें; त्याचप्रमाणें आपणांस

त्याच्या सौंदर्याचें तरी वर्णन कसें करतां येईल! आपण एवढेंच म्हणूं कीं, आपल्या क्षुब्ध अंतःकरणास त्यामुळें शांति मिळते व असें सर्व प्रकारें सुंदर पुष्प ज्यानें निर्माण केलें, त्या विधात्याची आठवण हें कमलपुष्प करून देतें.

सारांश कमलपुष्प आपल्या ठिकाणीं जागृति उत्पन्न करितें, तीं अशा रीतीनें. प्रेमाचा महिमाच मुळीं असा आहे कीं, निःस्वार्थ-बुद्धीनें प्रेम करणारा मनुष्य आपल्या स्वतःस जणूं काय विसरतो, पण ज्यांच्यावर प्रेम करितो त्यांस सर्वस्वीं आपलेसे करून टाकतो. हें तत्त्व बुद्धाच्या एका गोष्टींत फार चांगल्या रीतीनें प्रतिपादिलें आहे. त्या गोष्टीचें साधारण स्वरूप मी तुम्हांला सांगतों. थोर पुरुषाचें लोकांवर किती वजन असूं शकतें व अशा प्रकारची एक व्यक्ति लोकांवर कसा नैतिक अधिकार गाजवूं शकते, याची आपल्याला कमी अधिक कल्पना असेलच. अशा प्रकारचें ज्यांचें सामर्थ्य आहे, असा ज्यांचा अधिकार आहे, असे पुरुष बहुजनसमाजाच्या ठिकाणीं किती तरी आनंद, उत्साह, आशा, विश्वास उत्पन्न करावयास कारण होत असतात! भगवान् बुद्ध अशाच प्रकारचा महात्मा होता, व त्याच्या प्रेमाच्या आड कोणतीच गोष्ट येणें शक्य नव्हतें; त्याचें प्रेम इतकें उत्कट असे, त्यांत इतकें अवर्णनीय सामर्थ्य असे कीं, त्याच्यापुढें विरुद्ध पक्षाचा बिलकुल टिकाव लागत नसे व तें प्रेम त्यास पूर्णपणें जिंकित असे. तथापि त्या वेळीं असा एक दुष्ट मनुष्य होता कीं, त्याला आपल्या शक्तीचा मोठा अभिमान असे व आपल्या जवळील तरवारीची मोठी घमेंड वाटे. त्याला वाटलें, बुद्धाचें प्रेम आपल्या शक्तीपेक्षां व आपल्या तरवारीच्या धारेपेक्षां व तिच्या प्रतापापेक्षां कधींही श्रेष्ठ ठरूं शकणार नाहीं. या गोष्टीची त्याला प्रचीति पहावीशी वाटली व तसा प्रसंगही लवकरच आला. एके दिवशीं उपदेश करण्याकरितां

बुद्ध प्रभु बाहेर गेला असतां त्याला हा दुष्ट मनुष्य वाटेंत भेटला. दांत ओठ खात खात तो क्रूर मनुष्य हातपाय आपटीत बुद्ध प्रभूपुढें गेला. त्वेषानें आपली तरवार उपसून तितक्याच त्वेषानें म्हणाला ' अरे, ही पहा माझी तरवार, तुझें रक्त प्राशन करण्याकरितां आतुर झालेली आहे. तूं नेहमीं त्या भिकारड्या प्रेमाची फार बढाई सांगत असतोसना ? आतां मला पाहूं दे तुझें तें प्रेम, ह्या माझ्या म्यान्यांतून निघालेल्या तरवारीला कसें जिंकतें तें !' असें म्हणून उपसलेली तरवार पाजळीत तो बुद्ध प्रभूच्या अंगावर त्यास मारण्यासाठीं धांवला; तथापि त्यामुळें बुद्धाच्या थोर, सौम्य व प्रेमळ अंतःकरणाचा तिळमात्र क्षोभ झाला नाहीं. दुसऱ्याचा तिरस्कार करणाऱ्या त्या मनुष्याच्या बाह्य वृत्तीकडे लक्ष न देतां त्याच्या अंतःकरणाच्या गूढ प्रदेशामध्यें जें प्रेमबीज होतें, त्यास जणूं काय आपल्या दृष्टीपुढें आणून बुद्धप्रभू म्हणाले " बाबारे, तूंही माझ्या प्रेमाच्या कक्षेच्या बाहेर नाहींस, इतकेंच नव्हे तर इतरांपेक्षां माझें तुझ्यावर अधिक प्रेम आहे. " हे शब्द ऐकताक्षणींच, त्याच्या हातांतून ती तरवार खालीं गळून पडली, व बुद्धाविषयीं त्याच्या ठिकाणीं आदरभाव व पूज्यत्वबुद्धि जागृत झाली व त्याचे हात अगदीं त्याला नकळत एकत्र होऊन नम्रभावें करून बुद्धप्रभूस त्यानें प्रणिपात केला. हाच पुढें बुद्धाचा शिष्य बनला, अशी कथा आहे.

---

## जाणोनि नेणतें होणें म्हणजे काय ?

आमच्यासारख्या साधारण लोकांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, आपण समाजामध्यें कशाही प्रकारें वागलों, व कांहींही केलें, तरी हरकत नाहीं. आपला दर्जा कांहीं एवढा मोठासा

नाहीं, तेव्हां आपल्या चालण्याबोलण्याकडे लोकांचें विशेषसें लक्ष जाणें शक्य नाहीं, म्हणून आपल्या वर्तनक्रमाविषयीं फारशी काळजी वाळगण्याचें आपणांस कारण नाहीं. अशा प्रकारच्या विचारांमुळें आपल्या बोलण्यासवरण्यांत, आपल्या चालीरीतींत आपण निष्काळजी व गबाळ बनण्याचा व दिवसानुदिवस ही संवय अधिकाधिक आपणांस जडण्याचा संभव आहे.

परंतु अशा प्रकारचें हें आपलें वर्तन बाह्य होय, त्याचा आपल्या मनावर कांहीं परिणाम होत नाहीं, असें मात्र नव्हे. खरें पाहिलें तर या गोष्टी आपल्या मनाच्या व्यापाराच्या दर्शक होत. अशा प्रकारच्या निष्काळजीपणाच्या वर्तनावरून हें उघड होतें कीं, त्या मनुष्याच्या मनास योग्य वळण मिळालें नसून एकाद्या थोर आणि उदात्त अशा गोष्टीचें कौतुक करण्यास किंवा तीवर प्रेम करण्यास त्याच्या मनास संवय लागलेली नाहीं.

ईश्वराच्या कृपेनें मनुष्यजातीस ज्या देणग्या प्राप्त झालेल्या आहेत त्या सर्वांमध्यें भक्तिभाव दाखविणें व पूज्यबुद्धि व्यक्त करणें हे दोन गुण मनुष्यमात्राचे ठायींच स्पष्ट रीतीनें दिसून येतात, ह्या दोन गुणांमुळें मनुष्याला थोरपण प्राप्त होऊनही तो नम्र असूं शकतो, याच त्याच्या गुणांमुळें त्यास परमेश्वराचा सहवास होऊं शकतो, त्याचें सान्निध्य त्यास लाभतें.

आदरभाव व्यक्त करणें व ज्याच्याविषयीं आपल्याठिकाणीं हा आदरभाव असतो, त्याचे सबंधानें भक्ति दर्शविणें ह्या दोन गुणांची वाढ ज्यांच्या ठिकाणीं झालेली नसते, आपण व आपली परिस्थिति ह्यांतच गुरफटून राहिल्यामुळें आपल्या सभोंवार जें सुंदर आहे, जें शुभ आहे, जें आनंदकारक आहे, जें पवित्र आहे, ह्यांच्याकडे ज्यांचें लक्षच जात नाहीं, त्यांचे हाल काय पुसावे! त्यांना आपल्या

स्वतः पलीकडे कांहीं दिसत नाहीं. त्यांची स्वार्थबुद्धि जोरावर असते, अशा व्यक्तींच्या ठिकाणीं उत्तम रीतिभातींचा जमाव दिसला, तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. ते इतके भेकड झालेले असतात कीं, आपल्या सभोंवारच्या एकूणएक सर्व लोकांचें लक्ष आपण काय बोलतों, कसें चालतों, करितों काय इकडे लागलेलें असतें असें त्यांस वाटतें. आणि मग कोणीही कोणावर टीका केली तरी ती आपल्या-लाच लागू पडण्यासारखी आहे एवढेंच नव्हे, तर तींतील प्रत्येक शब्द आपल्यालाच उद्देशून आहे असेंही त्यास वाटत असतें, व आपल्या प्रत्येक शब्दावर किंवा कृत्यावर टीका होईल अशी या लोकांना भीति वाटते, म्हणून त्यांच्या मनास स्वास्थ्य बिलकूल नसतें.

कोणत्याही प्रकारची टीका असली तरी तिचा अशा लोकांवर तात्काळ परिणाम घडतो. त्यांच्याविषयीं कोणी वाईट शब्द काढलेला त्यांच्या कानीं आला किंवा त्यांना नुसता संशय आला, तरी ते फार अस्वस्थ होतात, त्यांना कांहीं सुचत नाहीं. त्याच त्या शब्दाची, पुन्हा पुन्हा आठवण करून ते आपले स्वतःचे हाल करून घेतात ! त्यांना ह्या टीकेचा विसर पडत नाहीं, ज्यांनीं टीका केली तीं माणसें त्यांच्या दृष्टीपुढून जात नाहींत व त्यामुळें आयुष्यामधील सर्व प्रकारच्या आनंदास ते पारखे होतात ! एका ग्रीक तत्त्ववेत्त्याचें असें म्हणणें आहे कीं, सुखमय जीवनाचें खरें रहस्य म्हणजे कोणत्याही गोष्टीमुळें मनास रुखरुख वाटूं न देतां ती लवकर विसरून जाणें हें होय. संसारामध्यें थोडासा त्रास झाल्यामुळें किंवा गैरसमजाचें स्तोम माजविल्यामुळें आपणांला किती तरी दुःख सहन करावें लागतें ! अशा प्रकारच्या लहान गोष्टी आपल्या डोळ्यांआड करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे व त्यायोगें आपल्या मनाची शांति ढळूं देतां कामा नये.

**'जाणोनि नेणतें करीं माझें मन'** ह्या अभंगामध्यें अशाच प्रकारच्या नियमाचा तुकोबांनीं आपल्याला बोध केला आहे. खरें पाहिलें, तर ह्या नियमाची किंवा ह्या सिद्धान्ताची व्याप्ति तुकोबांस वाटली त्याहीपेक्षां अधिक आहे असें एकपक्षीं म्हणतां येतें. 'नेणते-पणाचा' धडा तुकोबांनीं आपणांस शिकविलेला आहे. आपण एकादी वस्तू पहातों किंवा एकादा देखावा पहातों, तेव्हां त्या वस्तूविषयींच्या किंवा त्या देखाव्याविषयींच्या मनास द्विधा करून टाकणाऱ्या ज्या क्षुल्लक अवांतर गोष्टी त्यांकडे दुर्लक्ष होऊन त्या वस्तूच्या किंवा त्या देखाव्याच्या मुख्य कल्पनेकडे आपलें लक्ष वेधतें तें ह्याच तत्त्वानुसारें. प्रथमच एकाद्या मनुष्याशीं आपला परिचय घडतो, तेव्हां त्याचें बाह्य स्वरूप न्याहाळून पहाण्याच्या भानगडींत आपण सहसा पडत नाहीं, तर साधारणत: त्याचें जें वर्तन, बोलणेंचालणें, हातवारे, बोलण्याची रीत, त्यायोगें आपलें मत चटकन् बनून जातें व त्या मताप्रमाणें आपलें लक्ष त्याच्याकडे अधिकाअधिक लागतें, किंवा आपणांस त्याचा मुळीं कंटाळा तरी येतो. आपल्या मनावर हा जो परिणाम होतो तो अगदीं क्षणार्धांत होतो. आपल्याला धड विचार करावयासही सवड नसते. पहा, आपण एकादा देखावा पाहतों, तेव्हां त्यांतील पर्वत, महासागर, ढग, किंवा आकाश ह्यांमुळें आपलें लक्ष्य तिकडे वेधलें जातें असें नाहीं, तर तो देखावा अवलोकून मनावर अत्यल्प अवकाशांत जो अत्यंत इष्ट असा परिणाम होतो त्यायोगें आपलें मन त्या देखाव्याकडे अधिक लागतें. एकाद्या वस्तूचें कौतुक करण्याचें सामर्थ्य एकाद्या कवीमध्यें ज्या मानानें असेल, त्या मानानें त्याची कल्पनाशक्तीही वेगानें भराऱ्या मारूं शकते. सृष्टींतील सुंदर वस्तु अवलोकन करून आपणांस शुद्ध आनंद होत असतो; त्यास आपली ही सृष्टि पुष्कळ अंशानें कारणीभूत झालेली असते. आपलें जें

नित्याचें वाचन त्यासही हा नियम लागू आहे. एखाद्या ग्रंथाचा मुख्य प्रतिपाद्य विषय काय आहे तो समजून न घेतां त्या पुस्तकाची पानें भराभर वाचीत गेल्यानें नुसता शीण मात्र होतो. आपण एखादा ग्रंथ वाचला आणि त्याची जी मध्यवर्ती, प्रतिपाद्य शिक्षा ती जरी आपल्या लक्षांत आली नाहीं, तरी ग्रंथ वाचून आपल्या ज्ञानांत, आपल्या अनुभवांत कांहीं तरी भर पडली असें तरी आपल्याला वाटलें पाहिजे. व्यक्तिव्यक्तींची खरी लायकी जाणण्याची अगर वस्तूंची उपयुक्तता कळण्याची पात्रता आपल्यांत आली पाहिजे. असें कांहीं झालें, तरच आपल्याला ग्रंथवाचनाच्या सहाय्यानें आपलें आयुष्य मनोरम करितां येतें. नाहींतर भाराभर पारायणानें वर म्हटल्याप्रमाणें नुसता शीण मात्र व्हावयाचा.

क्षणभर विचारासाठीं वरील अभंगच घ्या. यांत तुकोबांनीं आपणाला स्पष्ट सांगितलें आहे कीं, दुसऱ्या कोणीं आपलें जर अहित केलें असेल, तर तें विसरा, त्याची आठवण जागृत ठेवूं नका; एवढेंच नव्हे, तर आपलें अहित करणाराला क्षमा करा; त्याचेवर प्रेम करा. आठवण विसरून जाण्यांत खरा मोठेपणा, खरें औदार्य नाहीं, तर क्षमा करून, अहित करणाऱ्या व्यक्तीवर प्रेम करण्यांत आहे. आपल्याला झालेला जाच विसरावयाचा, त्याच्या गुणांचें चीज करावयाचें, त्यास क्षमा करावयाची व त्याचेवर प्रेम करावयाचें हें नेणतेपण. अशा रीतीनें जे स्वदुःखासंबंधानें, स्वतःसंबंधानें, झालेल्या अन्यायाविषयीं वागले ते संत झाले, म्हणजे त्यांचें संतपण, त्यांचा साधुपणा वरील प्रकारच्या कृतींच्याद्वारें दृग्गोचर झाला. आपणही नित्य व्यक्तिमात्रांत आढळून येणाऱ्या व्यंगांकडे दुर्लक्ष्य करून गुणांचें ग्रहण करण्याचा प्रयत्न करावा. गुणांकडे विशेष लक्ष पोंचविलें म्हणजे दोषांचें महत्त्व वाटत नाहीं, तिकडे आपलें लक्ष जात नाहीं; अर्थात् ही वृत्ति सतत प्रयत्नानेंच आपल्याला लाभण्यासारखी आहे.

या ठिकाणीं मला **मामा परमानंद** यांची आठवण होते. ते आधुनिक काळचे साधुच होते. त्यांची वृत्ति नेहमीं शांत व सौम्य असून दुसऱ्याचे अपकार ते नेहमीं विसरून जात व त्यांना क्षमा करीत. त्यांची अशी श्रद्धा असे कीं, मनुष्यामधील तमोगुणाचा नाश होऊन सत्त्वगुण हा उदित होणारच. जे कोणी तरुण त्यांची सल्लामसलत घ्यावयास जात, त्यांना ते नेहमीं उत्तेजनच देत. कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, मामासारखीं माणसें दुर्बल होत. परंतु मी सांगतों कीं, तसें कांहीं नाहीं. जीं माणसें करारी असतात, तींच सौम्यवृत्तीचीं असतात. **मामांची** वृत्ति किती तरी करारी बाण्याची असे, त्यांच्या लेखांमध्यें किती तेज, किती बाणेदारपणा, किती तरी सामर्थ्य असे. त्या वेळीं ते **'नेटिव्हओपिनियन'** पत्राचे संपादक होते. त्यांचे स्फुट लेख जोरदार, जसे हवेत तसे, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ लक्षांत आणून देणारे, व निर्भीडपणें लिहिलेले असत. एखादा खोडसाळ वेडगळ किंवा भागूबाईपणाचा लेख कोठें प्रसिद्ध झाल्यास त्यावर ते तुटून पडत. त्यांच्यामध्यें इतकें सामर्थ्य होतें, तथापि ते जें बोलत किंवा करीत, त्यामध्यें स्वाभाविकच थोरपणा, सभ्यता, प्रेम, व मार्दव असे. प. वा. न्या. **रानडे** हेही अशाच प्रकारचे दुसरे गृहस्थ होत.

आपल्यापैकीं पुष्कळांच्या हयातीमध्यें हे थोर गृहस्थ होऊन गेले, म्हणून यांच्या चरित्रांमुळें आपल्या अंतःकरणामध्यें उत्साह उत्पन्न व्हावयास पाहिजे. ज्यांचा ज्यांचा म्हणून या थोर विभूतींशीं संबंध घडून येत असे, त्यांच्यावर यांच्या चारित्र्याचा जो विलक्षण परिणाम घडून येत असे त्याचें रहस्य काय, याचा प्रत्येकानें विचार करावा. एका वाक्यांत सांगावयाचें ह्मणजे ते दुसऱ्यांनीं केलेला अपकार विसरून जाऊन त्यांना क्षमा करीत, त्यांजवर प्रेमही करीत, सत्य जें असेल तें कोठूनही येवो

त्याचें अवलंबन करीत, '**सत्यमेव जयते नानृतम्**' या वचनावर त्यांचा पूर्ण विश्वास असे, ते नेहमीं आशावादी असत व त्यामुळें पुष्कळांच्या अंतःकरणामध्यें त्यांनीं आशेचे व आनंदाचे अंकुर उत्पन्न केले आहेत. आपणही त्यांचें अनुकरण कृतीच्या द्वारें करण्याचा आपल्या आयुष्यांत संकल्प करून त्यांच्या बोधाचें चीज करून दाखवूं या.

---

## विद्यार्थ्यांची जबाबदारी.

माझ्या आजच्या व्याख्यानाचा विषय **विद्यार्थ्यांची** (तरुणांची) **जबाबदारी** हा आहे. माझ्या कित्येक तरुण मित्रांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, आपण विद्यार्थी दशेंत आहों, तेव्हां आपली जबाबदारी म्हटली म्हणजे शाळेंत किंवा कॉलेजांत नियमितपणें जाणें व अभ्यास चांगल्या रीतीनें करून परीक्षा पास होणें इतकीच आहे. ह्याशिवाय आणखी जबाबदारी काय असणार ? होय, ही जबाबदारी इतकी उघड आहे कीं, ती प्रत्येकाच्या सहज दृष्टोत्पत्तीस येण्यासारखी आहे. क्षणोक्षणीं हिची जाणीव तुमच्या ठिकाणीं जागृत असल्यामुळें, मी तिच्यासंबंधाचा आज विचार न करितां, विद्यार्थ्यांच्या श्रेष्ठतर ज्या जबाबदारी आहेत, त्यांविषयींच चार शब्द सांगणार आहें. ह्या जबाबदारींकडे तुम्हीं दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं. कारण त्या ओळखून त्याप्रमाणें वर्तन करण्यावर तुमची व तुमच्या देशाची भवितव्यता अवलंबून आहे. ह्या जबाबदारींची योग्य जाणीव तुमच्या ठिकाणीं उत्पन्न झाली म्हणजे विद्यार्थीदशा ही आयुष्यक्रमणाची पूर्व तयारी आहे, हें तुम्हांला समजेल. आज आपण जसें करूं तसें पुढें भरूं; म्हणून

आतांपासूनच आपण व्यक्तिशः शीलाचा भक्कम पाया घालून राष्ट्रीय शील वरिष्ठ दर्जाचें होईल, असा प्रयत्न केला पाहिजे. एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे आपण मनुष्याच्या दर्जाला साजेसा योग्य प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे, हें आपण ओळखिलें पाहिजे.

हिंदुस्थानांत सत्ययुगाचा अद्यापि अवतार होणें आहे, असें जें कित्येक म्हणतात, त्यांत बराच खरेपणा आहे. आपला देश प्राचीन काळीं सुधारणेच्या उच्चत्तम शिखरावर वास करीत होता, वाङ्मयांत व कित्येक कलाकौशल्यांत तो पूर्णत्वाला पोहोंचला होता. त्याची प्रगति एकाएकीं बंद पडून तो आपल्यापेक्षां सुधारणेंत मागें असलेल्या राष्ट्रांच्या तडाक्यांत सांपडून ज्या ज्या राष्ट्रांनीं यावर राज्य चालविण्याचा प्रयत्न केला त्यांच्या अंगचा कमकुवतपणा स्पष्ट उघडकीस येऊन, दैवगतीनें तो परत सुधारलेल्या व नियमित राज्यपद्धतीनें चालणाऱ्या इंग्लंड देशाच्या ताब्यांत गेला आहे. बुद्धिवैभवानें व धार्मिकतेनें श्रेष्ठ असा हा आमचा देश, ज्यांचा इतिहास फार जुना नाहीं, अशा नव्या दमाच्या लोकांशीं संलग्न झालेला पाहून ही परमेश्वरी योजनाच आहे, अशी खात्री झाल्यावांचून राहत नाहीं. इंग्रजी राज्य येथें सुरू झालें व इंग्रजांनीं अनेक सुधारणा घडवून आणिल्या, ह्या सर्व गोष्टींचा विचार करितां अशी खात्री होते कीं, परमेश्वराच्या इच्छेनुरूप ह्या प्राचीन राष्ट्राला इंग्लंडच्या मदतीनें सुदिन प्राप्त व्हावयाचे आहेत. ही सुस्थिति प्राप्त होणें कशावर अवलंबून आहे, अशी पृच्छा तुम्ही कराल, तर मी सांगतों कीं, ती आमच्या हल्लींच्या राजकीय व सामाजिक सुधारकांवर अवलंबून नसून ती हल्लीं शाळांत व कॉलेजांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांवर अवलंबून आहे. हल्लींची तरुण पिढी हे राष्ट्राचे धनी होत. राष्ट्राची भविष्यकालीन स्थिति चांगली व्हावी, अशी तुमची इच्छा असेल तर तुम्हीं आपली मनें सद्विचारांनीं, सदाकांक्षांनीं व सद्गुणांनीं भरून टाकण्याचा

प्रयत्न केला पाहिजे. राष्ट्राची भवितव्यता ज्यांच्यावर अवलंबून आहे त्यांच्या मनांत प्रथमतः कोणती कल्पना विशेष रीतीनें दृढ झाली पाहिजे बरें? आपण मिळवीत असलेलें शिक्षण हें केवळ आपलें पोट भरण्याचें, आपली सुखसमृद्धि करण्याचें व कुटुंबाचें सुख वाढविण्याचें साधन नसून त्याच्या योगानें आपल्या पौरुषाला शोभतील अशीं कृत्यें नीट रीतीनें करितां यावीं, जनतेच्या नेतृत्वाचें काम करण्याची अंगीं पात्रता यावी, एकंदरीनें आयुष्यांतील युद्धप्रसंगाला उत्तम रीतीनें तोंड देतां यावें, हें शिक्षणाचें उद्दिष्ट होय व ही ती कल्पना होय.

ज्ञान म्हणजे सामर्थ्य असें म्हणतात. पण ज्ञानाचा आपलपोटेपणांतच जर अंत व्हावयाचा असेल व उदरंभरणापुढें त्याची मजल जात नसेल, तर त्या सामर्थ्याचा यथायोग्य उपयोग झाला असें म्हणतां येणार नाहीं. पशुपक्षांनाही पोट भरण्याचें ज्ञान असतें. पण मनुष्य व पशुपक्षी ह्यांत फरक हाच आहे कीं, मनुष्याला परमेश्वरानें मनुष्यजातीची, विशेषतः आपल्या लोकांची, उन्नति करण्यास लागणारें सामर्थ्य व बुद्धि दिली आहे, ती पशुपक्ष्यांना नाहीं. सुखोपभोगांत दक्ष असणाऱ्यांना ख्रिस्तानें "उद्यांची काळजी वाहूं नका, खाण्यापिण्याविषयीं विशेष विचार करूं नका, प्रथमतः देवाच्या राज्याकडे लक्ष लावा, म्हणजे संसाराच्या सर्व वस्तु तुम्हांला मिळतील" म्हणून जो उपदेश केला आहे, तो निरर्थक भासण्याचा संभव आहे. पण इतिहासाची साक्ष अशी आहे कीं, राष्ट्राचा अभ्युदय होतो, तो आपलपोट्या माणसांमुळें होत नाहीं; तर जीं माणसें आपल्या सुखाचा व चैनीचा फारसा विचार न करितां आपलें तन-मन-धन जनसेवेला अर्पण करितात, अशा नरवीरांमुळेंच होतो. इतिहासामधून अशा माणसांचीं चरित्रें काढून टाकलीं असतां तो शून्यवत् होईल. राष्ट्राचें वैभव जर स्वार्थत्याग करणाऱ्या, किंब-

हुना राष्ट्रासाठीं आपले प्राण खर्ची घालण्याऱ्या मनुष्यांवर अवलंबून आहे, तर प्रत्येक विद्यार्थ्यानें अशा मनुष्यांचीं उदाहरणें पाहून आपलें जीवन, आपल्या आकांक्षा व उत्साह उज्ज्वल करावयास नको काय? ही कल्पना प्रत्येकाच्या ठिकाणीं दृढ झाली पाहिजे. ही कल्पना आपल्या स्वभावाचें प्रतिअंग व्हावें म्हणून प्रत्येक विद्यार्थ्यानें आतां-पासून आपल्या बुद्धीची व आध्यात्मिक गुणांची वाढ करण्यास शिकलें पाहिजे; कारण हे गुण म्हणजे खऱ्या देशाभिमानाचा पाया होय.

हें साध्य व्हावें म्हणून तुम्हीं एव्हांपासून स्वकर्तव्याविषयीं उच्चतम ध्येयाची कल्पना मनांत आणिली पाहिजे. जगावयाचें तें चैन करण्यासाठीं, ही जीवनाची कल्पना भ्रामक असून, जीवन म्हणजे कर्तव्यनिष्ठा, हीच कल्पना खरी आहे. परमेश्वरानें आपल्याला विना-कारण जन्मास घातलें नाहीं, त्यांत त्याचा कांहींतरी उच्च हेतु आहे. आपण जन्मास येऊन अशी कांहीं तरी करणी करावी कीं, तिचा लाभ सर्वांना नेहमीं घेतां येईल. पुष्कळ दिवस टिकणारें कृत्य म्हणजे सत्कृत्य होय. आमचें हें जीवन, दुसऱ्याचें जीवन सुखाचें करण्याकरितां म्हणून आहे. स्वकर्तव्याविषयीं उच्च ध्येय म्हणजे जीवनाविषयीं उच्च ध्येय; तें कसें तें मी तुम्हांला सांगतों. जीविताचें उच्च ध्येय ह्मणजे काय हें अगदीं थोडक्यांत सांगतां येण्यासारखें आहे, परंतु त्याची तुम्हांला चांगली उमज व्हावी ह्मणून तें जरा विस्तृतपणें सांगणें भाग आहे. जीविताचें उच्च ध्येय म्हटलें कीं, त्यांत तीन कल्पनांचा मुख्यतः समावेश होतो. त्यांतील पहिली कल्पना ही आहे कीं, मनुष्याचा जन्म हा त्याच्याच स्वतःसाठीं नसून तो इतरांसाठींही आहे; आपल्याच कुटुंबापुरता नसून देशासाठींही आहे. आपण एकमेकांचें महत्त्व जाणून एकमेकांच्या उपयोगी पड-ल्याविना आयुष्यांतील व्यवहार चालणार नाहींत. उपजल्यापासून

हरएक वस्तूसाठीं आम्हांला दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें. ज्याचें जीविताचें ध्येय उच्च दर्जाचें असतें, त्याला आपला जन्म सर्वांकरितां आहे हें मान्य असतें. मनुष्य आपली व आपल्या कुटुंबाची काळजी वाहूं लागला ह्मणजे तो दुसऱ्या कोणाच्याही उपयोगी पडत नाहीं. पण जो आपल्या देशबांधवांची सेवा करितो, तो ती करीत असतां आपलीही सेवा बजावितो. मोठ्यामध्यें लहानाचा समावेश होतो, हें जें भूमितीचें अबाधित तत्व त्या तत्वाप्रमाणें त्याचें वर्तन होत असतें. मी केवळ माझ्याचपुरता नाहीं, ही उच्च जीवितध्येयाची पहिली कल्पना होय.

इतकेंच नव्हे, तर ह्या कल्पनेंत आणखीही खोल अर्थ आहे. तो हा कीं, देशसेवा करावयाची ती अंधपणानें किंवा अविचारानें न करितां शांतपणानें केली पाहिजे. मनुष्याची सेवा करण्याचे जसे दोन प्रकार आहेत तसे देशसेवेचेही आहेत. एखाद्या मनुष्याचें हित व्हावें, त्याचें कल्याण व्हावें, अशी आपली इच्छा असली तर आपण कोणत्या मार्गाचें अवलंबन करूं बरें ? त्या मनुष्याचे गुणावगुण काय आहेत, हें आपण प्रथमतः शोधून काढून त्याची खुशामत न करितां, आपण सर्वगुणसंपन्न आहों अशी त्याची समजूत होऊं न देतां त्याच्या उणीवा त्याच्या नजरेस आणून त्याला सन्मार्गाला लावण्यास आपण झटणार नाहीं काय? लोकांना त्याच्यासंबंधानें काय वाटतें हें आपण त्याला सांगणार नाहीं काय ? एखाद्यास मोठेपणा प्राप्त करून द्यावा असें आपणांस वाटल्यास ‘ बाबा तूं आपली खरी योग्यता जाण आपण अपूर्ण आहों, आपल्या प्रगतीला कधींही अंत नाहीं, प्रत्येक गोष्टीपासून आपणाला कांहीं तरी शिकतां येण्यासारखें आहे, ’ असाच उपदेश आपण त्यास करणार नाहीं काय ?

जो गर्वानें फुगून जाऊन सर्वज्ञतेची घमेंड बाळगितो, अशा मनुष्याला आपण चहातों, कीं जो न्यूटनप्रमाणें आपणाला येतें

तें कांहींच नाहीं, अजून पुष्कळ शिकावयाचें आहे, असें मानतो त्याला? अर्थात् दुसऱ्या प्रकारच्या मनुष्याला. व्यक्तीविषयीं हें जसें खरें आहे, तसें राष्ट्रसंबंधानेंही आहे. कारण, राष्ट्र म्हणजे व्यक्तिसमुदाय होय. व्यक्तीची स्तुति केली असतां, आपण पूर्ण आहों अशी तिची भावना होऊन तिची अवनति होण्याचा संभव असतो. राष्ट्रसंबंधींही असेंच आहे. आपण प्रगतीच्या शिखरावर पोंहोंचलों असें मानणें म्हणजे अवनतीची तयारी करण्यासारखें आहे.

कर्तव्यासंबंधाच्या भ्रामक कल्पनेनें व खोट्या अभिमानानें देशाची अधोगति होण्याला वेळ लागत नाहीं. जो मनुष्य राष्ट्राच्या अवगुणांकडे दुर्लक्ष करितो व वेळीं अवेळीं त्याचे पोवाडे गाण्यांत कालक्षेप करितो, तो देशसेवा करितो, असें म्हणतां यावयाचें नाहीं. उलट पक्षीं ज्याचें कर्तव्यध्येय उच्च आहे, तो आपल्या देशाची स्थिति कशी आहे, त्याच्या ठिकाणीं गुण व अवगुण कोणते आहेत, अवगुण कसे काढून टाकितां येतील, देशाची सुधारणा कशी करितां येईल, इत्यादि गोष्टींचा विचार करण्यांत व कार्यें घडवून आणण्याचे कामीं आपल्या आंगचा उत्साह खर्च करितो; अशाच मनुष्याला स्वदेशाभिमानी हें नांव देतां येईल. रे. फादर डिडन नांवाच्या एका फ्रेंच ग्रंथकारानें जर्मन लोकांसंबंधानें एक पुस्तक लिहिलें आहे. जर्मन लोकांचा अभ्युदय कां होत आहे, फ्रेंच लोक अवनतीप्रत कां जात आहेत, याचा विचार करितांना सदरहू ग्रंथकार म्हणतो, "स्वतःला भलत्याच भ्रमांत न पाडतां व देशाची विनाकारण स्तुति न करितां मी आपल्या देशासंबंधानें आपले विचार प्रगट करीत आहे. फ्रान्स देशावर माझें पूर्ण प्रेम आहे व त्याची निरपेक्षतेनें सेवा करण्यास मी तयार आहें." या वाक्यांत कर्तव्याच्या उच्च ध्येयासंबंधाच्या दुसऱ्या कल्पनेचा अन्तर्भाव होतो. देशावर आपलें खरें प्रेम असल्यास त्याचीं व्यंगें घालविणाऱ्याचा आपण द्वेष करितां कामा

नये. उलट प्रेम आहे म्हणूनच व्यंगें समजून घेऊन देशसेवा बजाविली पाहिजे.

वर उल्लेखिलेला ग्रंथकार म्हणतो "मी ताठा, द्वेष, व मत्सर ह्यांनीं बनलेल्या देशाभिमानाच्या विरुद्ध आहें; अशा देशाभिमानाची दृष्टि लांबवर पोहोंचत नाहीं. कर्तव्य हेंच ज्यांचें उच्च ध्येय आहे ते अदूरदर्शी देशाभिमानाला तुच्छ मानतात." आम्ही सुधारलेले होतों तेव्हां युरोपिअन लोक रानटी स्थितींत होते; तेव्हां आम्हां हिंदी लोकांना युरोपिअनांनीं उपदेश करण्याचें प्रयोजन नाहीं, असें अशा लोकांना वाटत नाहीं. उन्नत स्थानाप्रत पोहोंचलेले आम्ही आतां अवनतीप्रत कसे आलों व जे पूर्वी रानटी होते त्यांची आतां सुधारणा कशी झाली, ह्या विचारानें आमचें मन भरून जातें. जो लोकांना न भितां त्यांचीं व्यंगें स्पष्टपणें त्यांना कळवितो, जो निरपेक्ष बुद्धीनें देशसेवा करितो, व्यक्तीला आत्मज्ञानाची जरूरी आहे तशी देशालाही आहे असें स्पष्टपणें प्रतिपादितो, जो लोकाराधना करून तात्पुरती लोकप्रियता मिळविण्याचा प्रयत्न करीत नाहीं, काळास अनुसरून प्रगति करूं, नाहीं तर मरूं, असें निर्भीडपणें कथन करतो तोच खरा देशाभिमानी पुरुष होय.

येथपर्यंत मीं कर्तव्याच्या उच्च ध्येयांत समावेश पावत असलेल्या दोन कल्पना आपल्यापुढें मांडल्या आहेत. एवढ्यानेंच ध्येयाची व्याख्या संपूर्ण होत नाहीं. मनुष्य अंधभक्तीनें देशसेवा करील तर ती खरी देशसेवा होणार नाहीं; त्याचप्रमाणें एका विवक्षित बाबतींत बजावलेली सेवाही खरी सेवा नव्हे. देशाचें वैभव व कल्याण ज्यांवर अवलंबून असतें, त्या सर्व गोष्टींत त्याची प्रगति होईल, अशी सेवा ही खरी सेवा होय. देशाचें सुख व अभ्युदय, नीति व वैभव हीं त्याच्या शासनपद्धतीवर व धार्मिकतेवर अवलंबून असतात. मनुष्य हा केवळ एखाद्या तक्ताधिपतीची प्रजा व नागरिक नसून समाजाचा

एक घटक आहे. इतकेच नव्हे तर तो विवेक व नैतिक सामर्थ्यानें युक्त असा मन असलेला प्राणी आहे. सरकाराच्या कायद्यांनीं त्याचें शील बनण्याला जसें साहाय्य होतें, तसेंच किंबहुना त्याहूनही अधिक समाजाचीं बंधनें व धार्मिक कल्पना ह्यांनीं त्याचें शील व स्वभाव बनण्याला मदत होते, व ह्यांवर त्याचें सुखदुःखही अवलंबून असतें. शासनपद्धति अस्तित्वांत आहे, व तिची जोंपर्यंत अवश्यकता आहे, तोंपर्यंत मनुष्याचें पहिलें कर्तव्य म्हटलें म्हणजे त्या पद्धतीच्या ठिकाणीं निष्ठा ठेवून तिचें कार्य उत्तम प्रकारें पार पाडण्यास मदत करणें हें होय. मनुष्याचा संघ कायम राखण्याला समाजाची जोंपर्यंत आवश्यकता आहे, तोंपर्यंत त्याचीं बंधनें व व्यवस्था नीट राखून समाजाच्या घटकामध्यें धाडस, नीति व प्रगति ह्यांची वाढ करण्यास मनुष्यानें झटणें, हेंही त्याचें कर्तव्यच होय. त्याचप्रमाणें मनुष्य हा चैतन्यमय प्राणी असून परमेश्वराला हरएक बाबतींत जबाबदार आहे, म्हणून आपल्या बंधुभगिनी परमेश्वराच्या मार्गाचें अवलंबन करतील अशी तजवीज करणें, हेंही त्याचें कर्तव्य होय. सरकार,समाजबंधनें,व धर्म ह्या तीहींनीं मनुष्याची वाढ होत असते. मनुष्याचें सुख वृद्धिंगत व्हावें व त्याची प्रगति व्हावी, ह्यासाठीं हीं तीनही प्रागतिक असलीं पाहिजेत. ह्या तिहींपैकीं कोणतेंही एक चांगलें व दोन वाईट असून चालावयाचें नाहीं. आमच्या सर्व मागण्या सरकारानें कबूल केल्या, पण आमचीं समाजबंधनेंच अशीं असलीं कीं, त्यामुळें आमची प्रगति न होतां पाऊल मागें मागें पडत आहे, तर सरकारच्या उदारपणाचा काय उपयोग होईल बरें? एका फ्रेंच ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, एखाद्या नमुनेदार घरांत मनुष्याला ठेविलें तरी तो नमुनेदार होईल असें नाहीं, त्याची उन्नति झाल्याशिवाय त्याच्या हातून कार्यभाग व्हावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें सरकार सर्वोत्तम असलें तरी मनुष्येंही त्याच्याचप्रमाणें झाल्याशिवाय

शासनपद्धतीचा त्यांना व्हावा तसा उपयोग होणार नाहीं. उलट ते त्या पद्धतीला आपल्याच पायरीवर आणून पोंहोचवतील. सामाजिक कायद्याविषयींही हेंच खरें आहे. धार्मिक बाबींसंबंधीं विचार करतां असें स्पष्ट दिसून येतें कीं, धर्मावर विश्वास असल्याशिवाय राष्ट्राचें अस्तित्वच कायम रहावयाचें नाहीं. शुद्ध व पवित्र धर्मतत्त्वांच्या पायावर सामाजिक व राजकीय संस्थारूपी इमारती उभाराव्या तेव्हांच त्यांना कायमपणा प्राप्त होतो. आपण एकाच परमेश्वराचीं बालकें असून तो आपलीं सर्व कृत्यें पहातो व आपली उन्नति करितो; ह्या तत्त्वाची साक्ष पटली ह्मणजे आपण सर्व बंधु असून एकमेकांसाठीं झटणें, हें आपलें कर्तव्य आहे, हें मनुष्याला समजूं लागेल. धर्माशिवाय मनुष्यांना संघटित करण्यास अन्य कोण समर्थ आहे! तुह्मी म्हणाल कीं, मानवी हिताहिताची उमज हें काम करील. निसर्गतःच मनुष्यांना एकमेकांच्या मदतीची आवश्यकता असल्यामुळें त्यांना एकमेकांवर प्रेम करणें व एकमेकांशीं सहानुभूतीनें वागणें भाग आहे. पण मनुष्य हा स्वार्थी प्राणी आहे, अशी निसर्गच साक्ष देत नाहीं काय? एकमेकांशिवाय चालत नाहीं, म्हणूनच जर दोन माणसें एकमेकांशीं शांतीनें रहात असलीं तर त्यांना एकमेकांची जरूरी नाहीं, असें दिसून आल्याबरोबर तीं भांडून मारामाऱ्या करणार नाहींत काय? **चॅनिंग** नांवाच्या एका अमेरिकन ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, देव व भविष्यकालीन जीवित ह्यासंबंधाच्या आमच्या कल्पना नष्ट झाल्या तर सर्व समाजसंस्थारूपी इमारत डळमळीत होऊन धाडकन् कोसळून पडेल व पुन्हा तिची उभारणी होण्याची आशाही राहणार नाहीं. त्याचे पुढील विचार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. "आपलें जीवित म्हणजे केवळ लीला आहे, मानवी गोष्टींशीं देवाचा कांहीं संबंध नाहीं, दुबळ्यांचा व दुःखितांचा कोणी त्राता नाहीं, सत्यानें वागण्याचा व जनहितासाठीं

केलेल्या स्वार्थत्यागाचा मोबदला नाहीं, आपण घेतलेली शपथ देवाला ऐकूं जात नाहीं, गुप्तपणें केलेले गुन्हे करणाऱ्याशिवाय कोणाला समजत नाहींत, मानवी जीवित हेतुरहित असून गुणांचा कोणी चहाता नाहीं, प्राण आहे तोंवर आहे, आपण मेलों म्हणजे सर्व संपलें अशा प्रकारच्या मनुष्याच्या कल्पना होऊन त्यांनीं एकदां कां धर्माला फांटा दिला म्हणजे पुढें जे परिणाम ओढवतील, जी वाट लागेल, तिचें वर्णन करण्यास कोण समर्थ होईल बरें ? सदाचरणानें राष्ट्रोन्नति होते, अशी जी म्हण आहे, ती निरर्थक आहे, असें समजूं नका. इतिहास टाहो फोडून हेंच सांगतो आहे कीं, धर्मविषयक कल्पना अवनत झाल्या म्हणजे देशाची धुळधाण होते. अज्ञानवाद व निरीश्वरवाद ह्यांची वाढ राष्ट्रीय जीवनाच्या आड येते." **फ्रूड** हा मोठा इतिहासकार होऊन गेला. तो म्हणतो:—"नीतितत्त्व चिरकालीन आहे; न्याय व सत्य हीं शाश्वत टिकणारीं आहेत. अन्याय व असत्य ह्यांचा कितीही दिवस जय झाल्यासारखा दिसला, तरी फ्रेंचराज्यक्रांति किंवा अशाच दुसऱ्या भयंकर मार्गांनीं त्यांचा नाश होतो." **कार्लाइलनें** म्हटलें आहे:— "धर्माची महति मोठी आहे; तो जीवनदायक आहे; राष्ट्र श्रद्धावान् होतांच त्याचा इतिहास फलदायक व उन्नतिकारक असा होतो." **थायर** नांवाच्या एका फ्रेंच मुत्सद्याचें म्हणणें असें आहे कीं, "ज्या राष्ट्रांत श्रद्धावान् मनुष्यें पुष्कळ, त्याच्याच हातून धाडसाचीं कार्यें होतात, व त्याला आपल्या धर्माचा बचाव करण्याचा प्रसंग येतो. तेव्हां तर तें राष्ट्र अचाट धाडसाचीं कृत्यें करतें" एम्. बेंथाम एडवर्डस् ह्यानें "पश्चिम फ्रान्सांतला एक वर्षाचा वास" (A year in Western France)ह्या नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे. त्यांत तो म्हणतो कीं, मानवांच्या वाट्याला येणारीं नैतिक व सांपत्तिक दुःखें नाहींशीं करण्याकरितां धार्मिक व गरिबांना

सहाय्य करणाऱ्या संस्थानीं झटलें पाहिजे. शिक्षण, दळणवळण, शास्त्रीय शोध, सामाजिक व राजकीय स्वातंत्र्य इत्यादिकांची वाढ म्हणजे, सुधारणेचा अर्धा भाग होय. त्यांचे परिणाम चांगले व्हावयाला धर्म व श्रद्धा ह्यांची जोड त्यांना मिळाली पाहिजे." मागें ज्या फ्रेंच ग्रंथकाराच्या पुस्तकाचा उल्लेख केला आहे, तो म्हणतो सुव्यवस्थित संस्थांमुळें लोकांचें सामर्थ्य व जोम हीं वाढतात. ह्याच्या उलट स्थिति म्हणजे विनाश व मरण होय. जर्मनींत धर्म, भौतिक शास्त्र, सैन्य, धन, मान ह्यांची अशी कांहीं रचना केलेली आहे कीं, त्यामुळें राष्ट्राच्या वैभवाची वाढ ही झालीच पाहिजे. ह्यावरून राष्ट्रांना जी स्थिति प्राप्त होते, ती शासनपद्धति, समाज व धर्म ह्यांमुळें होय; म्हणून ह्याविषयीं राष्ट्रांनीं काळजी घेणें रास्त आहे. आम्हीं हिंदीजनांनीं व विशेषतः माझ्या तरुण मित्रांनीं हें विशेष रीतीनें लक्षांत ठेवावें. येथें आम्ही आमच्या राजकीय संस्थांच्या द्वारें लोकांना अधिक सुस्थिति प्राप्त करून घेण्याला शिकवीत आहों. सरकाराशीं निष्ठेनें राहून,त्याचे दोष दाखवून आपली स्थिति सुधारण्याला आम्ही शिकवीत आहों. परंतु आमचा धर्म व जातिभेद हीं जोंपर्यंत आम्हांला निष्कारण बंधनांनीं बद्ध करावयास तत्पर आहेत तोंपर्यंत आमच्या शिकवण्याचा काय उपयोग आहे? इंग्लंड देशांत थोडासा अन्याय झाला कीं लोक त्याविषयीं ओरड करतात. आम्ही अशा वेळीं कपाळाला हात लावून नशीब आमचें, असें म्हणत स्वस्थ बसतों! आम्हीं कित्येक शतकें दैववादाचे दास होऊन बसलों आहों; आणि हा आमचा राष्ट्रीय अवगुण होऊन राहिला आहे. ह्याचें उच्चाटण होईपर्यंत इतर धडपड व्यर्थ आहे. राष्ट्रीय सभेच्या द्वारें आम्ही लोकांपुढें उन्नतीच्या तत्वांची मांडणी करतों तर दुसरीकडे दैववादाचें अवलंबन करून त्यावर पाणी सोडित असतों. असलें परस्परविरोधी वर्तन आम्हीं

सोडलें पाहिजे. राजकीय मोठेपणा हा धार्मिक व सामाजिक वैभवावर अवलंबून आहे, हें लोकांच्या आम्हीं नजरेस आणिलें पाहिजे.

कर्तव्याचें उच्च ध्येय म्हणजे काय हें मी तुम्हांला आतां एका शब्दांत सांगतों. येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून तुमच्या ध्यानांत आलेंच असेल कीं ह्या ध्येयांत तीन कल्पनांचा समावेश होतो. पहिली कल्पना ही कीं आपण आपल्या सुखासाठीं जन्मास आलेले नसून देशासाठीं आलों आहों. दुसरी, देशाची निरपेक्षबुद्धीनें सेवा केली पाहिजे; व तिसरी, ती सेवा एकांगी नसून ज्यावर राष्ट्राची उन्नति अवलंबून आहे अशा सर्व बाजूंनीं म्हणजे राजकीय सामाजिक व धार्मिक बाजूंनीं ती केली पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे राष्ट्राची सर्व बाजूंनीं उन्नति होईल अशा प्रकारें त्याची धार्मिक, सामाजिक व राजकीय सेवा करणें ह्यासाठीं आपला जन्म आहे, अशी भावना राखणें ह्यालाच कर्तव्याचें उच्च ध्येय असें म्हणतात.

तुम्हांला कदाचित् असा प्रश्न करावासा वाटेल कीं कर्त्तव्याचें उच्च ध्येय ठरवून त्याप्रमाणें वागण्याची आम्हांला काय अवश्यकता आहे? काय आहे, ती मी सांगतों. तुम्ही जें शिक्षण मिळवीत आहां त्यामुळें तुम्हाला आपल्या देशाचें नेतृत्व प्राप्त होणार आहे. समाजांतली सुसंस्कृत व्यक्ति ह्या नात्यानें तुम्ही समाजाच्या "मनाच्या" ठिकाणीं आहां. जगावर विचारी पुरुषांचें राज्य चालतें, तें खोटें नाहीं. "जो वांचतो तो अधिकार चालवतो," अशी एक इटालियन लोकांमध्यें म्हण आहे. तिचा अर्थ असा आहे कीं, सर्व गोष्टींचा विचार केला असतां सुशिक्षित व विचारशील पुरुषांचेंच जगावर वजन पडतें. लॉर्ड बिकन्सफील्ड ह्यानेंहि म्हटलें आहे:—"मजबूत बाहूंचें राज्य चालविण्याचे दिवस नाहींसे होऊन आतां मजबूत मनाचे दिवस आले आहेत. दांडगाई उच्च

स्थानापासून भ्रष्ट होऊन तिच्या ठिकाणीं अकलेची प्रस्थापना झाली आहे. श्रीमंत व दांडगट मनुष्याचें राज्य संपून ज्ञानवानांच्या राज्याला सुरवात झाली आहे. म्हणूनच देशाचे खरे नेते त्यांतील सुशिक्षित माणसें होत. ह्यासाठीं तुमचें ध्येय उच्च असलें पाहिजे. ज्या मानानें तें उच्च असेल त्या मानानें साधारण जनतेचें ध्येय उच्च होईल. खावें, प्यावें व मजा मारावी, देश बुडाला तरी हरकत नाहीं अशीच जर तुमच्या ध्येयाची कल्पना असेल तर खालील वर्गांचें ध्येय अत्यंत अवनत दशेप्रत पोहोंचलेलें असलें तर त्यांत नवल नाहीं. शिक्षित पुरुष देशाचे खरे प्रतिनिधी असल्याकारणानें आपलें कर्तव्यध्येय उच्चतम बनविण्याची त्यांच्यावर मोठी जबाबदारी आहे.

ह्या जबाबदारीची नुसती जाणीव असून उपयोगी नाहीं. ह्या उच्चतम ध्येयामुळें देशाचें हित व्हावयाचें असल्यामुळें त्याप्रमाणें वर्तन करण्याची आपली तयारी असली पाहिजे. दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे ध्येय व कृति हीं एकदमच अमलांत आणिलीं पाहिजेत. ह्यासाठीं नीतिधैर्याची आवश्यकता आहे. बोलण्याप्रमाणें चालणें, ज्ञानरवीच्या उजेडांत मार्ग आक्रमणें, आपलीं मतें व विचार ह्यांना आचाराची जोड देणें, आपलें कर्तव्य बजावणें ह्यालाच नीतिधैर्य म्हणतात. खिस्तानें आपल्या शिष्यांना माझ्या नांवामुळें लोक तुमचा द्वेष करतील, पण त्यांच्या हातून तुमच्या डोकीच्या एकाही केंसाचा नाश होणार नाहीं, तुम्ही धिम्मेपणानें वर्तन ठेवा असा जो उपदेश केला त्याचाही अर्थ नीतिधैर्याचें अवलंबन करा असाच आहे. तुकारामबुवांनीं आपल्या एका अभंगांत म्हटलें आहे कीं हा बहुजनसमाज फार चमत्कारिक आहे. कोणती गोष्ट केव्हां ह्याच्या दृष्टीनें चांगली ठरेल आणि कोणती वाईट याचा कांहीं नियम नाहीं. आपण जर धार्मिक झालों, तर हा एक मूर्ख आहे असें म्हणावयास तयार असतो; बरें, धर्माविषयीं औदासिन्य दाखविलें तर नास्तिकपणाचा

छाप मारावयाची सिद्धता आहेच. बरें, कोणी आपला सदाचरणानें वागूं लागला, देवाला धर्माला भिऊन सर्व व्यवहार करूं लागला तर हा जगांत राहण्यास योग्य नाहीं असा निकाल लागतो. आणि खरोखरच व्यसनी असला तर तो बदमाष समजला जातोच; तसेंच लग्न करून संसार थाटला तरी तुम्ही ऐहिकाचे दास ठरतां, लग्न न करितां राहिलां तर तुम्ही आपलपोटे ठरतां; फार बोलल्यास वाचाळ, कमी बोलल्यास गर्विष्ठ असा निकाल लागतो. सारांश काय कीं, लोक काय म्हणतात त्याला भलतेंच महत्व देणें हा अविचार आहे. व्यक्तिमात्राचा श्रेष्ठतम धर्म जो आहे तो हाच कीं, पूर्णपणें विचार करून जें कांहीं आपल्याला योग्य, सत्य, न्याय्य वाटेल, तें कर्तव्यबुद्धीनें आचरणांत आणावयाचें, मग त्याच्या योगें कोण राजी होतो व कोणाची इतराजी होते हा विचारच मनांत आणावयाचा नाहीं. ह्यालाच म्हणतात नीतिधैर्य. कर्तव्य नीतिधैर्यावर अवलंबून असतें, व त्याच्याचमुळें मनुष्याला मानवजातीची सेवा करण्याचें व सत्यशोधन करण्याचें धैर्य प्राप्त होतें. सुशिक्षित पुरुष ह्या नात्यानें तुम्हांला नेत्यांचा मान प्राप्त होणार आहे, ह्यासाठीं तरी निदान हा अमोलिक गुण मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हल्लीं आपल्या असें ऐकिवांत येतें कीं, सुशि-क्षितांचें कर्तव्य, लोकमत सरकारापुढें मांडणें हें होय. हल्लींची प्रवृत्ति अशी आहे कीं, पुढाऱ्यांनीं लोकमताप्रमाणें वागावें. धुरीणत्व प्राप्त करून घेण्यासाठीं सुशिक्षित पुरुष साधारण जनतेच्या विरुद्ध जाण्यास भितात; व तिला वळण लावण्याच्या ऐवजीं आपणच वळले जातात. माझ्या मतें लोकमत प्रदर्शित करणें, हें शिक्षि-तांचें कर्तव्य नसून तें बनविणें व त्याला वळण लावणें हें त्यांचें कर्तव्य आहे. लोक कोठें चुकत असतील तर त्यांची चूक त्यांना दाखविणें, त्यांच्या चुकीच्या चालीरीती सुधारण्याचा

प्रयत्न करणें, हें त्यांचें कर्तव्य आहे. ज्यांना शिक्षणाचा प्रकाश मिळाला आहे, त्यांनीं जर तो इतरांना द्यावयाचा नाहीं तर जनतेला मार्ग दाखविण्याचें काम कोण करील? जगाची प्रगति लोकाराधनेचा प्रयत्न करणाऱ्यांकडून झालेली नसून प्रसंगीं लोकांच्या विरुद्ध जे गेले, जे विवेकाला व परमेश्वराला साक्षी ठेवून कर्तव्य करिते झाले, त्यांच्यामुळेंच झालेली आहे. लोकप्रियतेच्या नादीं लागून दुराग्रह व दुरभिमानाचें स्तोम माजविणाऱ्यांना तुम्ही चहातां, कीं जे केवळ कर्तव्यावर दृष्टि ठेवून वागतात त्यांस चहातां? **लूथर** किंवा **तुकाराम** ह्यांच्यासारखे पुरुष आपणांला वंद्य कां वाटतात? इतिहासांत आपणांला सत्यासाठीं लढणाऱ्यांचीं जीं चरित्रें पहावयास सांपडतात, त्यांचें स्मरण झालें असतां त्यांच्याविषयीं आमच्या ठिकाणीं आदरबुद्धि कां उत्पन्न होते? एवढ्याचसाठीं कीं त्यांनीं न डगमगतां, लोकमताला बळी न पडतां सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न केला. आम्हांमध्यें अशी बरीच लेखक मंडळी आहे कीं, ती समाज व धर्मसुधारकांना लोकमत तुमच्या बाजूला नाहीं, लोकांना तुमची जरूरी नाहीं, असें सांगण्याचा आव घालते. त्यांना वाटतें कीं आपण लोकांत मिसळून असलों, त्यांच्या मर्जीप्रमाणें भाषणें केलीं, त्यांच्या चालीरीतींची अंधभक्तीनें स्तुति केली म्हणजे आपण मोठें सत्कृत्य केलें. अशा प्रकारें वागून प्राप्त करून घेतलेल्या लोकप्रियतेचें ही मंडळी इतरांपुढें प्रदर्शन करीत असते. ह्या रीतीनें मिळविलेली लोकप्रियता व लोकनायकत्व हीं तात्पुरतीं असतात. खरें पाहिलें असतां अशीं मनुष्यें लोकांचे पुढारी नसून, अनुगामी होत. अशांकडून जगाची सुधारणा किंवा प्रगति होत नाहीं; ती ह्याच्या उलट वागणाऱ्यांकडून होते. जगांतील सर्व मोठ्या सुधारणा, बहुजनसमूहाच्या उलट जाणाऱ्या अल्पसंख्यांकांकडून झालेल्या आहेत. धर्म व समाजसुधारकांची, लोकमत हल्लीं त्यांच्या बाजूचें नाहीं म्हणून,

टवाळकी करणारे इतिहासापासून प्राप्त होणारा हा धडा विसरतात. बहुजनसमाज तरी कसा बनलेला असतो ? ह्याची व्याख्या गिटे नांवाच्या जर्मन तत्त्ववेत्त्यानें केलेली आहे. तो म्हणतो कीं, बुद्धिवान् मनुष्याला बहुजनसमाजाचा सल्ला घेणें, म्हणजे मोठें कष्टमय वाटतें कारण बहुजनसमाज, साधारणपणें थोडेसे पुढारी कांहीं हांजी हांजी करणारे लबाड, बरेच परावलंबी दुबळे मनुष्य, व आपणाला काय पाहिजे, ह्याची जाणीव नसणाऱ्यांचा घोळका, ह्यांचा बनलेला असतो. पुढाऱ्यांचें काम लोकमताला बळी पडण्याचें नसून तें चुकत असेल तेथें सुधारून, त्याला योग्य दिशा लावून तें तयार करण्याचें आहे. माझ्या तरुण मित्रांनो, हें तुह्मीं एव्हांपासून जाणण्यास शिकलें पाहिजे, तुह्मी सत्याची व नीतिधैर्याची कांस धरण्यास शिकलें पाहिजे. लोकांचें नेतृत्व करण्यास शिका; अंधांचे अंधमार्गदर्शक बनूं नका. कारण तसें केल्यास दोघेंही खड्डयांत पडण्याचा संभव आहे. ह्यामुळें तुमची कदाचित् वाहवा होणार नाहीं; परंतु सर्व सुधारकांची हीच गत झालेली आहे हें विसरूं नका. प्रथमतः ज्यांना तुच्छ मानिलें जातें तेंच पुढें कोनशीले प्रमाणें महत्वाचे होऊन बसतात. अशाबद्दल इतिहासांत पाहिजे तितका पुरावा सांपडण्यासारखा आहे.

नीतिधैर्य प्राप्त करून घेतल्यानंतर तुमचें दुसरें कर्तव्य म्हटलें म्हणजे स्वावलंबनाचा गुण प्राप्त करून घेणें होय. हा गुण आपलासा केल्याशिवाय तुमच्या हातून कोणतेंही मोठें कार्य होणार नाहीं. जे कोणी आपल्या पायावर उभें रहवयाचें टाकून लोकांच्या तोंडाकडे पहातात, त्यांची स्थिति फार शोचनीय होते. देशसेवा हें आपलें कर्तव्य आहे, ह्याची स्मृति ठेवून, जे कोणी स्वावलंबनाचें अवलंबन करितात, व दुसरा कोणी तरी ही सेवा बजावील अशी अपेक्षा न धरितां, आपणच ती बजावतात तेच मोठेपणा पावतात.

हिंदुस्थानांत लोकांची प्रवृत्ति इतरांनीं देशसेवा करावी अशी असते. क्ष देशसेवा करीत नाहीं किंवा ज्ञ आपल्या शिक्षणाचा लोकहितार्थ उपयोग करीत नाहीं, अशी टीका करण्यांत आम्ही नेहमीं मग्न असतों. हा आमचा राष्ट्रीय दुर्गुण आहे. आम्ही नेहमीं दुसऱ्यावर अवलंबून रहातों व जरा अपयश येतांच भेदरून जातों! इंग्रज व जर्मन लोकांविषयीं असें म्हणतात कीं, ते अडथळ्यांना कंटाळा आणतात व अनेक वेळां अपयश आलें, तरी आपलें उद्दिष्ट साध्य केल्याशिवाय रहात नाहींत. तुम्हीं हा आपला राष्ट्रीय दुर्गुण नाहींसा करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मला कोणत्या प्रकारचा मुलगा आवडतो, असें जर तुम्ही विचाराल तर मी सांगतों कीं, ता. २४ जानेवारीं १८८५ च्या स्पेक्टेटरमध्यें ज्या मुलाचें वर्णन केलें आहे, तो मुलगा मला फार आवडतो. जुन्या व नव्या पिढींतल्या मुलांमधील भेदाचें वर्ण करतांना स्पेक्टेटरकार म्हणतातः—

“जग जिंकण्याची शक्ति आपणांमध्यें आहे ही धमक नष्ट झाली आहे. आशेचें खूळ लागलेला, लंडन शहरांत निर्दयतेचा वास नाहीं असें मानणारा, यशप्राप्तीसाठीं स्वातंत्र्याची हांव धरणारा, अपयशाची कल्पना ही ज्याला खपत नसे व जो आपणाला परिस्थितीचा धनी समजे असा, सतरा वर्षांचा असतांना सार्वजनिक शाळेंत शिक्षकाची नोकरी मागणारा, अठराव्या वर्षीं पुस्तकें छापणाऱ्याकडे आपण लिहिलेलें पुस्तक तो घेईलच अशा खात्रीनें घेऊन जाणारा, शिफारसपत्राशिवाय, खिशांत दहा रुपये घालून लिव्हरपुलास जाऊन चाळीस वर्षें परिस्थितीशीं झगडून यश मिळविणारा मुलगा, अशा मुलांची पिढी नाहींशी झाली आहे. नव्या पिढींत आशेला पुष्कळ जागा आहे, पण परिस्थितीवर राज्य चालविण्याची धमक तिच्यांतून निघून गेली आहे.”

तुम्ही आपणांला परिस्थितीचे धनी समजा. पुष्कळ वेळां परिस्थितीचा आपल्यावर परिणाम घडतो हें खरें, तरी पण आपण आपली परिस्थिति बनवीत असतों हेंही खोटें नाहीं. अशी स्थिति असल्यामुळें आपण अशा प्रकारें वागावें कीं, अपयशानें व अड-चणींनीं डगमगून न जातां आपल्याला पाहिजे तशी परिस्थिति आपणांला तयार करितां यावी. तुम्ही धैर्याची कांस केव्हांही सोडूं नका. नेहमीं अशावादी असा, व स्वावलंबनाची धमक कायम ठेवा. मोठमोठ्या सुधारणा घडवून आणणाऱ्यांना जें यश प्राप्त झालें आहे, त्याचें कारण त्यांनीं आपल्या स्वतःच्या धमकीवर पराव-लंबन न करतां, कामें केलीं हें होय; म्हणूनच आम्हाला पुन्हा पुन्हा जें सांगण्यांत येतें कीं, विश्वासानें पर्वतही उलटून टाकतां येतो तें अगदीं खरें आहे. माझ्या तरुण मित्रांनो, हें ध्यानांत ठेवा व आतांपासून–तुम्ही अद्यापि तरुण आहां व तरुणपणांत चांगल्या संवयी म्हातारपणांतल्यापेक्षां लवकर जडतात–स्वावलंबनाची संवय लावून घेण्याचा प्रयत्न करा.

आमच्या विद्यार्थ्यांच्या सर्वश्रेष्ठ जबाबदारी कोणत्या, ह्याकडे इतका वेळ मीं तुमचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे. पहिली जबाबदारी म्हटली म्हणजे कर्तव्याची श्रेष्ठतम कल्पना करणें; दुसरी व्यवहारांत ही कल्पना आचरतां यावी म्हणून अवश्य असणारें नीतिधैर्य प्राप्त करून घेणें; तिसरी, नीतिधैर्याप्रमाणेंच जरूरीचें जें स्वावलंबन तें आपलेंसें करणें. ह्या जबाबदारी व्यक्तीच्या जीविताचा व वैभवाचा पाया असल्यामुळें मी त्यांना सर्वांत श्रेष्ठ मानतों. राष्ट्राचें वैभव हें व्यक्तीच्या मोठेपणावर अवलंबून असतें. राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्ति ह्या जबाबदारी ओळखून त्यांप्रमाणें वर्तन करण्यास लागल्याशिवाय राष्ट्राची कधींही भरभराट होणार नाहीं. आपल्याला असें सांगण्यांत येतें कीं, ज्या लोकांत कला-

कौशल्य, ज्ञान व राजनीति ह्यांची पूर्ण वाढ झालेली आहे ते लोक मोठे. परंतु असें म्हणणें हें पूर्णपणें खरें नव्हे; असें म्हणणाऱ्यांना कार्यकारणभाव समजत नाहीं. ज्यांची विचारशक्ति वृद्धिंगत झालेली आहे व म्हणून राष्ट्राचें नेतृत्व आपोआपच ज्यांच्याकडे येतें, असे लोक जर राष्ट्र मोठें व्हावयाला लागणारे गुण व संवयी आपल्या आचरणामध्यें आणतील, तर राष्ट्रांतील कलाकौशल्याची अभिवृद्धि होऊन, राष्ट्र बुद्धिवैभवाच्या शिखरावर पोंहोंचेल. देशामध्यें असे थोडे तरी पुरुष पाहिजेत कीं ज्यांच्या ठिकाणीं आपण देशसेवा करण्यासाठीं जन्मलों आहों, अशी जागृति कायम राहील; व जे देशाची सर्व बाजूंनीं सुधारणा करावयास झटतील. दुसऱ्यांवर अवलंबून न राहतां आपल्या विचारांना आचारांचें स्वरूप देणारीं माणसें देशांत असणें म्हणजे देशामध्यें प्राण असण्यासारखें आहे. सत्कृत्यांनीं देश मोठेपणा पावतो व सत्कृत्यें करण्याला देशाभिमानी पुरुष पाहिजेत. जे पुरुष आपलें खरें कर्तव्य ओळखून स्वावलंबनाचा अंगीकार करून तें कर्तव्य बजावतात, तेच सज्जन व देशाभिमानी पुरुष नव्हत काय ? कोणी एकानें म्हटलें आहे—"एखाद्या देशांतील लोकांचीं गाणीं कोणतीं आहेत तें मला सांगा म्हणजे मी त्यांचें शील कसें आहे तें सांगेन." त्याचप्रमाणें देशाच्या कायदेकानूं-वरून लोकांचें शील सांगतां येतें, असेंही म्हटलेलें मीं ऐकिलें आहे. मला वाटतें, कोणत्याही देशांतील लोकांचें शील कसें आहे हें ताडावयाचें असल्यास त्यांतील सुशिक्षितांच्या कर्तव्याचें ध्येय काय आहे व तें ध्येय साध्य होण्यासाठीं ते काय प्रयत्न करितात, हें सांगितलें असतां कार्य होण्यासारखें आहे.

आतां शेवटीं माझ्या तरुण देशबांधवांनो, आपल्या देशाच्या भवितव्यतेच्या धन्यांनो, मला तुम्हाला इतकेंच सांगावयाचें आहे कीं, आज ह्या ठिकाणीं येऊन तुम्हांला तुमच्या श्रेष्ठतम जबाबदारीं-

विषयीं दोन शब्द सांगण्याची मला संधि मिळाली, ह्याबद्दल मला फार आनंद होत आहे. मीं तुम्हांला जें कांहीं सांगितलें आहे, त्याची गुरुकिल्ली एकच आहे; ती ही कीं, देशाची भवितव्यता तुमच्यावर अवलंबून आहे. तुमचें देशावर जर खरें प्रेम असेल—व तें आहे ह्याबद्दल मला संशय नाहीं,—व देशाची तुह्माला काळजी असेल—व त्याबद्दलही मला संशय नाहीं, तर देशाला मोठेपणा प्राप्त करून देण्यासाठीं, तुम्ही प्रथम आपली नैतिक व बौद्धिक उन्नति करा. मुत्सद्दी होण्याची हांव धरण्यापूर्वीं गुणसंपन्न पुरुष होण्याची हांव धरा. कर्तव्याचें उच्चतम ध्येय पुढें ठेवून तें स्वावलंबनानें व नीतिधैर्याच्या सहाय्यानें प्रत्यक्ष कृतीमध्यें आणा ज्या हिंदुस्थान देशांत तुमचा जन्म झाला आहे व ज्या इंग्लंड देशाकडून तुम्हाला शिक्षण मिळत आहे, त्या दोनही देशांसंबंधीं आपलें कर्तव्य तुमच्यापैकीं प्रत्येकानें बजाविलें पाहिजे, अशी अपेक्षा आहे; हें केव्हांही विसरूं नका. कवीनें म्हटल्याप्रमाणें:—

**विनम्रभावें ज्ञान मिळवुनि स्वार्थत्यागी म्यां व्हावें ॥**
**बुद्धीचें सामर्थ्य लाभुनि सत्यमार्गीं वर्तावें ॥**

हीच आपण देवाजवळ मागणी मागूं या व त्याप्रमाणें वर्तन करूं या.

---

## महादेव गोविंद रानडे.

(१)

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं ।
न भंगे प्रसंगीं धैर्य बळ ॥ १ ॥

न म्हणे कोणासी उत्तम वाईट ।
महत्त्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ ।
हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरंवडीन तया ।
ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

आतां आपण जो अभंग गाईला, व ज्याच्या आधारेंच मी आतां दोन शब्द बोलणार आहें, तो अभंग ज्या प्रियबंधूच्या मृत्यूबद्दल आपणांस अत्यंत खेद होत आहे व ज्याच्याबद्दल सर्व देश हळहळत आहे, त्या बंधूची ह्या क्षणीं, ह्या स्थळीं सहजच आपणांस आठवण करून देईल. ज्या आम्ही प्रार्थनासमाजाचे सभासदांनीं त्यांच्या चरणापाशीं बसून त्यांच्या बोधामृताचा लाभ घेतला व ज्यांना आम्हीं मार्गदर्शक व गुरु असें मानिलें त्या आमचें, त्यांच्या निधनामुळें फारच मोठें नुकसान झालें आहे, ह्याविषयीं कांहीं शंका नाहीं. पुष्कळ प्रसंगीं त्यांनीं ह्या ठिकाणावरून उपदेश केले आहेत, त्या वेळींचें त्यांचें वक्तृत्व, त्यांचा उत्साह त्यांची प्रेमळ वाणी हीं आतां जरी आम्हांस अनुभवास येणार नाहींत व ऐकावयास मिळणार नाहींत, तरी त्यांचा आम्हांस केव्हांही विसर पडणार नाहीं. काळानें त्यांना आम्हां-मधून नेलें आहे त्यामुळें आज आम्हांला आमचा मार्गदर्शक, ज्यानें आमच्या अंतःकरणास चटका लाविला आणि ज्यानें आमच्या समाजास वळण लाविलें, तो गेला असें आम्हांस वाटत आहे, आणि त्यामुळें आम्ही अगदीं दीन झालों आहोंत असा अनुभव येत आहे. परंतु जें ठिकाण ईश्वरासच वाहिलें आहे, जेथें मन व अंतःकरण ह्यांनीं ऐहिकांतच न गुरफटतां पारमार्थिकच विषयाचा विचार करावयाचा असतो आणि जेथें जे आमचे बंधु गत

झाले आहेत, त्यांनीं वारंवार आणि विशेष आस्थेनें आम्हांस सांगितलें आहे कीं, जे गत झाले आहेत, त्यांच्याबद्दल दुःख न करतां त्यांच्यासाठीं देवाची प्रार्थना करणें व ते आपल्या दृष्टीसमोरून गेले, म्हणून ते नष्ट झाले असें न समजतां ते नेहमीं आपल्याजवळच आहेत असें मानणें, हें आपलें कर्तव्य आहे, त्या ह्या ठिकाणीं त्यांचे उपदेश. त्यांचें कार्य व त्यांचें चरित्र ह्यांपासून बोध घेण्याचा प्रयत्न होणें हें अगदीं सहाजिक आहे. या ठिकाणाहून त्यांचीं जीं धर्मपर व्याख्यानें होत, व जीं ऐकून पुष्कळांना आपणांस कांहीं तरी अधिकार प्राप्त झाला आहे असें वाटत असे, त्यांस कांहीं वर्षांपूर्वीं त्यांनीं मृत्यु म्हणजे काय ह्या विषयावर जें व्याख्यान दिलें, त्याची आजच्या दिवशीं आठवण झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्या वेळीं ज्या अभंगांत तुकारामांनीं "मरण माझें मरूनि गेलें । मज केलें अमर" असें म्हटलें आहे तो अभंग आधारभूत घेऊन त्यांनीं सांगितलें कीं, एक मृत्यु असा आहे कीं, ज्याच्या योगें आपण खरोखरच मरतों; पण दुसरा मृत्यु असा आहे कीं जेथें त्या मृत्यूलाच मरण येतें, व आपण मात्र जिवंत राहतों. जो भक्त परमेश्वराची प्रार्थना करीत असतांना किंवा उपदेश करीत असतांना आपणा स्वतःला जणूं काय विसरून जातो, व ज्याचा आत्मा ईश्वराकडून प्रेरणा झालेलाच असा भासतो; जो विद्वान् गृहस्थ आपल्या अभ्यासामध्यें इतका गर्क होतो कीं, तो आपल्या स्वतःलाच विसरतो, आणि आपल्या अभ्यासाच्या विषयावांचून त्याला दुसरें कांहींही दिसत नाहीं, जो मनुष्य आपल्या स्वतःला अत्यंत शारीरिक वेदना होत असतांना त्या वेदना विसरून आपल्या कर्तव्यामध्यें कोणत्याही प्रकारचें न्यून पडूं देत नाहीं, त्या माणसाचें मरण मरून गेलें व तो जिवंत राहिला असें म्हणतां येतें. हें आपलें शरीर निचेष्ट पडलें म्हणजे आपणांस मृत्यु प्राप्त होतो, ही जी साधारण

कल्पना ती मृत्यूसंबंधाची खरी कल्पना नव्हे ज्या वेळीं आपण आपलें शरीर व त्याचें सुख, व आनंद यांचेंच स्तोम माजवितों, व स्वार्थपर जीवनामध्येंच दिवस कंठितों त्या वेळीं आपणांस खरा मृत्यु प्राप्त होतो. मग त्यांच्याच शब्दांनीं आज आपणांस असें म्हणतां येणार नाहीं काय कीं, **रानडे** मरण पावले नाहींत, तर त्यांचा मृत्यु मरण पावला आणि ते अमर होऊन आपणांमध्यें राहिले आहेत ?

**रानडे** आज आपणांमध्यें आहेत. आणि ते लौकिकदृष्ट्या जिवंत असतांना आम्हांमध्यें जितक्या प्रमाणानें होते, त्यापेक्षां अधिक प्रमाणानें ते इतःपर आमच्यांत राहतील; ज्या त्यांच्या तेजाचा सर्व हिंदुस्थानभर प्रकाश पडत असे, तें त्यांचें तेज आतां अधिकच तेजःपुंज भासेल; मात्र आम्हीं त्यांच्या चरित्राचें रहस्य लक्षांत घेतलें पाहिजे. गेल्या बुधवारीं जो प्रसंग घडला, त्याची नजीकता, त्याची भयंकर आकस्मिकता, ह्यांमुळें आम्हांस जें दुःख झालें आहे, त्यानें आम्ही इतके स्तंभित झालों कीं, आमचे विचार एकत्र करण्याचें सामर्थ्य आम्हांस राहिलं नाहीं. जें त्यांचें चरित्र आम्हां सर्वांना बुद्धिविषयक व नीतिविषयक बाबतींत आदर्शवत् झालें होतें, त्या चरित्रापासून घेण्यासारख्या बोधाविषयीं दोन शब्द बोलण्यास आवश्यक असें जें स्वास्थ्य तें आम्हांस अद्याप प्राप्त झालें नाहीं. त्यांच्या चरित्रांतील अनेक प्रसंगांचा इतिहास म्हणजे एका अर्थी—आणि हाच खरा अर्थ होय— म्हणजे आमच्या गेल्या चाळीस वर्षांतील महत्त्वाच्या प्रसंगाचा इतिहास होय. त्यांची बुद्धिमत्ता असामान्य होती. ते फार गूढ विचार करणारे होते, ते फार जाडे विद्वान् होते, ते मोठे नांवाजलेले न्यायाधीश होते, आस्थेवाईक सुधारक होते, व अनेक दिशांनीं ते काम करणारे होते, ह्या गोष्टी सर्वांस मान्य आहेत. **रानडे** एक असाधारण चारित्र्यवान् होते व त्यांच्या चरि-

सेवा करण्याच्या आकांक्षेनें ज्याच्या मनावर पगडा बसविला आहे व आणखीही इतर थोर विचारांनीं ज्याचें मन प्रगल्भ झालेलें आहे, व पूर्ण आत्मत्याग करण्याची ज्याचें अगीं पात्रता व शक्ति आहे असा पुरुष योग्य वेळीं सत्य तें बोलण्यास कधींही मागें पुढें पाहणार नाहीं, कारण त्याची पक्की खात्री असते कीं, असें केल्यानें शेवटीं मनुष्य सुपथाकडेच जातो. परंतु आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं आपल्या दररोजच्या व्यवहारांतही हीं तत्त्वें अमलांत आणिल्यानेंच आपल्या हातून मोठीं कृत्यें घडणें शक्य असतें. यासाठीं थोर कृतींचे पोवाडे गाण्यांत आपल्या कालाचा व शक्तीचा व्यर्थ अपव्यय करण्याऐवजीं हमेषच्या बारीक सारीक गोष्टींत सुद्धां आपल्या ध्येयास धरून वागण्याचा जर आपण प्रयत्न केला तर आपल्या आयुष्याचा आपण विशेष सदुपयोग केला असें होईल. मनुष्यजात ही वाईट आहे व मनुष्याचें अंतःकरण दुर्विकारांनीं भरलेलें आहे असें म्हणण्यांत हांशील नाहीं. आपण स्वतः वाईट असतों व आपल्या चांगुलपणावर आपला विश्वास नसतो म्हणून आपणांस मनुष्यजात वाईट आहे असें वाटतें. औदार्य, दमन व धर्म या तीन तत्वांच्या पायावर तुमच्या आयुष्याची उभारणी झाल्याशिवाय तुमच्या आंगीं भाव आहे असें म्हणतां येणार नाहीं. आपल्या शक्तीप्रमाणें गरीबांस मदत करावयाची, ज्यांच्यावर आपत्तीचा घाला पडला आहे त्यांना प्रेमाच्या शब्दानें धीर द्यावयाचा व आपलें ज्यांनीं नुकसान केलें असेल त्यांना क्षमा करावयाची. मनाच्या या वृत्तीला 'औदार्य' म्हणतात. दमन म्हणजे स्वतःचे मनोधर्म, व इंद्रियें हीं आपल्या कह्यांत ठेवावयाचीं. कारण ज्या कोणाची स्वतःच्या इंद्रियांवर सत्ता आहे व त्यांना ज्यानें जिंकलें आहे, त्या मनुष्यालाच दुसऱ्यांना जिंकतां येईल. धर्म म्हणजे दुसऱ्यांच्या दोषांचें प्रदर्शन न करतां अनुकंपा

बाळगावयाची, परंतु स्वतःच्या दोषाविषयीं मात्र यत्किंचित सुद्धां हयगय करावयाची नाहीं, व आपलें वर्तन इतकें शुद्ध व पवित्र ठेवावयाचें कीं जे कोणी आपल्या सहवासांत असतील त्यांच्या मनावर त्यांना न कळत व त्यांच्या इच्छेविरुद्धही आपल्या आचरणाचा परिणाम घडल्याशिवाय राहूं नये. औदार्य, दमन व धर्म या तीन गुणांची वाढ झाल्यानें अंगीं भाव येतो व तुकोबांनीं वर्णन केल्याप्रकारचें आयुष्य आपण जे साधारण लोक त्यांना घालवितां येणें शक्य आहे, असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां त्याचा अर्थ असा कीं आपण नेहमीं आपल्या आयुष्यामध्यें या सद्गुणांस प्राधान्य देण्याचा प्रयत्न करावा व भावामुळें, जीं थोर कृत्यें करण्याची आपणामध्यें प्रेरणा उत्पन्न होते तीं कृत्यें करण्याचा मार्ग आपण सुलभ करावा.

---

## क्षमा.

क्षमा हा सद्गुण अंगीं आणण्याची आवश्यकता आहे, हा उपदेश सर्व देशच्या व सर्व काळच्या साधुसंतांनीं केव्हांना केव्हां तरी केलेला आहे. मनुष्याच्या हातून चुकी होणें, हें अगदीं साहजिक आहे; पण क्षमा करणें हा ईश्वरी गुण आहे, ही सर्व साधारण गोष्ट प्रत्येक दिवशीं अनुभवास येते. तुकोबांनींही आपल्या एका अभंगांत हा सद्गुण आपल्या जीवित्वाचा एक नियम करा, असें आपणांस सांगितलें आहे. पण, आम्हांपैकीं पुष्कळजण असें म्हणतील कीं, क्षमा हा सद्गुण आपल्या जीवित्वाचा नियम करा असें, या संतांनीं आम्हांस सांगणें फार चांगलें आहे; परंतु संसारांत आम्हांला नित्य अनेक प्रकारचे व्यवहार करावयाचे असतात व येथें शिक्षा न करतां पापी मनुष्यांना सोडून दिलें तर जगाची काय

वाट लागेल हें कांहीं सांगतां येणार नाहीं. आपणासारख्या साधारण लोकांनाच नव्हे, तर ज्यांचा बहुजनसमाजाशीं व आयुष्यांतील व्यावहारिक सिद्धांतांशीं निकट संबंध येतो, अशा मुत्सद्दयांना देखील गुन्हेगार लोकांना शिक्षा करण्याची जरूरी भासत आहे; ते म्हणतात कीं, गुन्हेगाराची गय करून उपयोगाचें नाहीं, तर त्याचा त्यागच केला पाहिजे. हा जगाचा जो अनुभव, त्याचा साधूंच्या उपदेशाशीं मेळ बसतो किंवा नाहीं, तें आपण पाहूं या. जो समाजाचा अपराध करतो, त्याला त्याच्या अपराधाबद्दल शिक्षा ही झालीच पाहिजे. ईश्वर हा जसा कृपाळू पिता आहे, तसाच तो शास्ताही आहे. जगाचें राज्य चालविण्याकरितां कायद्याची जरूरी आहे. जो त्या कायद्याचें उल्लंघन करितो, त्याला मग तें किती कां क्षुल्लक असे ना, शिक्षा ही होतेच होते. तुह्मी, अज्ञानानें कां होईना, आपलें बोट अग्नीमध्यें घातलें तर अग्नीचा धर्म जो जाळण्याचा, त्याप्रमाणें तुमचें बोट जळणारच. सृष्टिनियमाचें अज्ञानानें जरी उल्लंघन झालें असलें तरी नियमाचें उल्लंघन केल्यामुळें होणारा जो परिणाम तो झाल्यावांचून राहत नाहीं, किंवा तेथें मग कांहीं तडजोडही होत नाहीं. याप्रमाणें जड सृष्टीचा नियम आहे. परंतु, दुसऱ्याही प्रकारचा एक नियम आहे व तो वरिष्ठ दर्जाचा होय. आपणांस दुःख होतें तें आपल्या ठिकाणीं एक प्रकारची जागृति उत्पन्न करण्यासाठींच होतें, असें जरी न मानिलें, तरी दुःखाच्या द्वारें आपल्याला जागृत होतां येतें व आपण आपलें आयुष्य पुनः सुरू करावें आणि या आयुष्यांतील मार्गक्रमण करीत असतांना आपल्या वाटेमध्यें जे मोह, जे दुर्विकार उत्पन्न होतात, त्यांच्याशीं झुंजण्यास सज्ज व्हावें, अशा सूचना आपल्याला होत असतात. ह्मणून, पापी मनुष्यास शिक्षा केली पाहिजे, असें जर मनुष्यनिर्मित नियम व कायदे सांगत आहेत, तर ह्याच मनुष्यास ताळ्यावरही आणलें पाहिजे ही आशा आध्या-

त्मिक सृष्टीचा नियम आपणांमध्यें उत्पन्न करीत आहे. पापी मनुष्याला शाश्वतची शिक्षा कधींही होत नाहीं. मनुष्याचें अंतःकरण स्वभावतः दुष्ट नसतें. साधारणतः मनुष्यें जाणून बुजून किंवा स्वसंतोषानें चूक करीत नसतात, तर अज्ञानामुळें ती त्यांच्या हातून घडून येते. अंतःकरणांतून ईश्वरी अंश अजीबात नाहींसा झाला, असें सहसा होत नाहीं, हें तत्त्व आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.

परंतु, पापी मनुष्यास वाटेवर जर आणावयाचें आहे, तर आपण स्वतः प्रथम मनुष्यामधील ईश्वरी अंश पहावयास सिद्ध असलें पाहिजे. प्रत्येक मनुष्यामध्यें गूढरूपानें वास करणारा जो सत्त्वांश तो प्रथम आपण शोधून काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तो शोधून काढल्यानंतर आपली भूतदया आपण जर प्रकट केली, तर पापाचे ढिगांचे ढीग रचलेल्या माणसांना देखील पुनः सत्पथावर आणितां येईल. जाणून बुजून वाईट काम करणाऱ्या अशा दुष्ट मनुष्याचें आपण उदाहरण घेऊन आपण अशी कल्पना करूं या कीं कायद्यास अनुसरून त्याच्या गुन्ह्याबद्दल त्याला शिक्षा झाली आहे. आतां अशा मनुष्यावर क्षमेचा काय परिणाम होतो तो पाहूं या. आपण प्रेमानें त्याचा हात धरून त्याला ह्मणूं या कीं, ‘ हे बंधु, तूं पाप केलें आहेस व त्याबद्दल तुला शिक्षाहि झाली आहे. परंतु तुजमध्यें ईश्वराचा अंश बीजरूपानें वसत आहे व सत्वगुणाचें जें बीज तुझ्या अंतःकरणांत आहे त्याची थोर वाढ होण्यासारखी आहे. तूं आपल्या दुर्बळ मनोविकारांशीं झगडण्याचा निश्चय करशील तर अद्यापही तूं समाजास भूषण होशील. ’ याप्रमाणें, खऱ्या अंतःकरणानें तुम्हीं जर त्या मनुष्यास क्षमा करून त्यास उपदेश केला तर तो मनुष्य बहुतेक अंशीं आपला जुना मार्ग सोडून देऊन सत्याच्या मार्गाचें अवलंबन करील. परंतु तुमच्या त्या क्षमेचा योग्य

परिणाम व्हावा अशी जर तुमची इच्छा असेल तर ती क्षमा विधायक असावी, निषेधात्मक असूं नये. ती अंतःकरणपूर्वक असावी, केवळ वरवरची नसावी. क्षमेच्या द्वारें व्यक्तिमात्रांतील जो गुणाचा भाग त्याच्याकडे प्रेमानें पहावयास शिकलें पाहिजे. पण तुमची कल्पनाशक्ति वाढल्याशिवाय ही गोष्ट शक्य नाहीं. ही कल्पनाशक्ति म्हणजे भ्रांति उत्पन्न करणारी आहे, किंवा कांहीं तरी काल्पनिक विषयांस अगर विचारांस प्राधान्य देऊन आपणास वेडी करणारी आहे, असें समजूं नये. जिच्यायोगें सर्वत्र जें मंगल आहे त्याकडेच आपली दृष्टी वळते, व आपण शोकानें अगदीं विव्हल झालों असतांही आपणांमध्यें आशा उत्पन्न करणारी जी शक्ति ती ही कल्पनाशक्ति होय. ती केवळ कवि किंवा साधु यांच्याच उपयोगाची आहे असें नव्हे, तर ज्यांचा आयुष्यांतील व्यवहाराशीं प्रत्यक्ष संबंध येतो असे मुत्सद्दी व शास्त्रवेत्ते यांचेंही या कल्पनाशक्तीवांचून चालावयाचें नाहीं. मोठ्या स्वीकृत कृत्यामध्यें या कल्पनाशक्तीची अत्यंत जरूरी आहे. चितान्याचे ठिकाणीं ही कल्पनाशक्ति नसेल तर त्याला आपली कला पूर्ण अवगत होणार नाहीं. वक्त्याचे ठिकाणीं खरेपणा नसेल तर त्याच्या वक्तृत्वाचा परिणाम श्रोतृवृंदावर फार दिवस टिकणार नाहीं. त्याचप्रमाणें, पापी मनुष्यावर क्षमेचा योग्य परिणाम घडून येण्यास व त्याला ती लाभदायक होण्यास क्षमेंत खरेपणा, आशा, धैर्य व मनुष्याच्या सत्वगुणांवरील विश्वास यांचा समावेश व्हावयास पाहिजे. अशा प्रकारची क्षमा आपल्यामध्यें आणण्याचा प्रयत्न करा, असें तुकोबा आपल्याला सांगत आहेत; व जगांतील आपला जो अनुभव त्यावरूनही आपणांस कळून येत आहे कीं या गुणाची जर वाढ केली तर दुष्कृत्यांत नित्य रत असणान्यास जागृत करण्याच्या कामीं क्षमारूपी मात्रेचा उपयोग खात्रीनें होण्यासारखा आहे.

# तेलंग सांप्रदाय आणि सुधारणेचा सुलभ किंवा राजमार्ग.

नुकतेंच हिंदु युनियन क्लबच्यातर्फे न्या० रानडे यांचें 'Telang School' या विषयावर एक व्याख्यान झालें. न्यायमूर्तींनीं जीं आजपर्यंत अनेक व्याख्यानें देऊन त्यांच्या योगें आपल्या देशबांधवांनां महत्त्वाच्या कित्येक प्रचलित विषयांवर विचार करावयास शिकविलें आहे, तशा प्रकारच्या व्याख्यानांपैकींच प्रस्तुत व्याख्यान आहे, हें मीं जेव्हां सदरहु व्याख्यान ऐकलें, त्याच वेळीं मला कळून आलें. हें व्याख्यान चर्चेचा विषय होतां होईतों न होऊं देण्याबद्दल न्यायमूर्तींनीं खबरदारी घेतली असावी, हें उघड आहे, व त्यांचा हेतु बहुतांशीं सफळही झालेला आहे. कारण जरी आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून न्यायमूर्तींनीं आपलें म्हणणें जोरदार व मुद्देसूदपणें श्रोत्यांपुढें मांडलें होतें, तरी त्यामुळें श्रोतृसमुदायांपैकीं ज्या कित्येक गृहस्थांची सामाजिक व धार्मिक सुधारणांबद्दल फारशी सहानुभूति नव्हती, त्यांनींही प्रस्तुत व्याख्यानाची इतकी तारीफ केली कीं, न्या० रानडे यांचें 'न्या० तेलंग' वरील व्याख्यान हें अत्यंत श्रेष्ठ प्रतीचें व विचारपरिप्लुत असें झालें, असें त्यांचें मत पडलें. इतकें झालें, तरी वरील व्याख्यान टीकाकारांच्या तडाक्यांतून अजिबात सुटलें, असें मात्र म्हणतां येत नाहीं! आपल्या व्याख्यानांत एका विवक्षित विचारपरंपरेस न्यायमूर्तींनीं 'तेलंगसांप्रदाय' हें नांव दिलें तें कित्येक मंडळीस खपलें नाहीं. त्यामुळें त्यांनीं अर्थातच न्यायमूर्तींच्या कांहीं विधानांविरुद्ध टीका केली. ही टीका फारशी कडक नव्हती. तथापि न्यायमूर्तींनीं जिला 'तेलंगसांप्रदाय' असें नांव दिलें, त्या विचारपरंपरेचा समाजप्रगतीच्या बाबतींत जर कांहीं उपयोग व्हावयाचा असेल,

तर वरील टीकेमधील ज्या कित्येक मुद्यांकडे साधारण व्यक्तींचें फारसें लक्ष्य जावयाचें नाहीं, असे कित्येक मुद्दे माझ्या अल्प समजुतीप्रमाणें विचारणीय असल्यामुळें ते मी आपल्या-पुढें मांडतों. 'तेलंगां'वरील न्यायमूर्तींचें भाषण वाचलें म्हणजे प्रथम दर्शनींच जो प्रश्न आपल्यापुढें उभा राहतो तो हाः—आपल्या सामाजिक व धार्मिक प्रगतीसंबंधानें ह्या विवक्षित सांप्रदायानें विशेष तें काय केलें व त्यानें काय केलें पाहिजे होतें ?

आपल्यापैकीं कित्येक असें म्हणतात कीं, न्या० तेलंग हे समाजसुधारक होते असें ह्मणणें अतिशयोक्तीचें आहे. तेलंग यांनीं इतर दिशांनीं जरी फार कामगिरी केलेली आहे असें मानिलें, तरी समाजसुधारणेच्या कामीं त्यांचा ह्मणण्यासारखा किंबहुना मुळींच उपयोग झाला नाहीं. "सामाजिक सुधारणा आधीं कीं, राजकीय सुधारणा आधीं" या विषयावर तेलंग यांचे फ्रामजी कावसजी हॉलमध्यें १८८६ च्या फेब्रुवारी महिन्यांत जें व्याख्यान झालें त्या व्याख्यानाकडे तेलंग यांचे टीकाकार नेहमीं बोट दाखवितात, आणि आपल्या ह्मणण्याची यथार्थता तेलंग यांच्या घरगुती गोष्टींची साक्ष देऊन ते सिद्ध करूं पाहतात. त्यांच्या मतें तेलंग हे केवळ बोलके सुधारक होते. वर निर्दिष्ट केलेल्या व्याख्या-नांत तेलंग यांनीं असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, प्रतिकाराचा जोर जितका कमी, तितकें सुधारणेचें पाऊल पुढें पडण्यास सुलभ असतें, असा साधारण सृष्टि-क्रम आहे; परंतु ज्या गोष्टींसंबंधानें त्यांनीं हें विधान केलें त्या गोष्टी व त्यांचे म्हणण्याचा जो भावार्थ होता, तो भावार्थ बहुजनसमाजाच्या ध्यानांत बरोबर न आल्यामुळें त्यांनीं अर्थांतच तेलंग यांचें वरील विधान म्हणजे सामाजिक बाबतींत स्वतःच्या जबाबदारींतून निसटण्याचा एक मार्ग होय, असा त्याचा अर्थ केला.

आहे. त्या वेळेपासून कै० तेलंग यांच्या नांवाबरोबरच त्यांच्या वरील उद्गारांचा पुष्कळ सुशिक्षित मंडळीच्या मनावर असा विलक्षण ग्रह झालेला आहे कीं, सामाजिक सुधारणेचा प्रश्न निघाला कीं, ते जितक्या उत्सुकतेनें त्यावर वादविवाद करितात, तितक्याच उत्सुकतेनें ते कोणतेंही समाजसुधारणेचें कृत्य करण्याची स्वतःवर पाळी आली तर तें बजावण्याची वेळ पुढेंपुढें ढकलण्यास तयार होऊन आपल्या ह्या टाळाटाळीस तेलंगाच्या "राजमार्गा" ची पुष्टि देतात. त्यांचें वरील विधान हें हल्लीं सर्वतोमुखीं झालेलें आहे. मला अशींहीं कांहीं उदाहरणें माहीत आहेत कीं, तेलंगांच्या ह्या विधानाच्या पांघरुणाखालीं कित्येक लोकांनीं आपली कृष्णकृत्यें झांकण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या समाजाचा बुद्धिरूपी जठराग्नि मंद झालेला आहे व त्याच्या आध्यात्मिक यकृताला विकृति झालेली आहे, अशा सध्यांच्या काळीं जर कांहीं लोकानीं तेलंगांच्या वरील विधानांचा विपर्यास केला तर त्यांत फारसें आश्चर्य मानावयास नको. आपल्या समाजास वर सांगितलेले जे दोन विकार जडले आहेत, त्यांतून प्रथम त्याची मुक्तता केल्याशिवाय सामाजिक किंवा धार्मिक सुविचारांचें बीज आपल्यामध्यें रुजणें शक्य नाहीं. कांहींजणांचा तर या विधानाबद्दल असा गैरसमज झालेला आहे कीं, त्यांचे मतें हें विधान न्या० रानडे यांचेंच आहे. पण वस्तुस्थिति अगदीं उलट आहे. न्यायमूर्ति रानडे यांनीं हें विधान केल्याचें कधीं ऐकिवांत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांनीं एकवार ह्या तत्त्वाचा निषेध केला होता.

वर उल्लेखिलेलें तेलंग यांचें व्याख्यान झाल्यावर कांहीं महिन्यांनीं न्या० रानडे यांची व माझी पुण्यास गांठ पडली, त्या वेळीं न्यायमूर्तींनीं माझ्यापाशीं असे उद्गार काढले कीं, तेलंग यांनीं जें तत्त्व प्रतिपादिलें आहे, त्याच्याबद्दल लोकांमध्यें गैरसमज होण्याचा बराच

संभव आहे. आपल्या लोकांस सुधारणेच्या विषयावर लांबलांब गप्पा मारण्याची संवय आहे, परंतु कार्य करण्याचा प्रसंग येऊन ठेपल्यावर त्यांपैकीं बरेचजण कर्तव्यविन्मुख होतात. अर्थातच ज्यांना समाजांतील व्यंगें दूर करण्याचें धैर्य नाहीं, अशा प्रकारच्या लोकांना न्या. तेलंगसारख्यांनीं प्रतिपादिलेलें हें तत्त्व ह्मणजे आपल्या जबाबदारींतून निसटण्यास आयतीच पळवाट मिळाल्यासारखें आहे. पुण्याहून मुंबईस परत आल्यावर मीं तेलंग यांना न्यायमूर्तींचें मत कळविलें. त्या वेळीं तेलंग यांनीं आपल्या म्हणण्याचा स्पष्ट खुलासा केला. ते म्हणाले कीं, आपल्या व्याख्यानांत आपणांस विशेष सांगावयाचें होतें तें हेंच कीं, व्यक्तीची किंवा समाजाची साधारणतः अशी प्रवृत्ति असते कीं, शक्य तेवढें करून विरोध आणि गैरसोई चुकवून सुधारणा घडवून आणतां येईल तर आणावयाची. परंतु आपलें म्हणणें असें मात्र मुळींच नाहीं कीं, कोणतीही सुधारणा ह्या तत्त्वाबरहुकुमच झाली पाहिजे. मीं यावर तेलंग यांस विचारलें कीं, जे सुधारक विरोधास किंवा अडचणींस न जुमानतां साधारण लोकांच्या पुढें जाऊन व प्रतिकारास मागें लोटून आपल्या ठाम समजुतींप्रमाणें चालण्यास डगमगत नाहींत, ते लोक आपल्या वेळेचा व शक्तीचा व्यर्थ व्यय करीत आहेत, असें म्हणण्याचा आपला उद्देश आहे काय? व्यक्तींनीं आपली उन्नति घडवून आणल्याशिवाय समाजाची उन्नति सहसा होत नसते हा जो समाजोन्नतीचा साधारण नियम तो आपल्याला संमत नाहीं काय? कोणत्याही बाबतींत ज्यांनीं सुधारणा घडवून आणलेली आहे, अशा थोर पुरुषांचें व्यक्तिशः समाजावर वजन पडतें; आणि अशा व्यक्तींच्या उदाहरणांमुळें सामाजिक किंवा अन्य कोणत्याही प्रगतीस फार उपयोग होतो, हें तत्त्व आपणांस पूर्णपणें मान्य आहे, असें तेलंग यांनीं त्या वेळीं मला सांगितलें. न्या०

रानडे यांचें व आपलें एका गोष्टींत मात्र एकमत होत नाहीं. बालविवाह व विधवापुनर्विवाह या बाबतींत कायद्याचें साहाय्य घेऊन सुधारणा घडवून आणण्याचा मि० मलबारी यांच्या चळवळीस रानडे हे जी पुष्टि देत आहेत, ती आपल्यास पसंत नाहीं असें ते म्हणाले.

पण, पुढें लवकरच न्या० मू० तेलंग हे सुधारणेच्या कामीं सरकारचें साहाय्य मिळविण्याच्या न्या० रानडे यांच्या तत्त्वाचे कट्टे अनुयायी बनले इतकेंच नव्हे, तर आपल्या समाजाच्या ठिकाणीं सुधारणा आपोआप घडवून आणण्याइतकें सामर्थ्य आहे किंवा नाहीं, या गोष्टीचा त्यांस भरंवसा वाटेनासा झाला. तो सन १८८७ सालच्या मे महिन्याचा सुमार होता. पुण्यांत वसंतव्याख्यानमाला सुरू होती. या व्याख्यानांमधून मि० मलबारी व ज्यांना त्या वेळीं "सुधारक" अशा नांवानें संबोधिलें जात असे, अशा व्यक्तींवर थोडीबहुत तरी टीका होत होती. यापूर्वीं सुमारें एक वर्ष प्रोफेसर वर्डस्वर्थ यांनीं एक चोपडें प्रसिद्ध करून त्यांत मलबारी यांना व्यर्थ आक्रोश न करण्याबद्दल सुचविलें होतें. त्यामुळें सुधारणेच्या विरुद्धपक्षास ते केवळ देवच होऊन बसले होते; इतकेंच नव्हे तर वर्डस्वर्थस हेबांसारख्या विद्वान् व वजनदार यूरोपियन गृहस्थाचा आपल्या पक्षास पाठिंबा आहे, या समजुतीनेंही विरुद्धपक्षाची मंडळी अगदीं नाचूं लागली होती. परंतु वर सांगितलेल्या सुमारास वर्डस्वर्थ रखमाबाई कमिटीचे अध्यक्ष झाले आहेत व न्या० तेलंग त्या कमिटीस येऊन मिळाले आहेत, हें वर्तमान प्रसिद्ध झालें! त्याबरोबर पुण्यांतील ह्या विरुद्ध पक्षांतील प्रत्येक तरुण बांडाच्या अंगचा नुसता तिळपापड झाला! कांहीं काळापूर्वीं वर्डस्वर्थ व तेलंग हे दोघेही जे ह्या सुधारणेच्या प्रतिपक्षाचे केवळ आधारस्तंभच नव्हे तर अगदीं प्रति-ईश्वर होऊन बसले होते, त्यांनीं अगदीं आयत्या वेळीं आपल्या भक्त व अनुयायीं

मंडळीस अशा रीतीनें तोंडघशीं पाडावें, हें अशा आवेशी व उत्साही तरुणांस कसें खपावें ? त्यामुळें जिकडे तिकडे ज्वलज्जहाल व्याख्यानें झडूं लागलीं. एका कॉलेजमधील प्रोफेसरसाहेबांनीं तर सर्वांवर ताण केली ! ते म्हणाले कीं, इंग्रज लोकांच्या रीतीभातींचें अनुकरण करणाऱ्या या सुधारक लोकांच्या डावपेंचांचा आपल्यास तर इतका तिटकारा आलेला आहे कीं, जर आपली उपजीविका अन्य मार्गानें चालवितां येणें शक्य असतें, तर आपण आमरण कोणासहि इंग्रजी शिकविलें नसतें, एवढेंच नव्हे तर, इंग्रजी एक शब्दही उच्चारला नसता ! बहुजनसमूहाचे मताचा प्रवाह कोणीकडे वहात आहे व आपण सुधारणा घडवून आणण्याचें काम ज्यांच्याकडे सोंपविलें होतें ते तें कशा प्रकारें करीत आहेत याची प्रो० वर्डस्वर्थ साहेबांना आतांपर्यंत कल्पनाही नव्हती. त्या वेळचे " ज्ञानप्रकाश " चे संपादक व विरुद्ध पक्षाचे अध्वर्यु सीताराम हरी चिपळूणकर यांनीं ज्या अंकामध्यें " सुधारकां " वर यथेच्छ तोंडसुख घेतलें होतें, ते सर्व अंक वर्डस्वर्थ साहेबांना पाठवून दिले. ते वाचल्यावर त्यांना वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे, हें ताबडतोब कळून आलें. तेलंग यांचेंही तसेंच झालें. प्रतिकाररहित सुधारणेच्या आपल्या तत्त्वाचा लोकांमध्यें किती शोचनीय गैरसमज झालेला आहे, व कायद्याच्या साहाय्यावांचून सुधारणा घडवून आणण्याचें जें तत्त्व आपण प्रतिपादित होतों तें किती फोल आहे, याचा तेलंग यांना चांगलाच प्रत्यय आला. तेलंग व वर्डस्वर्थ दोघेही त्या काळची वस्तुस्थिति पाहून स्तंभित झाले; व दोघांचींही मनें साफ बदललीं. प्रोफेसर साहेबांनीं एके दिवशीं मला बोलावून सांगितलें कीं, हें चोपडें प्रसिद्ध करून ह्या विरुद्धपक्षाच्या मंडळींच्या हातीं एक कोलीत दिलें याबद्दल आपल्यास आतां पश्चात्ताप होतो. आणि तेलंगांचें काय ? सन १८९१ सालच्या संमतिवयाच्या बिलाचे चळवळीचे वेळीं त्यांनीं

जी कामगिरी केली व त्याच वर्षी डॉ० भांडारकर यांना ज्ञातिबहिष्कृत करण्यासाठीं त्यांच्या ज्ञातीच्या लोकांनीं मुंबईंत सभा भरविली, त्या वेळीं तेलंग यांनीं जी मुत्सुद्देगिरी लढवून आपल्या ज्ञातिसमूहाला चकित करून टाकलें, त्यांवरून हें स्पष्ट दिसलें कीं, प्रतिकाररहित मार्गाच्या तत्त्वावर सुधारणेच्या राजमार्गावर त्यांचा स्वतःचा कधींही भरंवसा नव्हता. "Moral Basis of Progress" ( नीतितत्वांच्या पायावर उन्नतीची उभारणी ) या विषयावर मीं डेक्कन कॉलेजांत १८९२ सालीं जें व्याख्यान दिलें तें तेलंगांच्याच सांगण्यावरून व त्यांच्याच प्रेरणेमुळें दिलें होतें.

तेलंग हे कर्ते सुधारक नव्हते ही गोष्ट नाकबूल करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून त्यांचें वास्तविक स्वरूप लपवून त्यांचे ठिकाणीं नसलेले गुण त्यांचे माथीं लादल्यानें समाजसुधारणेच्या पक्षाचें कांहीं कार्य होत नाहीं किंवा असें लोकांस भासविल्यानें तेलंग यांची बाजू सांभाळली असेंही होत नाहीं. या बाबतींतील आपलें दौर्बल्य ते पूर्णपणें जाणून होते. एवढेंच नव्हे, तर आपलें कर्तव्य करण्याचें धैर्य आपल्यामध्यें नाहीं ही गोष्ट ते प्रांजलपणें कबूल करीत असत, ही गोष्ट या ठिकाणीं मुद्दाम स्पष्टपणें नमूद केली पाहिजे. ज्यांच्या अंगीं समाजव्यंगें सुधारण्याइतकें धैर्य किंवा सामर्थ्य नाहीं अशा कित्येक लोकांचा असा समज झालेला आहे कीं लोकाराधनेसाठीं स्वमतास गुंडाळून ठेवण्याचे कामीं आपण तेलंगांच्या आवडत्या तत्वाचें अनुकरण करीत आहोंत; परंतु वस्तुस्थिति अगदींच भिन्न आहे. आपण जें केलें पाहिजे तें करण्याइतकें धैर्य आपल्यांत नाहीं म्हणून आपल्या कर्तृत्वाभावावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न तेलंगांनीं कधींही केला नाहीं. उलट पक्षीं आपलें व्यंग ते पूर्णपणें जाणून होते, व त्यांच्याशीं ज्यांचा निकट संबंध असे, त्यांचेपाशीं ते हें स्पष्ट कबूल करीत असत कीं, कोणतेंही

मोठें कार्य घडविण्याचा किंवा ज्या कार्यांविषयीं लोकांच्या मनांत निरुत्साह उत्पन्न झाला आहे, तो घालविण्याच्या कामीं आपल्या-सारख्या निरुत्साही व हिशेबी माणसांचा तादृश्य उपयोग नाहीं. ( वरील विशेषणें त्यांनींच आपल्यास लावून घेतलीं आहेत. ) तथापि हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपल्यामध्यें जे अत्यंत श्रेष्ठ प्रकारचे बुद्धिवान् पुरुष होऊन गेले त्यांपैकीं तेलंग हे एक होत. ज्यांच्या ज्यांच्याशीं त्यांचा परिचय होई त्यांना त्यांना ते प्रिय होत. याचें कारण ते शांत, बहुश्रुत व स्वतःचे दोष समजणारे होते; एवढेंच नव्हे, तर आपण चुकलों हें समजल्यावर आपली चूक ते मोकळेपणें कबूल करीत. दांभिकपणा अथवा खोडसाळपणा यांचें त्यांना वारेंही नव्हतें. त्यांच्या मनामध्यें जी खळबळ होत असे, तिचें त्यांच्या जीवनक्रमावर पूर्णपणें प्रतिबिंब उठत होतें. तेलंग यांच्या सन्मानार्थ जी सभा झाली त्या वेळीं न्या० रानडे यांनीं तेलंगांबद्दल जे उद्गार काढले होते त्यांत आपणां साधारण लोकांना दिसला त्यापेक्षां फार खोल अर्थ होता. त्यांच्या भाषणाचें सार हेंच कीं, पौर्वस्त आणि पाश्चिमात्य या दोन संस्कृतींच्या कैचीमध्यें आपल्यास परस्पर विरुद्ध असा आयुष्यक्रम स्वीकारावा लागतो, या एका गोष्टींतच तेलंगांच्या बहुविध आयुःक्रमाचें रहस्य आहे. शेक्सपीयर, वर्ड-स्वर्थ, टेनिसन, इझाया आणि तुकाराम यांनीं आपल्या ग्रंथांतून जें मानवी जीवनाचें आदितत्त्व म्हणून वर्णिलें आहे त्या आत्मयुद्धाच्या तत्त्वाव्यतिरिक्त ही गोष्ट आहे काय? आपल्या मूर्खपणाच्या कृत्यांच्या योगानें निराश होऊन पंचमहाभूतांशीं झगडणारा **लीयर**, आपल्या आत्म्याला मार्गदर्शक असा प्रकाश शोधणारा **फॉस्ट**, आपल्या मित्राच्या निधनानंतर स्वतःचें सांत्वन करून घेणारा **टेनिसन**, "जीवन मार्गामध्यें ठिकठिकाणीं ज्यांचा पगडा आपल्यावर सर्वांहून

अधिक बसतो, अशा आपल्या चर्मचक्षूंनीं मला आपला दासानुदास बनविलें आहे, " असें म्हणणारा निसर्गभक्त **वर्डस्वर्थ** संसारयात्रें-तून पार पडण्याला सामर्थ्य देण्यासाठीं आपल्या भगिनीची याचना करीत आहे, या सर्व गोष्टींवरून आपल्याला काय बोध होतो बरें ? आपणांस विरोधाशीं झुंजलें पाहिजे, अंतरात्म्याचें जें आपल्या मनाशीं तुंबळ युद्ध लागतें त्यांत शांत चित्तानें, धिम्मेपणानें आणि प्रत्येक पाऊल जपून टाकून लढून झाल्यावरच आपल्यास मनुष्यपण प्राप्त होत असतें; या गोष्टी आपल्याला वरील कवींच्या कृतींवरून कळून येतात. आपल्या अंतरात्म्याकडून आपल्यास कधीं कधीं अंतःस्फूर्तीनें ज्या सूचना होत असतात, त्यांची अवहेलना करून हें युद्ध बहुतेक लोक टाळतात; कांहीं थोड्या व्यक्ति अशा आहेत कीं त्या ह्या अंतस्फूर्तीशीं झगडून शेवटीं विजयी होतात; परंतु तिसऱ्या प्रकारचे कांहीं लोक आहेत त्यांनाही अंतस्फूर्ति स्वस्थ बसूं देत नाहीं, आणि तिच्याशीं झगडण्याचें सामर्थ्य तर त्यांचे अंगीं नसतें. तेलंग हे या तिसऱ्या वर्गांतील होत. आत्मविरोधाचें तत्व त्यांचे ठायीं परिपूर्ण होतें, अगदीं श्रेष्ठ प्रकारच्या कर्त्या सुधारकां-प्रमाणें त्यांना सर्व गोष्टी दिसत होत्या व त्या पाहून त्यांच्याप्रमाणेंच यांचेंही मन तळमळत असे. परंतु स्वतःवर प्रसंग आला तर त्यास तोंड देण्यास जो कठोरपणा हवा असतो, जें धैर्य लागतें तें त्यांचे ठिकाणीं नव्हते व म्हणूनच त्यांना अखेर माघार घ्यावी लागली. त्यांचे विचार अगदीं परिपक्क होते; त्यांचा वर्तनक्रम अगदीं सोज्वळ असे; सुधारणा घडवून आणण्याची इच्छा त्यांचे ठिकाणीं प्रबळ होती व त्यांची वागणूक जशी सचोटीची तसेंच त्यांचें मनहीं अगदीं मोकळें असे. आपलीं व्यंगें लपवून त्यांची मखलाशी त्यांनीं कधींही केली नाहीं; उलट पक्षीं आपल्या दौर्बल्याबद्दल ते स्वतःचा स्पष्टपणें धिःकार करून घेत. तेलंग यांनीं प्रतिकाररहित

सुधारणेचें तत्व उपदेशिलें व आचरणांत आणिलें यासाठीं आपणही त्यांचेंच अनुकरण केलें पाहिजे असे जे कांहीं लोक मानतात त्यांनीं अशा आपल्या कल्पनांनीं आपण तेलंग यांचेबद्दल स्वतःचीं व दुसऱ्यांचीही गैरसमजूत करीत आहों हें पक्कें लक्षांत ठेवावें. त्यांचे ठाईं खऱ्या कर्त्या सुधारकाचें धैर्य नव्हतें तरी खऱ्या सुधारकाची शोधक बुद्धि त्यांचे ठिकाणीं वास करीत होती. ते अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे विद्वान् गृहस्थ होते. ज्यांच्या ठिकाणीं वर्तमान काळचे सर्व गुण, भूत काळचे सर्व श्रेष्ठ सद्गुण व भावी उन्नतीच्या सर्व आशा एकवट झाल्या आहेत, असें ईमर्सन ज्यांचें अगदीं यथार्थ वर्णन करतो अशा थोड्याशा श्रेष्ठ व वंद्य विभूतींपैकीं ते एक होते. यासाठींच समाजसुधारकांचें त्यांजवर प्रेम असे; व म्हणूनच ते तेलंग यांना धुरीण समजत असत. आणि तेलंगांना सुधारणेच्या बाबतींत आचरणांतील लंगडेपणा पूर्ण अवगत असल्यामुळें कर्त्या सुधारकांच्या उदाहरणांनीं व त्यांच्या प्रेरणेनें आपल्याला कांहीं सामर्थ्य प्राप्त होईल, आपली कर्तृत्वशक्ति वृद्धिंगत होईल, या आशेनें ते सुधारकांच्या सान्निध्यांत राहत. प्रतिकाररहित सुधारणेच्या कल्पनेस सामाजिक सुधारणेच्या कक्षेंत जर कां वाव दिला तर त्याच्या योगानें सुधारणेच्या कार्यास जबर धोका बसेल, व तिच्या योगानें कर्तव्यपराङ्मुखतेस व सुस्तीस आयतेंच निमंत्रण दिल्यासारखें होईल, हें इतर सुधारकांप्रमाणें खुद्द तेलंगांनाही मग कळून चुकलें होतें. सुधारणेच्या गतीला निष्कंटक मार्ग—राजमार्ग—पाहिजे; हें म्हणणें प्रथम दर्शनीं ठीक दिसतें. आणि केव्हां केव्हां असेही प्रसंग येत असतात कीं, आपल्यास त्यांपुढें वांकावेंच लागतें, व सबंध भाकर मिळण्याची आशा नाहींशी दिसली कीं, मिळेल त्या चतकोरावर आपणांस संतुष्ट रहावें लागतें. परंतु उन्नतीचा मार्ग संकटमय आहे, पदोपदीं आपल्याला विरोधाशीं

टक्कर दिल्यावांचून पुढें पाऊल टाकणें शक्य नाहीं, ही गोष्ट आपण पूर्णपणें लक्ष्यांत बाळगली पाहिजे. एकदां समाजास जर प्रतिकार-रहित सुधारणेच्या कल्पनेचा आधार दिला तर त्यांच्या श्रेष्ठ प्रकारच्या धनसंचयावरच आपण घाला घातला, त्यांच्या भावी उन्नतींच्या सर्व आकांक्षा नष्ट केल्या, सर्व राष्ट्राची बौद्धिक शक्ति ज्यांना मानतात अशीं नेकीचीं, थोर व उदात्त बुद्धीचीं, धैर्याचीं आणि सोशीक माणसें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य समाजांतून आपण नाहींसें केलें असें होईल. लोकांना एकवार आपण असें सांगितलें म्हणजे पुरें कीं, " बाबांनों तुम्ही आपली उन्नति करून घ्या; पण तुमच्या करण्यानें तुम्हांला विरोध उत्पन्न होत असेल तर त्याशीं टक्कर देण्याचें टाळतां येईल तितकें करून तुम्ही स्वतांचें कार्य साधतां येईल तर पहा. " आपल्या उपदेशाचा परिणाम काय होतो हें आपल्यास लागलेंच कळून येईल. प्रत्येक आपापली सुखसोई प्रथम पाहील व थोडीशी गैरसोय होण्याचा किंवा जनसमूहाशीं विरोध करण्याचा प्रसंग आला कीं, सुधारणेच्या सर्व कल्पना तो गुंडाळून ठेवील. आणि लोकांचे पुढारी म्हटले म्हणजे जे आपल्या अनुयायांच्या भ्रममूलक समजुतीस व त्यांच्या अज्ञानास पुष्टि देणारे आणि क्षणभंगुर लौकिकासाठीं किंवा लोकमान्यतेसाठीं हपापलेले असेच असावयाचे. समाजांतील कोणतेंही मोठेसें व्यंग दूर करण्याची पाळी आली कीं, असले नामधारी पुढारी खांद्यावरचें ओझें खालीं टाकून इरासमसनें म्हटल्याप्रमाणें म्हणावयाचें कीं, " मीं कांहीं कुशल नट नव्हे, तेव्हां आपण आपले बाजूला राहून नाटक पहाणं तेंच बरं. " राष्ट्रावर काय किंवा समाजावर काय केव्हां केव्हां असे प्रसंग येतात कीं, त्या वेळीं जो पुढारी म्हणून म्हणवतो, त्याला लोकांना तुम्हीं भलत्या मार्गानेंच चालला आहां, असें स्पष्ट सांगावें लागतें. आणि ज्या देशांत अशा प्रकारचीं धीट व सत्य

बोलणारीं माणसें आहेत, तोच देश खरोखर धन्य होय. समाजांत किंवा राष्ट्रांत व्यंगें मोठीं व तीं दूर करण्यास माणसें लेचींपिचीं असणें हें परस्पर विरुद्धच होय. जॉन ब्राईट मृत्यु पावल्यावर हाऊस ऑफ् कॉमन्समध्यें त्याच्यावर स्तुतिस्तोत्रांची नुसती वृष्टि झाली. ग्लॉडस्टन साहेब त्या वेळीं म्हणाले:—"मी अगदीं प्रांजलपणें हें कबूल करितों कीं, मी राजकीय चळवळींत शिरल्या वेळेपासून आतांपर्यंत ब्राईट साहेबांचें खरें स्वरूप काय आहे व त्यांची किंमत आपल्या देशास किती आहे, याची मला वास्तविक कल्पनाच नव्हती. हें येथें सांगण्याचा उद्देश एवढाच कीं, क्रीमियन युद्धासारख्या असामान्य प्रसंगीं ब्राईट साहेबांचे व त्यांचे, प्रख्यात व अलौकिक दोस्त जे कॉबडनसाहेब यांचें आपल्या देशामध्यें किती वजन आहे, याची बरोबर जाणीव मला त्या वेळीं झाली. या सत्पुरुषद्वयाचें जीवन, जनसमूहाची त्यांचे ठिकाणीं असलेली श्रद्धा व त्यांच्या कामगिरीबद्दलची त्यांची पसंती व त्यांचा उत्साह या गोष्टींवर होतें, असें म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाहीं. लोकमताला चलन देऊन त्याची प्रगति करणें हेंच त्यांचें जीवितकर्तव्य होय. क्रीमियन युद्धासंबंधानें जीं त्यांचीं मतें होतीं तीं इतर कांहीं जणांप्रमाणें मलाही मान्य नव्हतीं, तथापि लोकमान्यता व लोकांचा उत्साह यांवरच जरी त्यांच्या आजपर्यंतच्या कामगिरीची उभारणी होती, तरी प्रसंग आला तर त्यांचे प्रतिपक्षी ज्याला त्यांच्या चलतीचें आदिसर्वस्व समजत असत त्या लोकमान्यतेवर एका क्षणांत अंजली देण्यास ते एका पायावर कसे तयार असत, हें पाहून या विभूतिद्वयाची नीतिमत्ता कोणत्या दर्जाची आहे हें मला बरोबर कळून आलें. त्या वेळेपर्यंत या लोकमान्य पुढाऱ्यांच्या नीतिमत्तेची खरी कसोटी लागलीच नव्हती. आपल्या मतें जें योग्य व सत्य त्यासाठीं लोकांच्या सहानुभूतीवर व बहुजनसमाजाचा त्यांना जो आधार असे, त्यावर

पाणी सोडण्यास जे तयार झाले, त्यांनीं आपल्या ह्या अलौकिक व स्पृहणीय कृतीनें आपल्या समकालीन व भावी पिढीस किती उच्च प्रकारचें उदाहरण घालून दिलें आहे ? " ज्यानें त्यानें आपापल्यापुरतें पाहिलें म्हणजे त्याच्या जीवित्वाची इतिकर्तव्यता संपली, ही जी जुन्या लोकांची कल्पना, तिला सध्यांच्या काळीं फारसा थारा नाहीं. जनहितासाठीं आपलें जिवित्व आहे, हें बहुमोल तत्त्व आपण आतां शिकलों आहों, अशी माझी समजूत आहे. निदान आधुनिक संस्कृतीचें व प्रस्तुत कालच्या सर्व चळवळींचें हें मूळतत्त्व आहे. चार्लस डेल्स यांनीं " Coming People " (भावी पिढी) म्हणून जो ग्रंथ नुकताच लिहिला आहे, त्यावर टीका करतांना "स्पेक्टेटर" पत्र म्हणतें कीं, दुसऱ्यांसाठीं झीज सोसण्याची पात्रता आपल्या अंगीं येईपर्यंत लोकांनीं स्वार्थत्याग करावा, असें म्हणण्याचा आपल्यास हक्क नाहीं. ह्या स्वार्थत्यागाचा उपयोग आस्ते आस्ते लोकमत बनविण्याचे कामीं होत जातो. प्रस्तुत काळच्या प्रागतिक लोकांच्या उत्कृष्ट समाजघटनेचें मूळ बीजही याच गुणामध्यें आहे. अशा प्रकारचे विचार तेलंगांच्या तोंडून वारंवार ऐकूं येत. ज्यांचा ज्यांचा म्हणून त्यांच्याशीं दृढ परिचय असे व त्यांच्या स्नेहास व विश्वासास जे जे पात्र झालेले होते, त्यांना माझ्या म्हणण्याची सत्यता बरोबर कळून येईल. समाजविरोधाची तीव्रता कमी होईपर्यंत सुधारणा घडविणें इष्ट नव्हे. अशा प्रकारची कांहीं तरी सबब काढून स्वतःच्या कमकुवतपणावर पांघरूण ओढण्यापेक्षां स्वतःचें दौर्बल्य व भीरुत्व कबूल करणें हें शतपट बरें ! पुष्पशय्येवर लोळत पडून स्वतःची अथवा दुसऱ्यांची सुधारणा आपण घडवीन म्हणणें किंवा समाज पुढें गेला म्हणजे त्याबरोबर आपणही पुढें जाऊं असा वृथा संकल्प रणें वस्तुस्थितीस धरून नाहीं. " तेलंग सांप्रदाय " ही संज्ञा

सकृद्दर्शनीं चांगली दिसते. परंतु सामाजिक सुधारणेच्या बाबतींत अप्रतिबद्ध मार्गाच्या कल्पनेचें तत्त्व तेलंग यांस पूर्ण संमत होतें. ही मिथ्या कल्पना मात्र आपण मनांतून काढून टाकली पाहिजे. त्यांनीं जी कांहीं कामगिरी केली त्या मानानें पाहतां त्यांनीं आपल्याला नमुनेदार सुधारक म्हणवून कधींही घेतलें नाहीं. न्या० रानडे यांनीं ज्या सांप्रदायाला तेलंगाचें नांव दिलें आहे, त्या सांप्रदायापासून समाजसुधारणेच्या कार्यास जर कांहीं लाभ व्हावयाचा असेल, तर तेलंगांचें उदाहरण आपण मार्गदर्शक म्हणून घ्यावें. एवढेंच नव्हे तर दर्यांत खडक दाखविणारा जसा दीपस्तंभ असतो तशा प्रकारचा त्यांचे नांवाचा आपण उपयोग करून घेतला पाहिजे. नाहीं पेक्षां प्रख्यात इतिहासकार फ्रूड यांनीं म्हटल्याप्रमाणें " शब्दसमुच्चयांची अंधभक्ति " होऊन आपल्याकडे मूर्तिपूजेचे जे अनेक पंथ आहेत, त्यांतलाच आणखी हा एक पंथ होईल.

---

## रावसाहेब मंडलीक
## व
## समाजाची " पायाशुद्ध " सुधारणा.

सामाजिक गोष्टींमध्यें ज्यांचा त्यांच्याशीं मतभेद असे त्यांनासुद्धां हें कबूल करणें भाग आहे कीं, प. वा. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलीक यांच्या मृत्यूमुळें आपल्यामधील एक नररत्न नाहींसें झालें. इतकेंच नव्हे तर चारित्र्याचा एक उत्कृष्ट नमुना आपल्या पुढून गेला. मंडलीक यांचे अनुयायी म्हणविणारांनीं आपल्या मतें राष्ट्रीयत्वाचा प्रसार करणाऱ्या ज्या कांहीं

पुराणप्रिय चळवळी हल्लीं चालविल्या आहेत, त्यांमध्यें मंडलीक आज हयात असते तर ते सामील झाले असते कीं काय असा प्रश्न मीं आपल्या मनास अनेक वेळ केला असेल. परंतु अमुक अमुक झालें तर अमूक अमूक झालें असतें, अशा प्रकारच्या शुष्क काल्पनिक वादांमध्यें गुंतवून घेणें मला इष्ट दिसत नाहीं. कारण " मेलेलीं माणसें बोलत नाहींत " हें कोणालाही कळतें, मग शुष्क वितंडवाद कां ? रावसाहेबांच्या खासगी व सार्वजनिक वर्तनामध्यें ज्या कित्येक उत्कृष्ट गोष्टी मला आढळून आल्या, त्यांवर तासांचे तास विचार करणें मला फार आवडतें. मीं स्वतःशीं असें म्हणतों कीं " रावसाहेब ! आपण आजच्या कालीं आम्हांमध्यें असावयाला पाहिजे होतें ! " त्यांचे हयातींत सामाजिक सुधारणेसंबंधीं कांहीं वादग्रस्त मुद्यांचें विवरण करीत असतां वर्तमान पत्रकार या नात्यानें रावसाहेबांबद्दल मला कित्येक वेळां कठोर भाषा वापरावी लागली, ही गोष्ट खरी आहे. परंतु तो वेळ खडाजंगीचा होता, त्यामुळें त्या वेळच्या क्षुब्धतेचें प्रतिबिंब लेखांतही दृग्गोचर व्हावें, हें साहजिकच आहे. कोणाही मोठ्या माणसाची खरी किंमत त्याच्या हयातींत आपल्याला कळून येत नसते, हें मनुष्यस्वभावाचें एक वैगुण्यच आहे. रावसाहेब मंडलीक हे एक जुने आग्रही कट्टे पुराणमतवादी होते, असा चालू पिढींतील मंडळीचा साधारण समज आहे. परंतु एके वेळीं रावसाहेबांनीं सुधारणेची ध्वजा आपल्या खांद्यावर वाहिली होती, आणि पुराणवादाच्या मंदिरावर त्यांनीं आपल्यापरीं प्रहारही केलेले होते. " **रास्तगोफतार** " व " सत्यप्रकाश " या पत्रांतून सन १८६५ सालीं वल्लभाचार्य महाराजांवर निर्भिडपणें कडक टीका केल्याबद्दल, प० वा० करसनदास मूळजी यांजवर जो खटला चालला होता, त्या वेळीं रावसाहेबांनीं ह्या श्रेष्ठ समाजसुधारकाची बाजू घेतली होती.

त्याचप्रमाणें ज्यांनीं आपल्या ह्या प्रांतांत स्त्रीशिक्षणाचें बीज पेरलें, अशा प्रमुख हिंदू सद्गृहस्थांपैकीं ते एक होते. एवढें झालें तरी अंतर्यामीं ते जुन्या मताचे होते. प्रतिमापूजनावर त्यांची पूर्ण श्रद्धा होती; जातिभेदावर त्यांचा विश्वास होता; आणि जुन्याचा त्याग करून नवीन गोष्टींचा स्वीकार करणें, त्यांस आवडत नसे, हें कांहीं खोटें नाहीं. तथापि रावसाहेब आपल्या समजुतीप्रमाणें चालणारे होते. जसे त्यांचे विचार, तदनुरूपच त्यांचें वर्तन असे. लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं मूर्तींच्या पुढें नाक मुठींत धरून ते बसत नसत. त्याचप्रमाणें ईश्वर एक आहे, किंवा अनेक आहेत या विषयीं स्वतःची श्रद्धा वास्तविक कांहींच नसतां मूर्तिपूजेची प्रशंसा करणारे कित्येक लोक जसे तिचें अवडंबर माजवितात, तसें करण्याचाही त्यांनीं कधीं प्रयत्न केला नाहीं. जातिभेदाचें तत्त्व ते मनापासून पाळीत असत. "हॉटेलांत" वाटेल त्यावर हात मारावयाचा आणि बाहेर पडतांच धर्माभिमानाचा टेंभा मिरवावयाचा ही कला त्यांना ठाऊक नव्हती. त्यांची पुराणप्रियता कित्येक मंडळीला जरी उपहासास्पद वाटली, तरी त्याबद्दल ते स्वतः फारशी पर्वा करीत नसत. आपल्या भावनेप्रमाणेंच ते जुन्या मतांना चिकटून असत. आपल्या रुग्ण पत्नीबद्दल रावसाहेबांनीं जें प्रेम वाटत असे व तिचे ठिकाणीं त्यांची जी श्रद्धा असे, ती केवळ अद्वितीय होती. या बाबतींत त्यांचें वर्तन अनुकरणीय होतें. व धार्मिक व सामाजिक बाबतींत पुराण आचारविचारांबद्दल त्यांनीं जी विलक्षण चिकाटी दाखविली तिला या त्यांच्या शुद्ध पत्निप्रेमा मुळें एक प्रकारची शोभा आली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या एका बाबतींत ते आपल्या इतर देशबांधवांहून फार श्रेष्ठ होते. ज्यांनीं आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे, अशा आजपर्यंतच्या थोर व सच्छील सत्पुरुषांच्या मालिकेंत रावसाहेबांस कां

स्थान द्यावयाचें, असें जर मला कोणी विचारलें तर त्यांना मी असें सांगेन कीं, दृढनिश्चय, धीरोदात्त वृत्ति, शुद्ध हेतु व विचार, सत्य प्रति आणि अढळ पत्नीप्रेम या गुणसमुच्चयाच्या योगें करून त्यांची नीतिमत्ता एवढी श्रेष्ठ झाली आहे कीं, धार्मिक व सामाजिक गोष्टींमध्यें रावसाहेबांशीं ज्यांचीं मतें पटत नाहींत, अशा आमच्यासारख्या मंडळींनाही ते पूज्य वाटतात.

माझ्या स्वतःविषयीं म्हणाल तर, मला ते फारच पूज्य वाटतात. रावसाहेब आज हयात असावयास हवे होते, असें मी नुकतेंच म्हणालों. तरी ते आज असते तर पूर्वींप्रमाणेंच त्यांनीं समाजसुधारकांशीं विरोध चालविला असता, हें मीं जाणून नाहीं असें नाहीं. परंतु त्यांच्या विरोधानें सुद्धां प्रतिपक्षास एक प्रकारची बळकटी मिळत असे. त्यांची स्वमताबद्दल विलक्षण चिकाटी व सत्यप्रीती यामध्यें एक प्रकारचा संसर्गोत्पादक गुण होता. कारण रावसाहेब जसे आपल्या मतांस चिकटून असतात; तसेंच आपणही अंगीकृत तत्त्व सोडावयाचें नाहीं असें त्यांच्या प्रतिपक्षीयांस त्या वेळीं वाटत असे. दुसरी गोष्ट अशी कीं, लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांचें धुरीणत्व पटकावणाऱ्या गांवगुंडाला जे गुण लागतात तशांपैकीं एकही गूण रावसाहेबांच्या अंगीं नव्हता. परंतु सुधारकांना रा० सा० मंडलीकांबद्दल कृतज्ञता बाळगण्यास याखेरीजही पुष्कळ गोष्टी आहेत. सन १८८६ सालीं ज्या घडामोडी झाल्या त्या ज्यांनीं पाहिल्या असतील, त्यांना ही गोष्ट आठवत असेलच कीं, बालविवाह व विधवापुनर्विवाह या विषयांवर मि. मलबारी यांनीं लेख प्रसिद्ध करून त्यांच्या द्वारें कित्येक सुधारणांच्या कामीं कायद्याचें साहाय्य देण्यासाठीं सरकारास विनंति केली होती. मि. मलबारी यांच्या या सूचनेस रा० सा० मंडलीक आदिकरून पुष्कळ मंडळी फारच विरुद्ध होती. या प्रतिपक्षीय

मंडळीनें माधवबागेंत सर्व दर्जाच्या व सर्व जातींच्या हजारों हिंदु लोकांची एक सभा रा० सा० च्या धुरीणत्वाखालीं भरविली, व त्या सभेनें मि० मलबारी यांच्या वरील सूचनांचा जोरानें निषेध केला. त्या वेळीं वाद अगदीं खडाजंगीचा चालला होता आणि पक्षभेद अगदीं कळसास पोंचला होता असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. "सुधारक म्हणविणारी" मंडळी लपंडावी परंतु नेभळट आहे असें जुन्या पक्षाच्या लोकांस वाटत होतें. व ही मंडळी मलबारी यांच्या चिथावणीनें नाचत आहे असें त्यांचें मत होतें. कारण सुधारणेची इमारत पायापासून आस्ते आस्ते बांधण्याऐवजीं ही सुधारक म्हणविणारी मंडळी एकदम कळसाचीच उभारणी प्रथम करीत आहे; समाजसुधारणेविषयीं लोकमत तयार नसतां आधीं लोकांचीं मनें तयार करून नंतर सुधारणेस हात घालण्याऐवजीं ही मंडळी समाजावर सुधारणा बळेंच लादण्याचा प्रयत्न करीत आहे असें जुना पक्ष म्हणत होता. सुधारक पक्षाचें म्हणणें असें होतें कीं, रा० सा० मंडलीकप्रभृति मंडळीची "पायाशुद्ध" सुधारणेविषयींची ही बडबड म्हणजे कौमुदि प्रकाशाप्रमाणें केवळ दृष्टीस सुखप्रद आहे, यांत कांहीं तथ्य नाहीं. जर त्यांत कांहीं तथ्य असेल, व ह्या जुन्या मंडळीच्या मनांतून खरोखरच जर कांहीं सुधारणा घडवून आणावयाच्या असतील, तर त्यांनीं सुधारकपक्षाशीं केवळ विरोध करून चालणार नाहीं. या मंडळीनें "पायाशुद्ध" सुधारणा कशी करावयाची हें स्वतः करून दाखविलें पाहिजे. हे सुधारक लोक केवळ बडबडण्यापलीकडे कांहीं करीत नाहींत. यांचे हे भपकेदार लेख, लांब लांब व्याख्यानें आणि वितंडवाद यांच्या योगानें सुधारणेविषयीं बहुजन समाजाचीं मनें उलट विटून मात्र जात आहेत असें जुन्या पक्षाची मंडळी म्हणत होती, तर उलट पक्षीं, ह्या विरुद्ध पक्षाच्या मनांतून सुधारणेचें पाऊल कोणत्या

तऱ्हेनें पुढें टाकावयाचें आहे, असें सुधारक पक्ष विचारीत होता. जुन्या पक्षाचें यांना उत्तर असें होतें कीं, "बाबानों आपले स्वामी, धर्मगुरु आणि शास्त्री यांची अवहेलना करून त्यांचीं मतें धाब्यावर बसवून किंवा अन्य कोणत्याही रीतीनें त्यांना चिडवून सुधारणा घडवीन म्हटलें तर तें इष्ट नाहीं व शक्यही नाहीं. त्यांच्याकडे जाऊन सौम्यपणें त्यांचीं मनें आपल्याकडे वळविलीं पाहिजेत. व अशा रीतीनें त्यांनां अनुकूल करून घेतल्यावर, यांची सहानुभूति मिळविल्यावर मग त्यांच्याच सहाय्यानें, आपल्यास इष्ट त्या सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत. हा सीधा व सोपा मार्ग टाकून तुम्ही जर भलत्याच मार्गानें जाऊं लागला तर तुमची कार्यसिद्धि व्हावी कशी ? योग्य रीतीनें जर तुम्ही चालला तर कोणाचीं मनें दुखणार नाहींत आणि जिकडे तिकडे शांतता राहील." रावसाहेबांच्या पक्षाचें म्हणणें याप्रमाणें होतें. सुधारणामंदिराच्या द्वाराची किल्ली आपल्याकडे आहे असें दोन्हीही पक्षाचे मंडळीस वाटत होतें. अतएव आपला प्रतिपक्ष अदूरदर्शी, दांभिक आणि लौकिकास हपापलेला आहे असें दोन्हीहि पक्षांस वाटत होतें. या वादावर त्या वेळीं जे कित्येक उत्कृष्ट लेख प्रसिद्ध झाले त्यांमध्यें एका स्थानिक इंग्रजी पत्रकाराचे कांहीं लेख होते. दोन्ही पक्षांकडून त्या वेळीं ह्या विशिष्ट पत्रांत झणझणीत पत्रव्यवहार सुरु होता. शेवटीं त्या पत्राच्या संपादकानें मोठ्या शैलीनें उत्तर देऊन हा वाद बंद केला. अमुक एका पक्षाचे हातून सुधारणेचें कार्य होईल किंवा नाहीं हें त्या पक्षाच्या केवळ बोलकेपणानें ठरावयाचें नाहीं तर जो पक्ष कांहीं तशी कृति करून दाखवील तोच सुधारणेचा खरा पुरस्कर्ता म्हणवून घेण्यास पात्र होईल. यासाठीं या वादाचा खरा फैसला मिळवावयाचा असेल तर दोन्हीही पक्षांनीं आपापल्या परीं कार्यास लागलें पाहिजे. एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या काढून व्यर्थ वेळ

दवडण्यांत काय हांशील ? याप्रमाणें सदरहु पत्रकारानें शहाण-पणाचें उत्तर देऊन आपल्या पत्रांतील वाद बंद केला.

या लेखामुळें असो किंवा रावसाहेबांच्या अनुयायांपैकीं जी कित्येक खरोखरच सत्यनिष्ठ व सज्जन मंडळी होती, तिच्या आग्र-हामुळें असो, रावसाहेबांनीं या सुधारणाशकटाचे धुरेस खांदा देण्याचा खरोखरीच निश्चय केला. त्यांचे पक्षाची मंडळी या वादांत इतकी गुंतून गेली होती कीं, आतां माघार घेणें त्यांना शक्य नव्हतें. "सुधारक म्हणविणारी" ही मंडळी भलत्याच मार्गानें कार्यास आरंभ करीत आहे असा रावसाहेबप्रभृति मंडळीचा सुधारकांवर आरोप होता. समाजास सुधारणेची आवश्यकता आहे ही गोष्ट या मंडळीस मान्य होती, व शास्त्री व धर्मगुरु यांना सौम्यपणें आपल्या बाजूस वळवून त्यांच्या सहाय्यानें सुधारणाशकट हांकावा असें या जुन्या मंडळीनें सार्वजनिक रीतीनें जाहीरही केलें होतें. तेव्हां अशा स्थितींत त्यांना माघार कशी घेतां येईल ? शेवटीं असें झालें, त्याच वेळेच्या सुमारास एक विद्वान्, सुशिक्षित, तरुण ब्राह्मण गृहस्थ विलायतेहून नुकताच परत आला होता. म्हणून याज्ञिक कर्मांत व हिंदु लोकांच्या आचारांच्या व रूढींच्या बाबतींत जुने लोकांचे जे केवळ आधारस्तंभ त्या शास्त्र्यांकडे जाऊन कोणता तरी प्रायश्चित्तविधि करवून विलायतेहून परत आलेल्या ह्या गृहस्थास पुनरपि ज्ञातींत घेऊन सुधारणेस तुम्हीं आपला पाठिंबा दिला पाहिजे, असें त्यांचें मन वळविण्याच्या कामास **रावसाहेब मंडलीक** हे लागले. त्या प्रयत्नांचा शेवट काय होतो इकडे सर्व मंडळीचे डोळे लागून राहिले होते. कोणत्याही सुधारणेचें नांव निघालें कीं नाक मुरडणारे व जुन्या पक्षाचे कट्टे पुरस्कर्ते असे जे रावसाहेब **मंडलीक** त्यांनीं सुधा-रणेचें कार्य आपल्या हातीं घेऊन ती कशी घडवून आणावयाची हें ते दाखविणार आहेत हें ऐकून सुधारक पक्षास फारच आनंद झाला.

रावसाहेबांनीं कित्येक शास्त्र्यांस एकत्र करून त्यांची एक परिषद भरविली, पण शेवट व्हावयाचा तोच झाला! रावसाहेब नवीन मतांचें प्रतिपादन करीत आहेत म्हटल्याबरोबर शास्त्री मंडळ बिचकलें. ते सुधारणांचें नांवही काढूं देईनात. रावसाहेबांचें हें वर्तन म्हणजे पुराणमतवाद्यांवर वज्रघातच आहे, असें एका शास्त्रानें त्या वेळीं आपलें मत दिलेलें मला ठाऊक आहे. त्या वेळीं एल्फिन्स्टन कॉलेजांत महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर या नांवाचे एक विद्वान् संस्कृत शास्त्री होते. इतर कांहीं शास्त्र्यांप्रमाणें रा. सा. मंडलीक हे या शास्त्र्याकडेही गेले. परंतु त्यांनां ही सर्व चळवळच विपरीत वाटली. आपणां सर्वांना व आपल्या धर्माला विकून टाकण्याचा ह्या चळवळीच्या उत्पादकांचा विचार आहे कीं काय हेंच त्यांनां प्रथम समजेना. रावसाहेब आपलें मत विचारतात व ह्या सुधारणेस कांहीं तरी शास्त्राचा आधार द्या म्हणतात, हें सर्व खरें; परंतु आपल्याला ह्याबद्दल शास्त्रांत कांहींच आधार सांपडत नाहीं, असें मला खुद्द भीमाचार्य शास्त्र्यांनींच सांगितलें होतें. ह्याबद्दल बोलतां बोलतां शास्त्रीबोवा मला एकदां म्हणाले:–" सध्यांचा लोकमतप्रवाह आमच्या विरुद्ध आहे, यासाठीं आम्हीं कितीही धडपड केली तरी तिचा कांहीं उपयोग नाहीं; हें आम्ही शास्त्री मंडळी जाणून आहों. यासाठीं तुम्हीं आम्हांला न विचारावें हें उत्तम. तुम्हांला जें रास्त वाटतें, तें तुम्हीं करा. आम्ही कांहीं तुमच्या आड येत नाहीं. पण तुम्हीं जर आमच्याकडे येऊन आम्हांस विचाराल व तुम्हाला पाहिजे तसा शास्त्राचा अर्थ करावयास आम्हांला सांगाल, तर आम्हांला स्पष्टपणें सत्य तेंच बोलणें भाग आहे. आणि असें झालें, तर अर्थातच तुमच्या कार्यास आमच्याकडून विरोध होईल." याप्रमाणें या जुन्या पक्षांतच भेदाभेद झाले. इंग्लंडहून परत आलेल्या वरील गृहस्थास प्रायश्चित्त देऊन मेजवानी

देण्याची तयारी चालविली होती. पण ऐनवेळीं शास्त्र्यांपैकीं कोणीच आले नाहींत. रावसाहेब फक्त पानसुपारी घेऊन न जेवतां चालते झाले. आणि हा भोजनविधि म्हणजे खरी कसोटी होती. याप्रमाणें हा प्रयोग फसला. त्या वेळेपासून ह्या "पाया-शुद्ध सुधारणे" विषयीं कधीं कांहीं फारसें ऐकूं येईनासें झालें !

रावसाहेब मंडलीक यांचें नांव निघालें कीं, मला वरील शब्दांची आठवण होते. या त्यांच्या म्हणण्यांत मुळींच अर्थ नाहीं, असें नाहीं. सामाजिक बाबतींत सरकारी कायद्यांची जरुरी नाहीं म्हणून तद्विषयक चळवळ ते तुच्छ मानीत असत; हें योग्य किंवा अयोग्य हा प्रश्न वेगळा. परंतु समाजसुधारणेच्या कार्यास त्यांनीं अप्रत्यक्ष रीतीनें मदत केली आहे, याबद्दल आम्ही त्यांचे खरोखर ऋणी आहों. येन केन प्रकारेण आपलें नांव पुढें यावें व मोठमोठ्या माणसांमध्यें मिसळण्यास आपणास वाव मिळावा, अशा प्रकारच्या आप्पलपोट्या कल्पनांनीं सुधारकपक्षांत सामील झालेला, त्या वेळीं एक वर्ग होता. असले "पैसा पायली" सुधारक या "सुधारक म्हणविणाऱ्या" लोकांमध्यें आहेत, हें मंडलीक यांनीं लोकांच्या नजरेस आणलें. अशा लोकांना रावसाहेब सहजासहजीं झालेले (Martyrs Luthers of Lavender and rose) म्हणत असत. भयंकर अडचणींस न जुमानतां आमच्या समजांतील कित्येक अनिष्ट चालीरीतींचें आविष्करण करण्याचा जे प्रयत्न करीत होते, त्यांजवर रावसाहेबांचा कधीं कधीं फाजील कटाक्ष असे हें मला मान्य आहे. प्रचलित अनिष्ट रूढींचें आविष्करण करण्याची किंवा त्यांत सुधारणा करण्याची ज्यांनीं स्वतः कधींही खटपट केली नाहीं, त्यांनीं जर दुसरा कोणी अशा चालीरीतींनीं समाजांत तसाच कायमचा धिंगाणा घालून त्यांचे दुष्ट परिणाम समाजास कायमचे भोगूं देण्याऐवजीं यथाशक्ति ते निदान जन-

तेच्या निदर्शनास तरी आणून दिलें, तर त्या व्यक्तीकडे तुच्छता-पूर्वक पहावें, यांत अस्वाभाविक कांहीं नाहीं. सन १८८४ पासून १८८७ पर्यंत हा जो वाद चालला, त्याचा एक मात्र इष्ट परिणाम झाला. "सुधारक" आणि "दुर्धारक" या दोघांनींही एक-मेकांपासून शिकण्यासारख्या पुष्कळ गोष्टी शिकून घेतल्या. असल्या विरोधाच्या योगानें रावसाहेबांनीं सुधारकांस आत्मशोधन करावयास शिकविलें. आपण बोलतों काय व वागतों कसें हें प्रत्येकानें आपा-पल्या मनाशीं शोधावें, हें सुधारकांस त्यांनीं दाखवून दिलें, त्याच-प्रमाणें अखेरीस जर कार्यसाफल्य साधावयाचें असेल, तर आपण प्रत्यक्ष कृति करून दाखविण्यास व प्रसंग पडल्यास स्वार्थत्याग करावयास सिद्ध असलें पाहिजे, ही गोष्ट पूर्वींपेक्षां अधिक स्पष्टपणें या वेळीं सुधारकांच्या प्रत्ययास आली. सुधारकांशीं त्यांचा विरोध व त्यांजवरील त्यांची टीका यांचा मूळ उद्देश जरी एक असला, तरी उगीच शुष्क बडबड जी फार चालली होती, ती त्यांच्या विरोधाच्या योगानें कमी झाली आणि रावसाहेब जिला "पायाशुद्ध" सुधारणा किंवा "अंतर्गत सुधारणा" असें म्हणत असत, त्या त्यांच्या म्हणण्याला कांहीं तरी अर्थ आहे—मग तो अर्थ खुद्द रावसाहेब जो समजत असत, त्याहून कदाचित् भिन्न असेल-पण ही संज्ञा केवळ निरर्थक नव्हे, ही गोष्ट सुधारकांस कळून आली. शास्त्री लोकांना व बहुजनसमाजाला सांगातीं घेऊन सुधारणेस हात घालावा, या तत्त्वावर रावसाहेबांचा फाजील विश्वास होता. परंतु वर सांगितलेला प्रयोग जो त्यांनीं केला त्यावरून हें सिद्ध झालें कीं, ज्यांचें मन सुधारणांच्या कल्प-नांनीं सु·काशित झालेलें आहे, त्या कल्पनांचें ज्यांनीं नीट आकलन केलेलें आहे, आणि तदनुरूप ज्यांनीं आपला वर्तन-क्रम ठेवलेला आहे, अशा जाणत्या व जबाबदार पुढाऱ्यांनीं

आपल्या कृतींनीं उदाहरण घालून दिल्यावांचून शास्त्री काय किंवा बहुजनसमाज काय, आपल्या स्थानापासून तिळमात्रही हालणार नाहीं; पुढाऱ्यांनीं पुढाकार घेतल्यावर त्यांना अनुयायी मिळण्यास कदाचित् कांहीं काळ लागेल, परंतु पुढारी व्यक्तिशः जर आपल्या अंगीकृत कार्यास बिलकुल न सोडणारे असतील तर त्यांना अनुयायीवर्ग हा केव्हांना केव्हां तरी मिळालाच पाहिजे. कालावर व समाजसंस्थांवर त्यांचा भरंवसा होता. सर्व कांहीं इष्ट गोष्टी कालांतरानें आपोआप होणार आहेत, असें त्यांना वाटत असे. डॉ. मार्टिनो यांनीं म्हटल्याप्रमाणें व्यक्तींप्रमाणें समाजाचीही खरी सुधारणा ही "एकाएकीं दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या अशा कोणत्या तरी एका निवांत स्थानापासून निघून प्रथमतः आसपासच्या व नंतर क्रमशः सर्वत्र पसरणारी, अतएव मध्यबिंदूपासून वर्तुलरेषेपर्यंत सर्व प्रदेश व्यापणारी असते. प्रेरणा, सूक्ष्मपरिज्ञान, व अंगभूत शक्ति यांच्या योगें प्रथमतः कोणातरी व्यक्तीचें मन उद्दीप्त होतें व आपल्या अनिवार्य प्रखरतेच्या योगानें अशा उद्दीपित विचारांचा पगडा आस्ते आस्ते अधिकाधिक व्यक्तींवर बसत जातो. याप्रमाणें बुद्धीपासून बुद्धि, चैतन्यापासून चैतन्य व विचारांपासून विचार उत्पन्न होत जातात." डॉ० मार्टिनो यांची ही कल्पना मंडलीक यांना माहित नसावी असें वाटतें.

"अंतस्थ 'अनुताप', व्यक्तिविषयक नैतिक सामर्थ्य आणि कोणत्याही महत्कार्याविषयीं अथवा धर्माविषयीं दृढ विश्वास हीं एकंदर सामाजिक सुधारणांचीं प्रधान अंगें आहेत व यामुळेंच कोणत्याही सुधारणा घडून येत असतात." कित्येक शतकेंपर्यंत स्वामी व शास्त्री हे रूढी व परंपरा यांच्या योगानें जुन्या पुराण्या मतांशीं व विचारांशीं जखडून टाकले गेले आहेत. अशा स्थितींत बनलेले त्यांचे विचार त्यांनीं सोडून द्यावें, अशी अपेक्षा करणें हें

मृगजलान्वेषणाप्रमाणें निराशाजनक आहे. नवीन स्थित्यंतराप्रमाणें चालल्यावांचून आपणास अन्य मार्ग नाहीं, असें त्यांना कळून आलें कीं, आपल्या सुधारणा मान्य करणें त्यांना भाग पडेल. प्रथम प्रथम आपली चळवळ हाणून पाडण्याचा ते अर्थातच प्रयत्न करतील; सुधारक पक्षाच्या लोकांस शक्य तेवढें ते अडवायला पहातील; त्यांना शिव्या देतील व त्यांचे नांवानें हातपाय आपटतील. परंतु त्यांच्या अशा करण्यानें आपल्या कार्यास उलट अधिक बळकटीच येत जाईल. याचें कारण असें कीं, सुधारकांना आपलें म्हणणें लोकांना समजून द्यावयाचें असतें. परंतु बहुजनसमाज हा बहुधा आस्थाहीन व उदास असतो. आपल्या सभोंवार काय चाललें आहे, हें डोळे उघडून पहाण्याची किंवा कान देऊन ऐकण्याची समाजास संवय नसते. परंतु स्वामींनीं विरुद्ध पक्षाची बाजू पत्करून युद्धाची ध्वजा एकदां उभारली कीं, सर्व समाजाचे डोळे, कान हे या सुधारकांकडे लागून राहतात. असें झालें म्हणजे ज्या ठिकाणीं ज्ञानप्रकाश कधींच पडण्याचा पूर्वी संभव नव्हता, त्या ठिकाणीं तो सावकाशपणें पण निश्चयेंकरून पडत जातो. माझें म्हणणें चुकीचें आहे काय? मी अमुक एक म्हणून नांव सांगत नाहीं; परंतु आधुनिक कोणतीही चळवळ घ्या, तीवरून माझ्या म्हणण्याची सत्यता आपल्याला पटेल. "व्यक्तिविषयक श्रद्धेपासून मोठमोठ्या प्रचंड सामाजिक घडामोडीची उत्पत्ति असते" असें एका विद्वान् पंडितानें म्हटलें आहे. "हे समोर खडक दिसताहेत यांबद्दल हुशारीनें व सावधगिरीनें वागा" असा इशारा सुधारकांस रा. सा. मंडलीक वारंवार देत असत. केव्हां केव्हां मोठमोठ्या सुधारकांनांही अशा प्रकारच्या इशाऱ्याची जरूरी असते. कारण सुधारणेविषयींच्या विचारांस बहुधा नहमीच मानसिक उल्हासाची जोड मिळत असल्यामुळें

अशा सुधारणाप्रिय मनुष्याच्या मनावर उल्हासवृत्तीचें इतकें वर्चस्व होतें कीं, त्या भरांत आपण कोणीकडे जात आहों, याचें त्या मनुष्यास भानही राहत नाहीं. परंतु पुराणप्रियता भरतवासीयांच्या हाडींमासीं जन्मतःच खिळून राहिलेली आहे. तेव्हां थोड्याशा उत्तेजनपर व आशाजनक उपदेशाची जोड दिल्याशिवाय अशा प्रकारचे केवळ शुष्क इशारे मुळींच उपयोगी नाहींत, असें माझें मत आहे. असल्या " नव्या कल्पनांनीं " व " नव्या तत्त्वांनीं " " समाजाचा समतोलपणा " ( Social equilibrium ) बिघडेल अशी भीति रावसाहेबांना वाटावी, हें साहाजिक आहे. **प्लेटो, आरिस्टाटल**सारखे शहाणे व बुद्धिवान् तत्ववेत्ते देखील राजकीय व सामाजिक स्थित्यंतरें घडवून कशीं आणावीं याबद्दल स्वतः विवेचन करीत असतां " काय केलें असतां क्रांति टळून समाजांत समतोलपणा राहील " असल्या प्रश्नां-मध्यें गुंतून राहिले होते. **प्लेटो, आरिस्टाटल** याप्रमाणें साशंक व भयत्रस्त असतां त्यांच्या मागाहून कित्येक शतकांवर जन्मास आलेल्या यःकश्चित् " कुणबट **ग्यालिलियो** "नें शिक्षणाचा गंघही नसतां आणि तत्त्वज्ञान बेताचेंच असतां समाजसुधारणेचा बिकट प्रश्न विशेष धैर्यानें हातीं घेतला व त्यांत त्याला यश आलें. मनुष्यत्व प्राप्त करून देणारीं आधुनिक संस्कृतीचीं जीं तत्त्वें आप-णास आज दिसत आहेत, तीं त्याच्याच प्रयत्नाचीं फलें होत. " स्थानभ्रष्ट होऊं नका," "पुरातन परंपरा एकाएकीं सोडूं नका," " सावकाश सावधगिरीनें एक एक पाऊल पुढें टाका," अशा तऱ्हेचीं सांप्रदायिक वाक्यें दिसण्यांत ठीक दिसतात. हा उपदेश फारच शहाणपणाचा आहे, असें सकृद्दर्शनीं कोणालाही वाटेल. परंतु निदान आपल्या हिंदी लोकांची गोष्ट पाहिली तर गत गोष्टींचा आपल्या मनावर इतका पगडा असतो, गत गोष्टींबद्दल आपल्या

मनास स्वभावतःच एवढें प्रेम असतें. बहुजनसमूह इतका सुस्त व बेफिकीर असतो कीं, कोणीही सुधारकानें बेधडक पुढें सरसावून सर्व समाज हालवून सोडावा असें होण्याची इकडे धास्ती करावयास नकोच. या दृष्टीनें पाहिलें तर वर वर्णन केल्याच्या अगदीं उलट असा उपदेश कोणी करील तर तो आज आपल्यास हवा आहे. तशा उपदेशानें आपल्या कार्यास फायदाच होईल. ज्या ठिकाणीं लोकभ्रमाचे व अज्ञानमूलक समजुतींचे पर्वतांचे पर्वत उलथे पालथे करावयाचे आहेत त्या ठिकाणीं अशाच प्रकारच्या उपदेशांची वाण आहे. ज्याचें खऱ्या सुधारणांवर प्रेम आहे व त्यांच्या प्रीत्यर्थ जो आपलें आयुष्य वेंचतो, त्याच्या हातूनच सुधारणेचा गाडा पुढें ढकलला जातो. बहुजनसमाज आणि शास्त्री यांच्यामध्यें जागृति झालि ह्मणजे समाजाची प्रगति होईल, व्यक्तींनीं प्रत्यक्ष उदाहरण घालून देण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, अशा प्रकारचे विचार गवताच्या विच्छिन्न काडीप्रमाणें निरुपयोगी आहेत. सकृद्दर्शनीं असे विचार शहाणपणाचे दिसले तरी, त्यांमध्यें धोकाच आहे. ज्यांनीं ज्यांनीं समाजामध्यें क्रांत्या घडवून आणिल्या, अशा आपल्या देशांतील किंवा इतर कोणत्याही देशांतील व कोणत्याही काळांतील शहाण्या व धोरणी समाजधुरीणांचें मत जर असेंच होतें, तर तें प्रस्तुत प्रसंगींही कां लागू नसावें? अशा प्रकारच्या पुरुषांनीं, शास्त्र्यांनीं आणि धर्मगुरूंनीं आपला मार्ग निष्कंटक करीपर्यंत कधीं वाट पाहिली काय? घातक किंवा अहितकारी आणि अनवश्यक अशा पुरातन वहिवाट झुगारून देण्याविषयीं आपण बोलत असतांना ज्या विचारांनीं आपलें मन भीतिग्रस्त होतें, तसल्या विचारांना त्यांनीं कधीं तरी थारा दिला काय? पूर्वसंस्कारांचें वर्चस्व प्रस्तुत काळामध्यें फार आहे. कांहींहि झालें तरी, भूतकाळाचें प्राबल्य आपल्यांतून कमी होणारें नाहीं. आपल्यास जी वाण आहे, ती प्रस्तुत-

कालच्या वस्तुस्थितीस व्यवस्थित रूप देणाऱ्या शक्तीची आणि या शक्तीचा उद्भव अंतर्भूत सुधारणा ( Reform from within ) पासून आहे. व आपोआप अनुकूल अशी संधि मिळाली ह्मणजे आपण समाजोद्धाराच्या कार्यास हात घालूं, अशा कल्पनांनीं जोंपर्यंत सूज्ञ व सुशिक्षित स्त्रीपुरुष स्वस्थ बसून राहतील, तोंपर्यंत ही "अंतर्भूत सुधारणा" होणें शक्य नाहीं. सुधारणेच्या कामीं पुढाकार घेणारांचा छळ हा होणारच; व अशा पुढाऱ्यांनीं तो सोसण्यास तयार असलें पाहिजे. जॉन स्टुअर्ट मिल्ल यांनीं म्हटलेंच आहे कीं, ज्या कालीं लोकांमध्यें अर्ध्या कच्च्या समजुती व विनयाच्छादित दंभ यांचें प्राबल्य आहे, त्या कालापेक्षां छळ आणि हालअपेष्टा यांचा काल कोणत्याही हितकर पण अप्रिय अशा तत्त्वांच्या वाढीस प्रतिकूल असतो. या दृष्टीनें पहातां रा० सा० मंडलीक यांचेसारख्या प्रतिपक्षाच्या योगानें समाजसुधारणेच्या कार्याची पिच्छेहाट होण्याच्या ऐवजीं त्याची प्रगतींच झाली पाहिजे व होतेही. रावसाहेबांप्रमाणें त्यांच्या अनुयायांच्या ठिकाणींही जर खरा भाव असेल, व त्यांच्याप्रमाणेंच ' अंतर्भूत सुधारणा " च्या कल्पनांनीं जर त्यांचें मन व्यग्र होत असेल तर मी अशा प्रतिपक्षीयांशीं कधींही तुटातूट करून घेणार नाहीं. कारण अशा प्रकारचे प्रतिस्पर्धी एका अर्थी आपले गुरूच होत. ते खरोखरच आपल्यांत प्रेरणा उत्पन्न करीत असतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

## आर्य ( हिंदु ) संस्कृतीचें रहस्य.

या देशामध्यें धर्म जीवंत, जागृत स्थितींत कितपत आहे, हा प्रश्न वारंवार आपणांपुढें येतो. आणि ह्या प्रश्नाचें महत्त्वच मुळीं इतकें आहे कीं, त्याचें उत्तर देणें भाग आहे; कारण मला वाटतें कीं, हा देश धर्माचें आगर आहे, व सर्व सुधारलेल्या लोकांनीं घेण्यासारखें आध्यात्मिक ज्ञानाचें बीं या देशामध्यें रुजलें आहे, याविषयीं सुधारलेल्या पौर्वात्यांचा किंवा पाश्चात्यांचा क्वचित्च मतभेद होईल. गर्वानें धुंद होऊन पोकळ किंवा टाकाऊ देशाभिमानानें प्रेरित होऊन मी या गोष्टीचा उल्लेख करितों, असें नव्हे, तर सर्व जगाला असा अनुभव आला आहे कीं, या देशातील लोकांच्या आध्यात्मिक जीवनाचा आस्थेनें विचार करितां जे कांहीं शोध लागले आहेत, ज्या पुष्कळ दंतकथा उपलब्ध झाल्या आहेत, त्यांचा योग्य रीतीनें उपयोग झाल्यास सुधारलेल्या राष्ट्रांचेंही हित झाल्याशिवाय राहणार नाहीं. काल मद्रासमधील एका दैनिक पत्रामध्यें एका इंग्रजबाईनें प्रसिद्ध केलेलें मी एक पत्र वाचीत होतों. मला वाटतें त्या पत्रावरून आपणांस कित्येक गोष्टी सुचण्यासारख्या आहेत. 'आपल्या देशांतील स्त्रियांची उपजत बुद्धि' या विषयावर कांहीं आठवड्यापूर्वी मद्रासमध्यें जो पत्रव्यवहार झाला होता, त्यास उद्देशून हें पत्र लिहिलें आहे. हें उघडच दिसतें कीं, त्या विषयाचा लेखक एक हिंदु गृहस्थ आहे. हिंदुस्त्रियांना कोणत्याही प्रकारचें शिक्षण नको आहे, कारण त्या उपजत सुशिक्षित असतात, व आधुनिक शिक्षण न मिळतांही त्यांच्यामध्यें विचार करण्याचें व आपलीं कामें व्यवस्थित रीतीनें करण्याचें सामर्थ्य आहे, व त्या जात्याच फार शहाण्या असतात, हें दाखविण्याचा त्याचा उद्देश होता. त्या गृह-

त्याच्या विचारांत कांहींच सत्यांश नाहीं असें नाहीं, आणि उपरिनिर्दिष्ट इंग्रजबाईनें त्या गृहस्थाच्याच मताचें पुष्टीकरण केलें आहे. ती आपल्या पत्रांत म्हणते कीं, मी हिंदुस्थानांत असतांना माझा पुष्कळ हिंदुस्त्रियांबरोबर परिचय झाला, त्या वेळीं त्यांना लिहितां, वाचतां किंवा हिशेब करतांही येत नसून पाश्चात्त्य स्त्रियांपेक्षांही त्यांचे विचार करण्याचें सामर्थ्य अप्रतिम आहे, याचें मला आश्चर्य वाटे. आपल्या इकडील संस्कृतीचा तिला जो अनुभव आला, त्यामुळें तिचें मत—नव्हे प्रामाणिकपणाची समजूत झाली कीं, खरी संस्कृती म्हणजे शांति व विश्रांति ही आहे व त्याचें मूळ हिंदुस्थानांत दृष्टीस पडतें. बाकीची सर्व सुधारणा म्हणजे नुसतें स्थित्यंतर होय. तिनें पुष्कळ उदाहरणें देऊन ही गोष्ट अशा उत्तम रीतीनें सिद्ध केली आहे कीं, आपणा सर्वांना तिचें म्हणणें खास पटेल. आतां बायसिकल निघाल्या आहेत, मोटारगाड्या व दुसरीं अनेक प्रकारचीं अति वेगानें चालणारीं वाहनें उत्पन्न झालीं आहेत. कोणत्याही स्थळीं त्वरित जातां यावें असें आपणांस वाटतें, कालची बातमी आज मिळावी, आजची बातमी ताबडतोब कळावी, अशी सर्वत्र इच्छा आहे, आणि या सर्वांचा असा परिणाम झाला आहे कीं, मनुष्याची नेहमीं धांदल व गडबड चालू आहे. आज शिकलेल्या गोष्टी उद्यां विसरल्या जात आहेत; व दुसऱ्याच मनास चेतविणाऱ्या गोष्टी पुढें येऊन उभ्या राहत आहेत. तुम्ही जर शांतपणानें आपलें आयुष्य घालविण्यास शिकलां नाहीं तर वावटळीमध्यें सांपडलेल्या किड्यांची ज्याप्रमाणें त्रेधा उडून जाते, त्याप्रमाणें या जगामध्यें तुमची तिरपिट उडून जाण्याचा संभव आहे. त्या बाईचें म्हणणें असें आहे कीं, संस्कृतीचें खरें रहस्य हिंदु मनुष्यास समजतें. असो अशा प्रकारचे विचार सर्वपरीं सत्य आहेत, असें कोणी म्हटलें कीं, आपल्या भोंवतीं जें देशाभिमानाचें वारें खेळत

असतें, त्यायोगें आम्ही पाश्चात्यापेक्षां फार वरच्या दर्जाचे आहों, असा पोकळ दंभ मात्र उत्पन्न होतो. म्हणून ह्या वेळीं आपणास जो सामाजिक प्रश्न सुचतो, तो असा कीं, आपल्या आर्यसंस्कृतीचें रहस्य तरी काय आहे? प्रवृत्ति कीं निवृत्ति? खऱ्या सुधारणेच्या प्रगतीचें रहस्य निवृत्तिपर आहे, यांत कांहीं संशय नाहीं. आपण जन्मतों तेव्हां आपल्या ठिकाणीं पशुवृत्तीचें प्राबल्य असतें. आणि पुढें ह्या पशुवृत्तीला आपण जिंकावें, अशीच परमेश्वराची इच्छा आहे.

आपल्या ऋषींनीं सुधारणेचें जें रहस्य स्वतःपुढें ठेविलें होतें, तें मनुष्यांमधील पशुवृत्तीला आळा घालावयाचा हें होय. आपल्या प्राचीन ऋषींनीं त्याचप्रमाणें येशू ख्रिस्त व महंमद यांनींही ही गोष्ट आपणांस शिकविली आहे. सुधारणेचें हें तत्व खरोखर चांगलें होतें. परंतु मनुष्यामधील सर्व उच्छृंखलवृत्ति काढून टाकीत असतांना चूक जी झाली, ती ही होय कीं, आमच्या रुढीमुळें आपल्या आंगचा आत्मनिश्चय व आपलें नीतिधैर्य नाहींसें झालें आहे. कारण आपल्या आंगीं निश्चय असल्याशिवाय किंवा आपण आपल्या मतांना चिकटून राहिल्याशिवाय आपल्या हातून कांहींही होणें शक्य नाहीं. प्रेमाचीच गोष्ट घ्या. प्रेम म्हणजे काय? तें निःसीम असलें पाहिजे, नाहीं तर तें मुळीं प्रेमच नव्हे. जर तुमचें प्रेम मनापासूनचें किंवा दृढ नसेल तर त्याला प्रेम ही संज्ञाच शोभत नाहीं. परंतु प्रेम जर निःसीम असेल तर त्याच्या पाठीमागें निश्चय, धैर्य, व स्वार्थत्यागही असतात. मोझेसचें चारित्र पहा. तो लीन होता, असें बायबलमध्यें म्हटलें आहे. लीनता म्हणजे काय? हें तुम्हांला माहीत आहे. लीनता म्हणजे स्वस्थ बसणें नव्हे. त्याचा अर्थ असा आहे कीं, तुमचा स्वभाव मूळचा आध्यात्मिक असतां तुम्ही स्वतःस शिस्त लावल्यामुळें केव्हां रागवावें व केव्हां रागवूं नये हें तुम्हांस चांगले कळूं लागलें आहे. मागचा पुढचा विचार न करितां जर रागाचा

उपयोग केला तर तो दुर्गुण होतो. परंतु दुसऱ्याचें दुःख व छळ नाहींसे करण्याचे कामीं किंवा स्वैर वर्तन सुधारणेच्या कामीं त्याचा उपयोग केला तर तो सद्गुण होतो. परंतु या सर्वांस आत्मनिश्चय पाहिजे आहे. या आत्मनिश्चयाच्याच बाबतींत सुधारणेमध्यें चूक झालेली आहे. आमचें शौर्य, परिस्थितीशीं झुंजून मार्ग काढण्याची संवय जाऊन सन्यासवृत्ति आह्मांस प्राप्त झाली आहे, आणि आपण नेभळे झाल्यामुळें आह्मां हिंदु लोकांना लीन ह्मणण्या ऐवजीं मवाळ, गबाळ हिंदु असें ह्मणण्यांत येतें. आतां आपल्या ध्येयाकडे पहा! ज्याला मूर्तीची पूजा करूं नये, असें वाटतें, अशा **वीरेशलिंगम् पंतलू** सारख्या आपल्या समजाप्रमाणें वागण्याचें धैर्य असलेल्या मनुष्याचें उदाहरण घ्या. त्यांचीं मतें तुह्मांस आवडोत किंवा न आवडोत, परंतु त्यांच्या-सारख्या मनुष्यावर कोणत्या प्रकारची टीका होत असते! जे लोक स्वार्थत्यागाविषयीं बडबड करितात व भित्रेपणा कामाचा नाहीं, असें ह्मणतात, ते ही गोष्ट विसरतात कीं, एकाद्या मनुष्याचें मत चुकीचें असो किंवा बरोबर असो, त्याच्यामध्यें जोंपर्यंत सद्सद्वि-वेकबुद्धीच्या कासेस लागून वागण्याचें बीज आहे, तोंपर्यंत तो मनुष्य राष्ट्रांची संपत्तिच आहे. **वीरेशलिंगम् पंतलू** यांच्याविषयीं आपणांस फारसी माहिती नाहीं, कारण सध्यांच्या काळीं ते कांहीं लोकप्रिय नाहींत. त्यांनीं व त्यांच्या पत्नीनें पैशाचा मोठा संचय केलेला नाहीं. परंतु जी काय थोडीशी पुंजी त्यांच्याजवळ होती ती त्यांनीं गरीब बापड्या विधवांच्या दुःखविमोचनार्थ अर्पण केली आहे. त्यांनीं संस्कृतभाषेस उज्ज्वल स्वरूप आणिलें आहे व त्यांचें आचरण शुद्ध असून ते मोठे धीट, नम्र व लीन असून त्यांचा स्वभाव मोठा करारी आहे अशी त्यांची ख्याति आहे. त्यांचे जसे विचार आहेत, त्याप्रमाणें ते बोलतात, आणि ते जसें बोलतात तसेंच आचरण ठेवितात. असें असतांही

त्यांच्यावर टीकेचा कसा वर्षाव होतो, तो पहा. त्यांनीं सामाजि सुधारणेच्या वाटेमध्यें अडथळाच आणला आहे, असे त्यांचे टीकाक म्हणत आहेत! वारा कोणत्या दिशेनें वाहत आहे, हें दाखविण्य चर सांगितलेलें एकच उदाहरण बस्स आहे. आपण कोणीकड कोणीकडेच वहात चाललों आहों. आपण कांहींच्या कांहींच बह सुटलों आहों. स्वार्थत्यागाच्या आपण गप्पा मारतों, पण त्याकरि झीज सोसण्यास आपणापैकीं कितीजण तयार आहेत! सत्य बोल सत्य आचरणें व सत्याकारितांच जगणें या गोष्टींची आपणांपै किती जणांना चाड आहे! आणि कोणी स्वार्थत्याग केला, का सत्यरक्षणासाठीं आपली हानि सहन केली, तर हें सर्व त्य आत्महितासाठींच केलें, असें म्हणावयास आम्ही तयार असतों मागें मी कांहीं शहरांतून फिरत असतांना कित्येक जणां मला बोलून दाखविलें कीं, सध्यां कृति करून दाखविण्यापे अघळपघळ वाचाळता करणारांचाच सुळसुळाट झाला आहे. प मला एवढें कळून चुकलें आहे कीं, जो मनुष्य प्रत्यक्ष कृति करू दाखवितो, तो दुसऱ्यांविषयी बिलकूल कुरकुर करित नाहीं, पर ज्या मनुष्याच्या हातून कांहींच कृति होत नाहीं, तो मात्र दुस लोक अमकें करीत नाहींत, तमकें करीत नाहींत, अशाविष तक्रार करितो, पण स्वतः अगदीं कोरा असतो. वीरेशलिंग पंतलूनीं अशा प्रकारचे दुःखोद्गार कधींही काढले नाहींत. त्यां कधीं नक्राश्रू ढाळले नाहींत. साधुपुरुषाला ज्याप्रमाणें दुर्व्यसन लोकांचे कांहीं दुर्गुण अवगत असतात, त्याप्रमाणें कृति करू दाखविणाऱ्या मनुष्याला दुसऱ्याचा कमकुवतपणा माहित असते देशाची प्रगति व सुधारणा व्हावयास प्रथम स्वतःची सुधारण केली पाहिजे, हें त्याला कळून चुकलेलें असतें. तुम्ही आपल स्वतःची सुधारणा करा, म्हणजे देशाचीही आपोआप होत आहे

असें तुमच्या नजरेस येईल. शांत, स्थिर, पण करारी निश्चयामुळें जी लीनता अंगीं बाणते, तशा प्रकारची लीनता अंगीं बाणल्याशिवाय कोणतीही गोष्ट करणें अशक्य आहे, हें आपणांस जसें कळावें, तसें कळलेलें अजून दिसत नाहीं. **मॅसिन्**चें असें म्हणणें आहे कीं, स्वतःचा कोणी अपराध केला तर स्वस्थ बसणें चांगलें, पण जर का दुसऱ्याला कोणी वाईट रीतीनें वागविलें, तर स्वस्थ बसणें हें पाप आहे. जेव्हां जेव्हां म्हणून दुसऱ्याचा छळ होईल, तेव्हां तेव्हां त्याची कड घेऊन भांडणें व त्याचें दुःख जितकें हलकें करितां येईल तितकें करणें, हें तुमचें कर्तव्य आहे. या जगामध्यें एकमेकांकरितांच आपलें जीवित आहे, परंतु आमच्या सुधारणेचा भलताच विपर्यास होऊन लीनतेचा अर्थ मवाळपणा असा झाला आहे. एखादें काम तुम्ही हातीं घेतां, पण थोडया दिवसांमध्यें त्याच्या प्रगतीचीं चिन्हें दिसूं लागलीं नाहींत, तर तें कुचकामाचें आहे, असें तुम्ही ठरवितां. शिक्षण या शब्दाची व्याख्या काय म्हणून मला कोणी प्रश्न केला तर त्याचें उत्तर मी खालील प्रमाणें देईन. देशकल्याणाकरितां मीं काय काय झीज सोसली, व वाटेमध्यें ज्या ज्या अडचणी आल्या, त्यांतून कशा रीतीनें निभावलों, अशा प्रकारचा प्रश्न जो कोणी स्वतःस करील, त्याच्याच मनावर विद्येचा संस्कार झाला म्हणावयाचा. आपण स्वतःस अशा प्रकारचें वळण लावावयास पाहिजे कीं, प्रत्येक दिवशीं आपण दुसऱ्याकरितां कांहीं ना कांहीं तरी झीज सोसावी. हिंदुलोकांविषयीं असें म्हणतानां मीं ऐकलें आहे कीं, हिंदुलोकांमध्यें कोणत्याही गोष्टीला बराच वेळ चिकटून रहाण्याइतका कणखरपणा नसतो. एकाद्या गोष्टीपासून कांहीं निष्पन्न होत नाहीं, हें थोड्याच दिवसांत दिसून आल्यास ते ती गोष्ट सोडून देतात; परंतु विशेषतः तरुण मित्रहो, प्रत्येक दिवशीं दुसऱ्याकरितां कोणती ना कोणती

तरी स्वतःची गैरसोय सोसण्यास तुम्ही शिका, अशी मी तुम्हास विनंति करितों. तुमचें जें ध्येय, तें फक्त तुमच्या ऐहिकाकरितांच असेल, व एकाच दिवसाकरितां तुम्हीं उद्योग केलात तर तुमच्या विद्येचा कांहींही फायदा होणार नाहीं. मनुष्य हा एकंदरींत देहधारी ईश्वरी अंश आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवा. या शरीरामध्यें ईश्वराचें वास्तव्य आहे, म्हणून हें शरीर इतकें बहुमोल मानिलें जात आहे, याकरितां तुम्ही कोणताही उद्योग करीत असतांना ईश्वराच्या प्रेमास प्राधान्य देऊन वागत चला. सकाळच्या प्रहरीं प्रार्थनेची संवय करणें, ही फार चांगली गोष्ट आहे; कारण त्यायोगें दिवसास काय काय गोष्टी करण्याचा आपला निश्चय आहे, हें प्रार्थनेमुळें आपणास कळून येते. दहा मिनिटें कां होईना सकाळीं प्रार्थना केल्यानंतर ज्या कामास आपण प्रारंभ करतों, तें काम आपल्याकडून निश्चयानें होतें. कोणतेंही काम करितांना कोणत्याना कोणत्या तरी प्रकारची झीज हीं मी सोसीनच, अशा प्रकारचा तुमचा निश्चय असावयास पाहिजे. अशा रीतीनें सुरवात करा, ह्मणजे मग कोणतीही आडचण सोसण्याचें व त्या अडचणीशीं दोन हात करण्याचें तुमच्यामध्यें सामर्थ्य येईल. परंतु हें सर्व होण्यास धर्माची अत्यंत आवश्यकता आहे. धर्माच्या योगें मनुष्यामध्यें आनंदजनक व आशाजनक वृत्ति उदित होते. अशा प्रकारच्या वृत्तीशिवाय कोणत्याही कामास यश येणार नाहीं. आपली उत्तरोत्तर उन्नतावस्था कशी होईल, व सत्य, व प्रेम यांविषयीं आवड आधिकाधिक कशी होईल, हें शिकविणारें जें तत्वज्ञान, त्याची आह्मांमध्यें आज फार उणीव आहे. याकरितां नामदेवांनीं ह्मटल्याप्रमाणें ईश्वराचें नामस्मरण करण्याची आवश्यकता आहे. परंतु ईश्वरास अंतःकरणांत सांठविल्याशिवाय नुसत्या तोंडावाटे ईश्वराचें नांव घेतल्यानें कांहींही उपयोग नाहीं. ही गोष्ट घडून

येण्यास भक्तीचा तिसरा व चौथा प्रकार नामस्मरण व पाद-सेवन यांस साधूंच्या संगतीची जोड मिळून तशा प्रकारच्या संवयी लागावयास पाहिजेत. नामस्मरण व पादसेवन यायोगें आपण ईश्वराचे दास आहों, हें आपणांस चांगलें समजतें. ईश्वराचें नाम-स्मरण कोणत्या रीतीनें करावें, हें समजण्याकरितां संतांचा समागम करून घेतला पाहिजे. कोणी अशी शंका घेतील कीं, आमच्या-समोर जिवंत साधू असल्यावांचून त्यांचा समागम आम्हांस कसा प्राप्त होणार. जिवंत साधु तुम्हांस दिसत नाहींत, याचें कारण त्यांना पाहण्यास ज्या प्रकारची दृष्टि लागते, त्या दृष्टीनें तुम्ही त्यांस पहात नाहीं. जो मनुष्य लबाड आहे, त्याला दुसऱ्याबद्दल नेहमीं वहीम येतो. साधूमधील कांहीं सद्गुण आपल्या अंगीं असतील तर आपणांला साधु सांपडल्यावांचून रहाणार नाहींत. जो स्वतः पवित्राचरणी आहे, तो कोठेंहि गेला, तरी त्याला सर्व स्वर्गलोकच वाटतो. ह्या गोष्टीची आपणांमध्यें वाण आहे.

प्रार्थनासमाज लोकांस प्रिय होत आहे कीं नाहीं, होत नसल्यास तो अप्रिय होण्याचीं काय कारणें आहेत, हा प्रश्न सध्यां उपस्थित झाला आहे. परंतु प्रथम मी आपणांस विचारतों कीं, तुमच्या तत्त्वां-प्रमाणें वागण्याचा तुमचा निश्चय आहे काय ? मला दुःखानें असें म्हणावें लागत आहे कीं, आपण या बाबतींत फार ढिले आहों, योग्य वेळीं प्रार्थनासमाज हा प्रिय होईलच; परंतु प्रार्थनासमाज असो, किंवा कोणताही समाज असो, त्याच्या पाठीमागें **वीरेशलिंगम् पंतलू** सारख्या वीरपुरुषाचे ठिकाणीं अलौकिक रीतीनें दिसून येणारा स्वार्थत्याग नसेल तर तो समाज डबघाईस आल्याशिवाय राहणार नाहीं, असें मला वाटतें. या-करितां विशेषतः, तरुण लोक हो, तुमच्यांमध्यें धैर्य प्राप्त होईल व तुम्हांस निश्चय करतां येईल अशा प्रकारची संवय लावून

घ्या. ईश्वरावर दृढभाव ठेवून तुमच्या आस्थेवाईकपणाची व धैर्याची वाढ झाली, व त्यायोगें तुम्ही आहां त्याच स्थितींत असणें हें तुमचें कर्तव्य आहे असें तुम्हांस वाटलें तर माझी पक्की खातरी आहे कीं, काळोखामध्यें सुद्धां तुम्हांस उजेड मिळेल. सध्यांच्या पिढीचे कांहींही दोष असोत, परंतु पुढें जी पिढी भविष्यकाळची होणार आहे, त्या तरुण पिढीमध्यें बोलल्याप्रमाणें कृति करणें या विचाराचा पगडा बसत चाललेला आहे, हें पाहून मला आनंद वाटतो; जो मनुष्य बोलतो एक व करतो भलतेंच, अशा मनुष्याचा लोक तिरस्कार करतात. तरुण मित्रहो, तुमचा आचार व विचार शुद्ध ठेवा, म्हणजे तुमच्या मनास स्वास्थ्य मिळून तुमचा अंतर्बाह्य आयुष्यक्रम यांमध्यें मेळ राहील; तुमची सदा आनंदमयवृत्ति होईल. जगण्यामध्यें जन्माचें सार्थक आहे, असें तुम्हांस वाटेल. तुमच्या आयुष्याचें ध्येय दुसऱ्यावर प्रेम करणें, व दुसऱ्याची सेवा करणें असें जेव्हां होईल, तेव्हां तुमच्या देशाविषयीं तुह्मी एकटेच नव्हे तर दुसरेहि मोठ्या आदरानें बोलूं लागतील. ज्या दैवी-वृत्तीमुळें अंगीं आस्थेवाईकपणा येतो, जिच्यामुळें कोणत्याही प्रकारची मनास उदासीनता न भासता शांति मिळते, व सत्त्वगुणावर विरचित असा लीनपणा अंगीं येतो, अशा प्रकारची वृत्ति प्राप्त करून घेऊन तुह्मी बोलतां तसें करा व करतां तसें बोला. त्या शिवाय बाकी सर्व तकलादी होय. आपली जशी आस्था असेल त्या आस्थेवरून आपली प्रगति, मोठे होण्याचा आपला हक्क किंवा दुसऱ्या प्रत्येक गोष्टीविषयींचा आपला हक्क ठरविला जातो. लोके असें ह्मणतो कीं, देशांतील पुढारी कसे आहेत, ते कोण आहेत, त्यांची नुसती चर्पटपंजरी सुरू आहे किंवा बोलल्याप्रमाणें करून दाखविणारे ते लोक आहेत किंवा नाहींत, लोकप्रिय होण्याची त्यांना हांव आहे, किंवा ईश्वराची आपणांवर सदां नजर आहे असें

समजून ' मी माझ्या स्वतःशीं व माझ्या ईश्वराशीं इमानानें वागलों,' असें ह्मणण्यास तयार आहेत, या गोष्टींवर देशाच्या मोठेपणाची खरी कसोटी अवलंबून आहे आणि तें अगदीं खरें आहे असा आपलाही अनुभव आहे.

---

## सावधगिरी आणि दूरदर्शित्व.

या समाजाच्या वार्षिकोत्सवानिमित्त दोन सुंदर व्याख्यानें नुकतींच झालीं. ब्राह्मधर्मप्रचारक ब्रह्मानंद केशव चंद्रसेन व आर्यसमाजाचे जनक दयानंद सरस्वती ह्यांच्या चरित्रांतील विशेष गोष्टी आपणांस व्याख्यात्यांनीं सांगितल्या. तीं व्याख्यानें चालू असतांना माझ्या मनामध्यें जे विचार चालले होते, ते त्या वेळीं सांगण्यास मला सवड नव्हती. रा० एच्. नारायणराव यांनीं केशवनें सन १८६४ मध्यें या शहरास भेट दिली, त्याकडे आपलें लक्ष वेधिलें. केशवची ती येथें येण्याची पहिली खेप होय. आपल्या-लोकांच्या धार्मिक स्थितीचें पुनरुज्जीवन करण्याच्या प्रश्नाकडे त्यानें आमच्यामध्यें जागृति उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या वेळीं त्यांच्या भाषणाचा येथील लोकांवर कांहींसुद्धां परिणाम न होतां त्याला निराशा होऊन कलकत्यास परत जावें लागलें. सन १८६७ त पुन्हां तो येथें आला, तेव्हां त्याच्या भाषणामुळें कांहीं थोडया लोकांमध्यें जागृति होऊन व त्यानें प्रतिपादन केलेल्या एकेश्वरी धर्माचें बीं कांहींच्या अंतःकरणामध्यें रुजून त्यांनीं प्रार्थनासमाज स्थापन केला. इंग्लंडाहून परत आल्यावर केशवचंद्र सेन यांनीं पुनः एकदां या शहरास भेट दिली. ज्यांनीं त्यांचें चरित्र वाचलें आहे, त्यांना ही गोष्ट माहित आहे कीं, ते **लॉर्ड लॉरेन्स** व **लॉर्ड मेयो** यांचे मोठे मित्र होते.

लॉर्ड लॉरेन्स फार धार्मिक व आस्थेवाईक ख्रिस्ती गृहस्थ होते व त्यामुळें केशवच्या उपदेशाचा त्यांच्या मनावर फार परिणाम होऊन ते आस्थेनें त्यांचे उपदेश वाचूं लागले. येथील कारकीर्द संपवून ते इंग्लंडला परत गेल्यावर इंग्लंडमध्यें येण्यास त्यांनीं केशवला लिहिलें. त्याप्रमाणें १८७० मध्यें केशव विलायतेस गेले. मोठ्या प्रेमानें व अंतःकरण-पूर्वक तेथील लोकांनीं त्यांचा आदरसत्कार केला व त्यांचें भाषण ऐकण्याकरितां लोकांचे थवेच्या थवे जमा झाले. लॉर्ड लॉरेन्स यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या एका सभेमध्यें केशवचंद्र सेन यांनीं मोठे जोराचें व वक्तृत्वपूर्ण भाषण करून इंग्लंड व हिंदुस्थान यांचें परस्पर बहिणींचें नातें आहे, पण हें नातें बरेच दिवस तुटल्यासारखें झालें होतें, पण ईश्वरी योजनेनें तें परत जडलें आहे; असें सांगून इंग्लंडच्या तोंडून पुढील शब्द निघत आहेत, असें दाखविलें. ते शब्द ( Arise, arise, thou hast slept too long ) हे होत. वक्त्याच्या तोंडून हे शब्द जेव्हां बाहेर पडले, तेव्हां श्रोतृवृंदापैकीं प्रत्येकाच्या अंतःकरणास ते झोंबून त्यांनीं टाळ्यांच्या इतका मोठा गजर केला कीं, त्यांस कांहीं वेळ आपलें भाषण थांबवावें लागलें. सध्यांच्या काळीं केशवसारखें वक्तृत्व आपणांस ऐकावयास सांपडत नाहीं. त्यांच्या नुसत्या चेहऱ्यावरूनच असें वाटेल कीं, त्यांच्या अंतःकरणामध्यें आस्था, कळकळ व उत्कंठा लागून राहिलेली होती; ती इतकी कीं, त्यांच्या शत्रूला देखील ती गोष्ट नाकारतां येणें शक्य नव्हतें. या सर्वांपेक्षां केशवमध्यें विशेष जें होतें, तें हें कीं, जसजसें त्यांचें वयमान वाढूं लागलें, तसतसा त्यांचा ईश्वरावरील विश्वासही वाढूं लागला. त्यांचे ठिकाणीं बलवत्तर भाव वसत होता, हें त्यांच्या मित्रांनीं व शत्रूंनीं देखील कबूल केलें आहे. **राममोहन** हा समाजाचा उत्पादक होय, **देवेंद्रनाथ टागोर**, जे अद्याप जिवंत आहेत ( ज्या वेळीं हें व्याख्यान झालें त्या वेळीं महर्षि

जीवमान् होते.) ते समाजांतील योगी होत, पण **केशव चंद्रसेन** जे प्रथम सुधारणेच्या मार्गे लागले होते, त्यांचें पर्यवसान भक्तींत झालें, म्हणून **समाजांतील थोर भक्त** म्हणून ते ओळखले जात आहेत. त्यांच्या चेहऱ्याकडे पहातां क्षणींच त्यांच्या रोमरोमांत दैवी तेज आहे, असें वाटल्यावांचून राहिलें नसतें. सन १८७९ मध्यें कलकत्ता येथीलें टाउन हॉलमध्यें त्यांनीं एक भाषण केलें, त्या वेळीं **लॉर्ड लिटन** हे एक श्रोतृवृंदांपैकीं होते. व्याख्यान संपल्यानंतर व्याख्यात्यांच्या आस्थेवाईकपणाविषयीं व कळकळीविषयीं आपली पसंति दाखविल्यावांचून लॉर्ड लिटन हे राहिले नाहींत. केशवच्या मुंबई शहरीं झालेल्या 'Religion' या व्याख्यानाविषयीं बोलतांना आपल्या निबंधामध्यें एच्. नारायणराव यांनीं विशेषेंकरून या गोष्टीवर जोर दिला कीं, केशवचें व्याख्यान ऐकावयास लोकांच्या झुंडींच्या झुंडी आल्या होत्या, त्या वेळीं प. वा. **डा० भाऊ दाजी** हे अध्यक्ष होते; त्या वेळीं डा. भाऊ दाजी हे फार लोकप्रिय होते व त्यांच्या वेळचे पुष्कळ गृहस्थ त्यांच्यावर प्रेम करीत असत. व्याख्यान संपल्यावर प्रेक्षकांचा उत्साह कळसास जाऊन पोहोंचला. अध्यक्ष या नात्यानें भाऊ दाजी जेव्हां भाषण करावयास उठले, तेव्हां प्रेक्षकांना वाटलें कीं शहाणपणाचे दोन शब्द बोलून ते व्याख्यात्यांस उत्तेजनच देतील. परंतु तशी कांहीं गोष्ट न होतां त्यांनीं त्यांच्या उत्साहावर विरजण पाडलें! ते म्हणाले, 'मीं या प्रश्नाचा फार लक्षपूर्वक विचार केला आहे, त्यावरून माझी अशी समजूत झाली आहे कीं, सुधारणेच्या बाबतींत कोणीही फार सावधगिरीनें व धोरणानें वागलें पाहिजे.

मागें व सध्यांही या सावधगिरीविषयीं व या धोरणाविषयीं पुष्कळ बोलणें होऊन त्याचा आतां आम्हांस वीट आला आहे. ज्यांनीं या शब्दांवर आजपर्यंत भिस्त ठेवून त्याप्रमाणें वागण्याचा

प्रयत्न केला आहे, त्यांनीं या शब्दांचा नुसता दुरुपयोग केला आहे व सुधारणेविषयीं नाउमेद उत्पन्न केली आहे, असें म्हटल्यावांचून मला रहावत नाहीं. १८६४ सालीं जेव्हां हे शब्द उच्चारले गेले, तेव्हां असें सांगण्यांत आलें कीं, सावधगिरी व धोरण यांचें अवलंबन केलें नाहीं, तर या संस्थेला पुष्कळ लोक येऊन मिळणार नाहींत, या संस्थेच्या स्थापकांचा हेतु सफल होणार नाहीं, फार तर थोडे सभासद या संस्थेमध्यें रहातील व या संस्थेची प्रगति होण्याचा फार कमी संभव आहे. त्या वेळेपासून आमची स्थिति कशी होत गेली आहे, हें आपण पाहूं या. वरील दोन शब्दांची अगदीं जरूर आहे असें आम्हांस शिकविल्यास आज बरींच वर्षें होऊन गेलीं. सुधारणेच्या बाबतींत ते शब्द कसे ढिले पडले आहेत, ही गोष्ट मागेंच आमच्या लक्षांत येऊन चुकली आहे. आमच्या लोकांच्या अंतःकरणाची मुक्तता होण्यास धोरण किंवा सावधगिरी यांची जरूर नाहीं, तर ज्यायोगें आध्यात्मिक बळ वाढत जातें, अशी अंतःकरणाची कळकळ, आस्था व उत्साह यांची जरूरी आहे. आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, राजा राममोहन रॉय यांचे ठिकाणीं आपल्या सदसद्विवेकबुद्धिविषयीं फार निष्ठा होती, म्हणून कोणीसुद्धां त्यांच्या मदतीस नसतांना जातिभेदा-विरुद्ध बोलण्याचें, एकेश्वरी धर्माचा आपल्या देशबांधवांस उपदेश करण्याचें, स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करून विधवांची स्थिति सुधारण्याचें, सतीची चाल बंद करून आपल्या निद्रित बांधवांच्या अंतःकरणांत जागृति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त झालें. धोरण व सावधगिरी यांस न जुमानतां धैर्यानें व मोठ्या नेटानें ह्या वाईट गोष्टींचा मोड करून लोकांस चांगली स्थिति प्राप्त व्हावी ह्मणून त्यांनीं खटपट केली, याचमुळें सध्यां आपणांस ही स्थिति प्राप्त झाली आहे. आज आमची जर कांहीं प्रगति होत असेल, तर तिचें श्रेय

राममोहनानें पुष्कळ वर्षांपूर्वीं नवीन सुधारणेचें जें तत्त्व प्रतिपादित केलें व स्वतः तें आचरणांत आणून दाखविलें, त्यास आहे व या समाजाशीं संलग्न असलेल्या ज्या संस्था त्या राममोहनाच्या उपदेशामुळेंच सजीव दिसत आहेत. या संस्थांमुळेंच आपल्या भ्रामक कल्पनांचें निर्मूलन होऊन आपलीं अंतःकरणें शुद्ध होणार आहेत व उपनिषद्-काळीं ईश्वराच्या पूजेचा जो प्रकार प्रचलित होता, त्याकडे आपलें लक्ष लागणार आहे. राजा राममोहनाप्रमाणेंच केशवनें देखील देशांत चळवळ उडवून दिली. अगदीं लहान असतां राममोहनास आढळून आलें कीं, आपले घरीं व आपल्या उपाध्यायाकडून आपणांस जें शिक्षण मिळत आहे, तें बरोबर नाहीं; ह्यामध्यें कोठेंतरी उणीव आहे व बिघाड झालेला आहे. ह्मणून सत्य शोधण्याचा त्यानें प्रयत्न केला. ज्या काळीं सुधारणा म्हणजे, लोकमत त्याच्या अगदीं विरुद्ध, अशी स्थिति होती, त्या वेळीं **लॉर्ड वुइलियम बेंटिक** यांचा अगदीं जवळचा सल्लामसलतगार म्हणजे राममोहन होता. त्या गव्हर्नर-जनरलच्या नांवाचा ज्या ज्या ह्मणून चांगल्या संस्थांशीं संबंध येतो, त्या त्या अस्तित्वांत आणण्यास मुख्यतः राममोहन कारण झाले. केशवांनीं आपले आईबाप, आपलें सर्व कुटुंब व आपली जात सोडून आपला सर्व संबंध ब्राह्मसमाजाशीं जोडला, तेव्हां त्याच्या मनामध्यें देखील राममोहनाप्रमाणेंच उत्साह परिपूर्ण भरलेला होता. त्यानें आपल्या नव्या धर्माच्या प्रसाराकरितां वर्तमानपत्रें काढिलीं; स्त्रियांना वरिष्ठ प्रकारचें शिक्षण देण्याकरितां शाळा स्थापन केल्या, व दुसऱ्या पुष्कळ रीतींनीं सुधारणेचा हेतु पुढें आणिला. जे लोक नुसता विचार करून राहत नाहींत तर कृति करून दाखवितात, अशाच लोकांच्या चरित्रांपासून प्रेरणा उत्पन्न होते, व उत्तेजन मिळतें. डॉक्टर भाऊ दाजी यांच्यासारखे जे लोक धोरण व सावधगिरी यांचीच माळ ओढीत बसतात, त्यांच्याकडून ही गोष्ट होणें शक्य

नाहीं; अशा प्रकारच्या लोकांमुळें सुधारणेच्या कामीं बराच अडथळा झाला आहे, ही गोष्ट कोणीही नाकबूल करणार नाहीं. मुलांना ज्याप्रमाणें काळोखांत जाण्याची व एखादा राक्षस खाऊन टाकील, याची भीति वाटते, त्याप्रमाणें हे शब्द म्हणजे एक प्रकारचा बागुलबुवा होऊन बसले आहेत, व त्यायोगें आमच्या उत्साहावर दडपण पडलें आहे.

१८६८ मध्यें केशव येथें येऊन गेल्यानंतर जी गोष्ट घडून आली, त्या गोष्टीची मला ह्या वेळीं आठवण होते. १८७० मध्यें प्रार्थनासमाजाच्या एका सभासदानें आपल्या कांहीं मित्रमंडळीस आपल्या येथें जेवावयास बोलाविलें. त्या मंडळीमध्यें ख्रिस्ती झालेला एक गृहस्थ होता. निराळ्या पंक्तीला त्या ख्रिस्ती मनुष्यानें बसावें असें त्या वेळीं ठरविलें. बाकीचे गृहस्थ व यजमान हे सोवळीं नेसून एका पंक्तीस बसले. खरें पाहिलें तर ही गोष्ट अगदीं क्षुल्लक आहे. परंतु तो काळ फार चळवळीचा होता. त्या वेळीं तटावर तट उपस्थित झाले होते, विधवाविवाहास मोकळीक देणारा एक तट, व त्याचा निषेध करणारा दुसरा. '**नेटिव्ह ओपिनियन**' या पत्रामध्यें जुन्या गोष्टींचा पुरस्कार होत असे, तर '**इंदुप्रकाश**' सुधारकांच्या बाजूचें समर्थन करीत असे. रानडे, वागळे, परमानंद, मोडक, हे गृहस्थ सुधारणेचे अग्रगणी होत. जोशी म्हणून कमिशनरच्या ऑफिसांत एक वरिष्ठ दर्जाचे अधिकारी होते, ते व रा. मंडलिक हे सुधारणेच्या विरुद्ध पक्षांचे पुढारी होते. वर सांगितलेल्या दोन्ही पत्रांतील लेख फार वाचनीय असत. एक पक्ष दुसऱ्या पक्षाचा बारीक सारीकही दोष हुडकून काढण्यांत नेहमीं तत्पर असे. वर सांगितलेलें जें जेवण, त्या वेळीं जे सुधारक जेवणाचे वेळीं हजर होते, त्यांच्यावर कोरडा उडविण्याची दुर्धारक लोकांनी ही संधि साधली, व त्यामुळें कित्येक जणांना ख्रिस्ती

मनुष्याबरोबर जेवल्यामुळें प्रायश्चित्तही घ्यावें लागलें. स्वाभाविकपणें या गोष्टीचा वचपा काढण्यास सुधारक लोक फार उत्सुक झाले. लवकरच अशी एक गोष्ट घडून आली कीं, त्यायोगें सुधारकास आपली मनीषा तृप्त करण्यास संधि मिळाली. दुर्धारक पक्षांच्या एका पुढाऱ्याच्या घरीं एक समारंभ व्हावयाचा होता, त्या वेळीं उपाध्याय व त्याची पत्नि या दोघांनीं मिळून तो विधि चालवावयास हवा होता. परंतु तो समारंभ ज्या उपाध्यायानें चालविला, त्याला बायको नव्हती. कांहींही विघ्न न येतां तो समारंभ पार पडला. परंतु यजमानीणबाईच्या बोलण्यावरून त्या उपाध्यायाच्या मित्रांना असा संशय आला कीं, यजमानीणबाई हीच समारंभामध्यें उपाध्यायाची पत्नि बनली होती, अर्थातच तिनें ही गोष्ट धुडकावून दिली; आणि या रीतीनें सर्व बिंग बाहेर पडलें ! सुधारकांनीं या प्रसंगाचा फायदा घेऊन, त्या दुर्धारकांचें कृत्य चव्हाट्यावर आणिलें ! त्या वेळीं या गोष्टीमुळें अर्थातच फार चळवळ उडून गेली.

वरील हीं दोन उदाहरणें देण्याचा माझा उद्देश एवढाच आहे कीं, १८७० मध्यें कोणत्या प्रकारची स्थिति होती हें दाखवावें, व तिची सध्यांच्या स्थितीशीं तुलना करावी. त्या काळीं लोकांना फार भयंकर रीतीनें छळ सोसावा लागे, व सामाजिक रूढीमध्यें एकाद्यानें यत्किंचित् जरी फरक केला, तरी लोक चवताळून जाऊन त्याच्यावर तुटून पडत. म्हणून सुधारणा करण्याची खटपट करणें ह्मणजे खात्रीनें त्याचा परिणाम सुधारणा करणाऱ्याला भोगावा लागणारच, अशी दृढ समजूत असल्यामुळें ती घडवून आणतांना फार सावधगिरीचें व दूरदर्शित्वाचें धोरण स्वीकारा असा उपदेश केला जाई. परिपूर्ण उत्साहाच्या भरानें प्रेरित होऊन राजा राममोहनराय व केशव चंद्रसेन यांच्या सारख्या वीर

पुरुषांनीं या सावधगिरीच्या व धोरणाच्या लंगड्या दडपणाविरुद्ध चळवळ केली नसती, तर आज आपणांस जी प्रगति झालेली दिसत आहे, ती करण्यास आपण कधींही समर्थ झालें नसतों. परंतु असें ह्मणतात कीं, आजपर्यंत आमची जी प्रगति झालेली आहे, ती चुकीच्या बाजूनें झाली आहे. हा आरोप खरा आहे काय? जें पत्र बहुतेक अंशीं बर्द्वानच्या महाराजाच्या खर्चानें चाललें आहे, अशा एका पत्रामध्यें परवांच महाराजांनीं ह्मणून दाखविलें कीं, आह्मां ब्राह्म लोकांची नाचक्की होत आहे, कारण ज्या लोकांना खाण्यापिण्याचा कांहींही विधिनिषेध नाहीं, अशा लोकांचा आमच्या कंपूमध्यें सहज शिरकाव होतो. ब्राह्मसमाजाच्या उत्पत्तीचा व प्रगतीचा इतिहास ज्याला ह्मणून अवगत आहे, त्या प्रत्येकाला माहित आहे कीं, ब्राह्मसमाजाच्या पुरस्कर्त्यांना, पाहिजे तें खाण्यापिण्याची मुभा असणें, हें आपल्या धर्मतत्त्वांपैकीं एक तत्त्व असावें व त्याच्या पायावरच सामाजिक सुधारणेची पुन्हां घडी बसवितां येईल, असें कधींही वाटलें नाहीं. मी स्वतःच्या अनुभवावरून असें खात्रीनें सांगतों कीं, प्रार्थनासमाजाच्या आद्यस्थापकांपैकीं कोणाचीही वरील प्रकारची समजूत नव्हती. त्यांच्यांशीं माझा जो परिचय होता, त्यावरून मी तुम्हांस असें सांगतों कीं, सुधारणेविषयीं त्यांच्या मनामध्यें जी कळकळ उत्पन्न झाली, तीबद्दल कोणत्याही 'माधवराव भटजीचे' ते ऋणि नव्हते. डॉक्टर **भांडारकरांनीं** मला सांगितलें कीं, इराण्याच्या दुकानामध्यें जावें, हा विचार माझ्या मनांत एक दिवस देखील आला नाहीं. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, आमचा ज्या संस्थेशीं संबंध आहे, ती संस्था शाकाहारी व्हा, अथवा मांसभक्षक व्हा, असें कांहीं सांगत नाहीं. केशव चंद्रसेनच्या डॉक्टरांनीं जेव्हां त्याला मांसाहार करण्याची सल्ला दिली, तेव्हां नेहमीं शाकाहारावर आपली उप-

जीविका करावयाची, हा जो त्याचा निर्धार तो मोडण्यापेक्षां धैर्यानें आजार सहन करून प्रकृति बिघडली तरी बेहत्तर, असें त्याला वाटलें. ब्राह्मसमाजाच्या सभासदांमध्यें हल्लीं कांहीं फरक दिसून येत असेल. ज्याप्रमाणें पोशाख, सामान व इतर गोष्टी यांमध्यें भपका ( Fashion ) असावा असें आपणांस वाटतें त्याप्रमाणें धर्मही भपकेदार असावा, अशा प्रकारचा कांहींजणांचा समज झालेला दिसतो. एखाद्या संस्थेचा मूळ जो पुरुष त्याची मूळची जी कल्पना त्या कल्पने सभोंवतीं इतर अवांतर गोष्टींचा संग्रह करावयाचा ही वृत्ति, सर्व धर्मांमध्यें साधारणपणें दिसून येते; व त्यामुळेंच बर्द्वानच्या महाराजासारख्यांना दोष काढावयास जागा मिळते. परंतु ही गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जो धर्म राजा राममोहन रॉयानें उपदेशिला, देवेंद्रनाथानें प्रचारांत आणिला व केशव चंद्रसेननें आपल्या उदाहरणानें व उपदेशानें सर्वांच्या परिचयाचा केला, तो धर्म **ईश्वराचें पितृत्व** व **अखिल मानवजातीचें भ्रातृत्व** या शुद्ध तत्त्वांवर उभारलेला आहे. अशा या धर्माचे आम्ही अनुयायी आहों, व आमचे रोजचे सर्व व्यवहार या आमच्या धर्मानुरूप व्हावेत अशी आमची इच्छा आहे. संसाराचा त्याग करून एखाद्या गुरूच्या मागें लागा, असें आमचा धर्म सांगत नाहीं. तर आमच्या सर्व व्यवहारांस तो व्यापून राहिलेला आहे, व जी जी म्हणून गोष्ट त्याच्या आटोक्यांत येते, त्या त्या गोष्टीस तो कवटाळतो व तीस पवित्र करितो. येशूख्रिस्त, तुकाराम, नानक, झोरोस्टर वगैरे सारख्या धर्मसंस्थापकांच्या उपदेशांचें सार या धर्मांत आहे. जगाचे जणूं काय जनितें, असे हे थोर व पवित्र महात्मे यांनीं जो प्रकाश प्रथम पाडला, त्याचेंच पुनरुज्जीवन राममोहनानें केलें आहे. त्यांच्याच शिकवणीच्या प्रेरणेनें रामरोहनाचे ठिकाणीं जागृति उत्पन्न झाली व

उत्साहभरित अंतःकरणानें तो सर्वत्र सत्याचें प्रतिपादन करीत सुटला. धर्माविषयींच्या आमच्या कल्पना कदाचित् बदलतील. परंतु त्यांच्यामध्यें कितीही फरक झाला, तथापि, राममोहनाच्या उपदेशाची मूलभूत जी कल्पना तिच्यामध्यें कधींही बदल होणार नाहीं व तिची कोणासही बरोबरी करतां येणार नाहीं. त्यानें प्रतिपादिलेला हा जो धर्म, त्याचा विस्तार हा झालाच पाहिजे; पण मनुष्यजातीच्या उपयोगी पडून तिचें कल्याण करण्याकरितां आपण झटलें पाहिजे. राममोहनाचें असें वचन आहे कीं, तुम्ही जसें बोलतां तसें वागा व तुमच्या सदसद्विवेक-बुद्धीशीं विरोध करूं नका. या ध्येयाबरहुकूम ज्यानें आपलें सर्व आयुष्य घालविलें त्या राममोहनाच्या थोर उदाहरणापेक्षां अपणांस दुसरें कोणतें उदाहरण सांपडणार आहे! आपल्या देशबांधवांची सुधारणा करण्या-करितां त्यानें काय काय परिश्रम केले! विधवांची स्थिति सुधारण्याकरितां त्याचें मन कळवळून त्यानें कसा उद्योग केला व इंग्लंडास जाऊन तेथें या देशाच्या नैतिक, आधिभौतिक व राजकीय स्थितीविषयीं साक्ष देऊन आपल्या हतभागी बंधूंना कशी मदत केली, ही गोष्ट कोणास अवगत नाहीं! आणि या महान् तेजस्वी पुरुषाचें अनु-करण केल्यामुळें केशवच्या मनामध्यें जागृति उत्पन्न होऊन ईश्वरी प्रेरणा झालेली नाहीं काय? पण आपल्या बांधवांकरितां आपण यत्किंचित् तरी झीज सोसली आहे काय? या प्रश्नाचें उत्तर प्रत्येकानें द्यावयास पाहिजे. मनाचा आकुंचितपणा नव्हे तर 'वसुधैव कुटुं-बकं वृत्ति' ही आधुनिक प्रगतीची गुरुकिल्ली होय. दुसऱ्यावर प्रेम करून व ममता दाखवून दुसऱ्याच्या उपयोगी पडणें, ही गोष्ट फार थोर व पवित्र आहे. आपणांस मोठ्या गोष्टी जरी करितां आल्या नाहींत, तरी लहान सेवा कां होईना, ती प्रेममयवृत्तीनें केली असतां त्यायोगेंच आपला विशेष गौरव होतो. सारांश आजच्या काळीं धोरण, सावधगिरी, दूरदर्शित्व असले शब्द

वापरून भेकडपणाचा उपदेश नको आहे. आपल्या विवेकास अनुरूप आचारणाची जरूरी आहे. सत्य, न्याय, ह्यांस अनुरूप आचरण करणारे, धोरण ठेवा, सावधगिरीनें पाऊल पुढें टाका, असा दिखाऊ उपदेश करणार नाहींत.

## मनाचें समत्व.

निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें ।
साधन बरवें हेंचि एक ॥ तुकाराम.

'पाहिन जगीं जगदीश कधीं मी । आस मना ही लागली ॥'

हें जें गोड पद आतां आपण गाइलें, त्याच्या मधुर आवाजानें आपलीं अंतःकरणें भरून गेलीं आहेत. ईश्वर करो व या पदामध्यें सांगितलेल्या पवित्र विचारानें आपलीं मनें उन्नत होऊन हें पद रचणाऱ्या भक्तास ईश्वर सर्वत्र पहाण्याची ज्याप्रमाणें उत्कंठा लागून राहिली होती, त्याप्रमाणेंच आपल्याही अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न होवो ! या पदावरून असें दिसून येतें कीं, याच्या कर्त्याच्या मनास ईश्वर सर्वत्र पहाण्याचा इतका ध्यास लागून राहिला आहे कीं, ती गोष्ट साध्य होईतोंपर्यंत त्याला विश्रांति म्हणून माहीत नव्हती. त्याला वाटत असे कीं, ईश्वराचा साक्षात्कार मला जेथें तेथें झाला नाहीं, किंवा मीं, माझें मन व आत्मा ब्रह्मार्पण केला नाहीं, तर माझ्या जीविताचा उद्देश निर्फल होय. आपणही ईश्वराची करुणा भाकूं या; म्हणजे ईश्वरास सर्वत्र पाहिल्यानें जो आनंद होतो, तो आपणांसही होईल.

ह्या भक्ताचें अंतःकारण ईश्वरानें त्याजवर केलेल्या उपकारांनीं भरून गेलेलें आहे. त्याला मोठासा द्रव्यसंचय प्राप्त झाला, बहुमा-

नाची जागा मिळाली, किंवा जगिक जें सुख तें प्राप्त झालें ह्मणून तो ईश्वराविषयीं कृतज्ञ झाला, असें नव्हे, तर त्याच्यावर जीं जीं संकटें ओढवलीं, ज्या ज्या दुःखांचे प्रहार त्याच्यावर झाले, ते सर्व त्यानें निमूटपणें सहन केलें. कारण आल्या भोगास सादर असल्यानेंच मनाला योग्य वळण लागतें, हें त्याला पक्के समजलें होतें. आपली वाढ होण्यास ऐषाराम किंवा चैन यांची जरूरी नाहीं, हें त्याला माहीत होतें. न डगमगतां निर्भयतेनें आपण विपत्तीशीं टक्कर देण्यास सज्ज होतों व त्या विपत्तीच्या भयंकर फेऱ्यांत जरी आपण सांपडलों, तरी तें सर्व शांतपणें सहन करतों, तेव्हांच आपणामध्यें हें जें सामर्थ्य आलें, तें ईश्वराचेंच होय व अथपासून इतिपर्यंत ईश्वर आपल्या सांगाती आहे, ही गोष्ट आपणांस पटते. मनुष्य जेव्हां सुखामध्यें व विषयानंदामध्यें मग्न होऊन जातो, तेव्हां तो आपल्या स्वतःस व ईश्वरास विसरतो; परंतु त्याच्यावर जेव्हां एकादें संकट गुजरतें किंवा त्याला हालअपेष्टा सहन कराव्या लागतात तेव्हां तो स्वतःविषयीं विचार करूं लागतो व आध्यात्मिक बल प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करतो. या दृष्टीनें विचार करितां दुःखाची भावना ही पवित्र होय. विपत्तीच्या योगें अविनाशी जो आत्मा त्याचा विचार करण्याकडे आपली प्रवृत्ति होते. याचकरितां तुकोबासारख्या साधूंचें ह्मणणें आहे कीं, विपत्ति आली असतां तिचा अंगिकार करून तें एक शुभ चिन्हच होय असें मी समजतों, कारण, आपत्तीच्या योगें मनुष्याचें लक्ष ईश्वराकडे वेधतें, असें मला वाटतें.

विचाराची ही जी दिशा, ती केवळ हिंदुधर्मामध्येंच विशेषरीतीनें दृष्टोत्पत्तीस येते काय? सार्वभौम सत्ताधिकारी जो परमेश्वर त्याची प्राप्ति करून घेण्याकरितां एकच उत्तम साधन आहे, व तें साधन म्हटलें म्हणजे दुःख व वेदना यांचा अंगीकार करून

त्या सहन केल्या असतां आपल्यास दुसऱ्याची सेवा करितां येतें, ही शिकवण, फक्त हिंदुधर्माचीच आहे काय? **येशूख्रिस्ताचा** उपदेश देखील तशाच प्रकारचा आहे. सत्याचा त्याग करण्यापेक्षां, येशूख्रिस्तास सुळावर चढून फांशीं जाणें, बरें वाटलें. दुसऱ्याच्या हिताकरितां दुःख सहन करण्याचें त्याजमध्यें अलौकिक सामर्थ्य होतें, ही गोष्ट त्यानें जगाच्या निदर्शनास आणून दिली. दुःख सहन करण्याचें हें जें ख्रिस्तामधील सामर्थ्य तें हिंदुधर्माच्या अनुयायांमध्येंही आढळून येतें.

मीं वरील प्रकारचें विधान केलें आहे, त्यामुळें हिंदूंचा व त्याप्रमाणेंच ख्रिस्ती लोकांचाही गैरसमज होण्याचा संभव आहे. मजमध्यें धर्माभिमान नाहीं, असें हिंदुलोक ह्मणतील व ख्रिस्ती लोक माझें विधान ऐकून हांसतील व ह्मणतील कीं, मी ख्रिस्तीधर्मांतीलच विचार घेऊन ते हिंदुधर्मांत आहेत, असें भासवीत आहे. परंतु दोघांनाही माझें उत्तर असें आहे कीं, तुमच्या धर्मांचीं उदार तत्त्वें तुम्हांस अद्याप जशीं कळावीत तशीं कळलेलीं नाहींत. त्यांचें योग्य निरीक्षण केलें असतां सर्व धर्मांचें सार एकच व सारखेंच आहे, हें कळून आल्याशिवाय राहणार नाहीं.

येशूख्रिस्तानें दुःख सहन करण्याची परमावधि केली, म्हणून अर्थातच त्याच्या चरित्राकडे माझें मन वेधतें. त्याचा सर्व जीवनक्रम विशेषतः त्याचा अंत यावरून जो आपणांस बोध होतो, तो हा कीं, मनुष्याचें मनुष्यमात्रावरील जें प्रेम तें खऱ्या धर्माच्या योगें व्यक्त केलें जातें. हिंदुधर्मामध्येंही हें उदात्त तत्त्व आढळून येतें, तेव्हां या ठिकाणीं मीं हिंदुधर्माचा निर्देश केला नाहीं तर, मी त्या धर्माचा मोठा गुन्हेगार ठरेन.

पण ख्रिस्ती लोक म्हणतील कीं, हिंदुधर्मामध्यें भक्तीची कल्पना आहे हें आम्ही कबूल करतों. पण त्या कल्पनेस जसें मूर्त स्वरूप

यावें, तसें आलेलें नाहीं. दुसऱ्याकरितां झीज सोसावी अशा प्रकारची प्रेरणा भक्ताचे अंतःकरणांत ह्या धर्मामुळें होत नाहीं. ‘ दुसरे तुमच्यावर रागावले तरी उलट त्यांच्यावर तुम्ही रागावूं नका, दुसऱ्यांनीं तुम्हांस इजा केली, तरी तुम्हीं त्यांना इजा करूं नका ’ असें मनूचें वचन असेल पण एकंदरींत तो क्रियाहीन अशा प्रकारच्या सद्गुण होय. पॉलनें म्हटल्याप्रमाणें Heap coals of fire on the head of your enemy by doing him an act of kindness in return for his wrong किंवा ख्रिस्तानें म्हटल्याप्रमाणें Love your enemies, do good to them that wrong you अशा प्रकारचे उपदेश तुमच्या हिंदुधर्मामध्यें आहेत कोठें ? हिंदुधर्म अद्याप अशा प्रकारच्या उच्च स्थितीस येऊन पोहोंचलाच नाहीं. अशा प्रकारचे ख्रिस्ती लोकांचे आरोप आहेत.

अशा लोकांस माझें एवढें सांगणें आहे कीं, या देशांतील अतिशय कनिष्ठ असे जे लोक त्यांच्या चरित्राकडे पहा, म्हणजे त्यांच्यामध्यें सद्गुणांचें जिवंत बीं आहे, अशी तुमची खात्री होईल. हिंदुस्थानांत कितीहि अवर्षणें पडलीं, तरी हें बीं सुकून जाणार नाहीं, किंवा कितीही भयंकर तुफान सुटलें तरी हें बीं वाहून जाणार नाहीं, इतकें सामर्थ्य त्याजमध्यें आहे. हिंदुस्थानांतील सर्व दर्जाच्या लोकांमध्यें हें बीं कसें मुरून राहिलें आहे, हा प्रश्न वेगळा, पण तें आहे, यांत शंका नाहीं. भक्तिमार्गाचा पुरस्कार करणारे असे जे साधु त्यांच्या उपदेशाचें तुम्हीं एकचित्तानें व मनोभावानें अध्ययन कराल तर उपनिषदांमध्यें व भगवद्गीतेमध्यें सांगितलेल्या उदात्त कल्पनांमुळें त्यांच्या मनास कसें उत्तम प्रकारचें वळण लागलें होतें, त्यांचें चारित्र्य किती सत्वशील होतें व त्यांचें ध्येय किती उच्च होतें, हें तुम्हांस कळून येईल. उपनिषदांमध्यें व भगवद्गीतेमध्यें ईश्वरविषयक ज्ञानाचा किती तरी सांठा भरलेला

आहे ! मनुष्याच्या अंतःकरणांत प्रेरणा उत्पन्न करणारे कितीतरी प्रसंग आहेत ! बंधुभाव व जिवंत प्रेम उदित होईल, अशी त्यांमध्यें किती तरी स्थळें आहेत ! परंतु त्यांमधील मर्म कळण्यास योग्य मार्गानें आपण तीं पुस्तकें वाचली पाहिजेत. नाहीं तर, एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणें, या थोर पुस्तकांमध्यें सांगितलेल्या ज्ञानाची गुंतवागुंतव सोडविण्याकरितां कोणा एखाद्या आचार्यांनीं लिहिलेल्या टीकेवरच तुम्ही विसंबून रहाल तर या पुस्तकांमुळें आपलें जें कल्याण होण्याचा संभव आहे, तें होणार नाहीं, अशी मला भीति वाटते. तुमचा स्वतःचा जो अनुभव, तो पूर्णपणें ध्यानांत ठेवून तीं पुस्तकें वाचावयास घ्या. एक एक वचन घेऊन त्यामधील सत्य तुमच्या अनुभवास कसें पटतें, तें पहा. स्वतःशीं विचार करा, त्यामध्यें तल्लीन व्हा व तें सत्य आपलेसें करण्याचा प्रयत्न करा. असें केल्यानेंच तुमचें अंतःकरण उद्दीप्त होऊन तुमचें चरित्र सच्छील होईल.

सत्य ह्मणून जें आहे, त्याचें शुद्ध स्वरूप पाहण्याची उत्कंठा ज्यांच्या मनामध्यें सतत लागून राहिली होती, अशा लोकांच्या तोंडचे उद्गार उपनिषदांमध्यें ग्रथित केलेले आहेत. तत्त्ववेत्याप्रमाणें नुसतें सत्य समजून घ्यावयाचें, अशी त्यांची प्रवृत्ति नसे. ते स्वार्थत्यागी असून सत्यमार्गाचें आचरण करीत असतांना सर्वस्व खर्चण्यास ते तयार असत. त्यांचा भाव निष्ठावंत होता, व आयुष्याचे सिद्धांत व मनुष्यांचें कर्तव्य या गोष्टींचा त्यांनीं इतक्या गंभीरतेनें विचार केलेला आहे, ह्मणूनच त्यांच्या उपदेशांचा परिणाम, ते ज्या देशांत होऊन गेले, त्या देशांतील सर्व लोकांवर झालेला अद्यापही दिसून येत आहे. तुमच्या लक्षांत येईल कीं, हे संत एक गोष्ट मोठ्या आस्थेवाईकपणानें आचरीत, त्यामुळेंच ती गोष्ट या देशांतील लोकांना साधारणपणें सोपी झाली आहे. ती गोष्ट ह्मटली ह्मणजे त्यांचें वर्तन सर्वांशीं सारखें असे. या प्रेममय वृत्तीच्या योगें मनु-

ष्याचें लक्ष ईश्वराकडे लागतें. ख्रिस्ताच्या उपदेशामध्येंही हें तत्त्व आढळून येतें. तो एके ठिकाणीं ह्मणतो:—“ दुसऱ्यांनीं आपल्याशीं जसें वागावें असें तुम्हांस वाटतें, त्याप्रमाणें तुम्ही त्यांच्यांशीं वागा.” परंतु वरील साधूंची समत्वाची जी कल्पना तिचा अर्थ फार खोल आहे. दुसरे लोक ह्मणजे जणूं काय स्वतःच, या दृष्टीनें साधूंचें सदां पहाणें असे. अशा प्रकारच्या वृत्तीमुळें त्यांना स्वतःच्या अंतःकरणामध्यें, इतर सर्व प्राणीमात्रामध्यें व सभोंवतालच्या वस्तूंमध्येंही ईश्वराचें दर्शन होत असे. भक्तिमार्गाचा पुरस्कार करणारे जे साधु त्यांच्या अंतःकरणामध्यें वर सांगितलेल्या प्रकारची जिवंत स्फूर्ति झालेली होती व ती या देशच्या लोकांच्याही अंतः-करणांत उतरविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. सर्व मनुष्यजात एक व तिचें नियंत्रण करणारा एक ईश्वर या प्रकारची दृढ भावना या देशांतील साधूंची होती. तशाच प्रकारची स्फूर्ति ग्रंथांच्या द्वारें आपणांस व्हावी, अशा प्रकारचा आपण प्रयत्न करूं या; आपलीं अंतः-करणें परोपकारबुद्धीनें प्रेरित करून आपल्या शेजाऱ्यास स्वतःसमान लेखून आपण त्याच्यावर प्रेम करूं या; व दुसऱ्याची सेवा करण्याम-ध्येंच जगणें व मरणें यामध्यें खरें सुख आहे, ही गोष्ट आपण ओळखूं या. अशा प्रकारचा मार्ग आपणांकरितां सोनेरी अक्षरांनीं लिहून ठेविला आहे, परंतु या मार्गापासून आपण भलतीकडे गेलों आहों, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. आमच्यामध्यें पुष्कळच भिन्न मतें व सहस्रशः जाती होऊन आमचीं मनें आकुंचित बनलीं आहेत व अंतःकरणें बधिर झालीं आहेत; परंतु ही सर्व अनर्थपरंपरा आपण सोसली आहे, व सध्यां आपली तळमळ होत आहे, यावरून ईश्वरानें आपणांस सोडलें नाहीं, ही गोष्ट सिद्ध होते. तो आह्मांस जागे करीत आहे व आपल्या थोर ऋषींनीं ज्या मार्गाचें अवलंबन केलें, त्या मार्गाकडे जाण्यास तो आपणांस प्रवृत्त करीत आहे.

---

# प्रार्थनासमाजाचें कार्य.

आमच्या या प्रार्थनासमाजाचा वार्षिकोत्सव आम्ही साजरा करीत असतांना अशा या मंगल प्रसंगीं इतरांच्या मनाची स्थिति कशी काय होत असेल, हें मला सांगतां येत नाहीं, परंतु मजविषयीं म्हणाल तर, मला अशा प्रसंगामुळें मागील अनेक गोष्टींची आठवण होते, त्यायोगें आमच्या भावी कामाविषयीं मला आशा वाटूं लागते, व अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न होते. अशा प्रकारचा उत्सव चालू असतां, मागील गोष्टींची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं व ईश्वरानें आजपर्यंत आपणांस काय शिकविलें हा प्रश्न आपल्या डोळ्यांपुढें उभा राहतो. या बाबतींत आपणा सर्वांचा अनुभव काय आहे हें मला नमूद करितां येणार नाहीं, पण या समाजाचा मला जो पुष्कळ दिवसांचा अनुभव आहे, त्यावरून मी आपणास खात्रीपूर्वक सांगतों कीं, ज्या वेळीं मानवजातीच्या सुधारणेविषयीं चोहींकडे खटपट चालू आहे, आणि त्यांतल्या त्यांत या आपल्या हिंदुस्थानांत तर ती दिवसानुदिवस जास्तच आहे, अशा वेळीं या देशामध्येंच ईश्वरानें मला निर्माण करून माझा संबंध या प्रार्थनासमाजाशीं घडवून आणलेला आहे, ह्याबद्दल मी ईश्वराचा कसा उतराई होणार, तें मला कळत नाहीं. सध्यांचा काळ ह्मणजे वीरांचा नव्हे किंवा साधूंचा नव्हे. तर तुमच्या माझ्या सारख्या साधारण प्रतीच्या माणसांचा आहे. पूर्वींच्या लोकांनीं संकलित करून ठेविलेली विद्या, ज्ञान व अनुभव यायोगें सध्यांच्या युगांतील साधारण माणसाचें जीवित मधुर व तालबद्ध झालें आहे. या युगाला लोककर्तृक युग ह्मणतां येईल. कारण या युगाचे नायक तुमच्या माझ्यासारखीं साधारण माणसेंच होत. नेमून दिलेलीं अनेक प्रकारचीं कामें करण्यास

मनुष्यमात्रानें अधिकाधिक समर्थ व्हावें, अशाविषयीं या युगामध्यें सर्वत्र खटपट चालू आहे.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

या भगवद्गीतेंतील श्लोकांत श्रीकृष्णानें म्हटल्याप्रमाणें महात्मे या भूतलावर अवतीर्ण होणार असतील, तर त्यांना होऊं दे, त्यांच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं; किंवा प्रत्यक्ष ईश्वर अवतार घेऊन प्रकट झाला तरी, कांहीं हरकत नाहीं. आतां मला जो विचार कर्तव्य आहे, तो साधूविषयीं नव्हे, तर पापी मनुष्याबद्दल होय; पाप करणें ह्याचे परिणाम वाईट तर खरेंच; पण त्यामध्येंही रसिकता आहे. आपला बाप, आई, बहिण, बायको आणि मुलें यांना मदत करून संसारामध्यें येणाऱ्या काम, क्रोध, लोभ वगैरे दुर्विकारांशीं झगडा करून आपला मार्ग काढणें, हा साधारण मनुष्याचा हक्क आहे, व त्याला विशेष सत्ताही आहे. असे जे साधारण लोक त्यांचाच गौरव सध्यांचे कवी करीत आहेत; पण लाखों जणांमध्यें एखादा दुसराच निर्माण होणाऱ्या साधूचा गौरव करीत नाहींत. गौतमबुद्धानें आपलें राज्य, घर, व बायको सोडून धर्माची कास धरली, ती साधारण लोकांचाच उद्धार करण्याकरितां; आणि तुकारामदेखील साधारण मनुष्याच्याच संकटाविषयीं व दुर्विकाराविषयीं आपल्या अभंगामध्यें बोलत नाहीं काय? त्यानें केलेल्या उपदेशामुळें आपणांस आनंद होत नाहीं काय, व आशा वाटत नाहीं काय? ईश्वरानें अवतार घेऊन पुन्हां आपणांमध्यें येणें याविषयीं मला कांहीं जास्त माहीत नाहीं. परंतु मला ठाऊक आहे कीं, ईश्वर हा सर्वदां पापी मनुष्याजवळ वास करीत असतो, आणि सध्यांही तो आपणा सर्वांजवळ खात्रीनें आहे. जीविता-

विषयीं आपण आपली जी समजूत करून घेतलेली आहे, व त्यामुळें आपणांस जो नीरसपणा वाटतो, तो आपण घटकाभर एके बाजूस ठेवून डोळे उघडून कोणत्याही गोष्टीचा सांगोपांग विचार केला, तर आपल्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं, साधारणतः सर्व मनुष्यजातीचें जीवित्व आपणांस वाटतें त्यापेक्षां अधिक सुखावह व अधिक सुंदर आहे.

आमच्यांमध्यें असे कित्येकजण आहेत कीं, त्यांना हिंदुस्थानच्या भवितव्यतेविषयीं वाईट वाटतें आणि ते ह्मणत असतात कीं, इतर राष्ट्रांच्या मानानें आमची अवनति होत चालली आहे. त्यांचें म्हणणें खरें असेल किंवा खोटें असेल, बरोबर असेल किंवा चुकीचें असेल; पण ज्या या देशामध्यें अनेक प्रकारच्या चळवळी उत्पन्न झाल्या त्या देशामध्यें माझा जन्म झाला, त्याबद्दल मी ईश्वराचे अंतः-करणपूर्वक आभार मानतों. जे आमचे पूर्वज नीतिमय वातावरणांत वावरत असत, जे जननमरणाचे सिद्धांत सोडविण्यामध्यें निमग्न असत, ज्यांनीं गंगा, यमुना, नर्मदा इत्यादि विशाल नद्या व हिमालय यासारखे उच्च उच्च पर्वत इत्यादिकांचें वर्णन करून सृष्टीमधील सौंदर्याचा महिमा गाइला, त्या ऋषींची आठवण झाली असतां माझी मातृभूमि हिंदुस्थान आहे, म्हणून मी ईश्वराचे धन्यवाद गातों. आमच्या ऋषींनीं आम्हांस जो रस्ता दाखवून दिलेला आहे, त्यापासून आम्ही कदाचित् दुसरीकडे गेलों असूं किंवा आम्ही आपल्या आध्यात्मिक उन्नतीपासून च्युत झालों असूं; पण माझ्या सभोंवतालची परिस्थिति पाहिली असतां मला असें वाटतें कीं, सावकाश कां होईना, पण शांतपणें व संगतवार आमची प्रगतीच होत आहे. ज्या संस्थेपासून तुमच्या मनामध्यें हुरूप उत्पन्न होईल, अशा कोणत्या तरी संस्थेशीं तुमचा संबंध असेल अशी मला आशा आहे. ती संस्था जर धार्मिक असेल, तर फारच चांगलें. कारण

धर्माच्याच योगें मनुष्याचें अंतीं हित होतें. धर्माशीं निकट संबंध असला म्हणजे मी कोण व कोठून आलों, हा प्रश्न नेहमीं डोळ्यांसमोर असतो. आणि या प्रश्नाचें वारंवार मनन केल्यानें शेवटीं आपणांस 'एकमेवाद्वितीयम्' व त्यामुळें सर्व मनुष्यजात एक, हीं तत्त्वें कळून येतात. ही गोष्ट एकदां का तुम्हांस पटली म्हणजे त्यायोगें तुम्ही नम्र व्हाल, व तुम्हांला वाटेल कीं, तुमच्यावर तुमच्या धर्मानें कांहीं जबाबदारीही ठेविली आहे. यायोगें अंतर्दृष्टि प्राप्त होते, व मीं माझ्या धर्माविषयीं किंवा ज्या संस्थेशीं माझा संबंध आहे, त्या संस्थेविषयीं काय प्रयत्न केले आहेत, हा प्रश्न उद्भवतो. तुम्हांला कदाचित् वाटेल कीं, तुमचें गत आयुष्य फुकट गेलें आहे, आणि दुसऱ्यांवर उपकार करण्याचे व त्यांच्या उपयोगी पडण्याचे सर्व प्रसंग तुम्हीं दवडले आहेत; असें ज्यांना वाटतें, अशा लोकांना हे उत्सवाचे दिवस धैर्य देतात, व सांगतात कीं, तुमचें अजून सर्व आयुष्य गेलेलें नाहीं. जे दिवस गेले ते गेले; त्याबद्दल नुसतें हळहळत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तर आतां निराश न होतां काम करण्यास उत्सुक व्हा.

आपण सर्व एकाच ईश्वराचीं लेकरें आहों; ह्मणून आपल्या गत आयुष्यामध्यें आपण आपल्या कर्तव्यापासून पराङ्मुख जरी झालों असलों, तरी त्याचा आपणांला खरोखर पश्चात्ताप होऊन आपण ईश्वरास शरण जाऊन आपलें कर्तव्यकर्म करण्याचा प्रयत्न केला तर आपणांस योग्य ती मदत व शक्ति दिल्याशिवाय ईश्वर कधींही राहणार नाहीं. मग आपल्या सर्व काळज्या, सर्व यातना व सर्व प्रकारचे पाश नाहींसे होऊन, आपल्या अंतःकरणांत दैदीप्यमान् प्रकाश पडेल. ज्याच्या हातून कांहीं सुद्धां अपराध केव्हांच घडला नाहीं, असा कोण आज या ठिकाणीं आहे! आपल्या एका भक्तानें म्हटलें आहे कीं, जो गत गोष्टीविषयीं बोलतो व तीविषयीं

चर्चा करितो, तो पढतमूर्ख होय. मला वाईट वाटतें कीं, माझें मत तसें नाहीं. जो मनुष्य गत गोष्टीचा विचार करून तीपासून वर्तमान व भविष्य काळाकरितां उत्तम धडा शिकतो, तो खरोखर पढतमूर्ख नव्हे, तर तो शहाणा होय. गत गोष्टींचा विचार करावयाचा तो आपली दुर्बलता दाखविण्याकरितां नव्हे, तर आपण काय केलें व कोणत्या गोष्टींमध्यें आपणाला अपयश आलें, हें पहाण्याकरितां करावयाचा. वर्तमानपत्रामध्यें कोणी एका लेखकानें एकदां प्रतिपादिलें होतें कीं, प्रार्थनासमाज मृतप्राय झाला आहे. कोणत्या अर्थानें हे शब्द त्यानें योजिलें हें मला माहीत नाहीं, पण समाज स्थापन झाला, तेव्हां त्यामधील व्यक्ति ज्या प्रकारच्या उत्साहानें काम करीत असत, तसा उत्साह राहिला नाहीं, व त्यामुळें समाजास आतां उतरती कळा लागली आहे; एवढेंच ह्मणण्याचा त्या लेखकाचा जर उद्देश असेल, तर त्याला माझें उत्तर असें आहे कीं, समाजमताला पूर्वीं जसा चोहींकडून विरोध उत्पन्न होत असे, तसा आतां होत नाहीं; व त्यामुळें समाजाला पूर्वीं जशी चळवळ करणें भाग पडे, तशी आतां करावी लागती नाहीं. त्या वेळची स्थिति अशी असे कीं, आमच्या या साप्ताहिक उपासनेस फारच थोडी मंडळी जमत व मंदिरांतील बहुतेक बांक मोकळे पडत. पण सध्यां या ठिकाणीं निरनिराळ्या धर्मांचे व समाजाशीं मुळींच संबंध नसणारे पुष्कळ लोक येत असतात. असा हा मोठा श्रोतृसमुदाय या ठिकाणीं वारंवार जमतो. नित्याच्या उपासनांस नियमानें कितीतरी लोक येतात, त्या अर्थीं समाज मृतप्राय झाला असें ह्मणतां येईल काय?

इ. स. १८६७ मध्यें हा आमचा प्रार्थनासमाज पंधरावीस जणांनीं स्थापन केला. ते गृहस्थ कांहीं मोठे अद्वितीय नव्हते, ते आपली दुर्बलता पूर्ण जाणून होते; परंतु कर्तव्यकर्म करण्याची त्यांच्यामध्यें प्रखर जागृति उत्पन्न झालेली होती; आणि स्वतःवरील

जबाबदारी ते पूर्णपणें ओळखून होते. आम्ही जे त्यांचे नालायक वंशज, त्यांच्या हातीं त्यांनीं आपली मालमत्ता जो हा समाज तो दिला आहे. स्वर्गवासी होऊन त्यांना जरी बरेच दिवस झाले आहेत तरी त्यांची सर्वदां आपल्यावर पाळद आहे; व त्यांचा आम्हांस असा संदेश आहे कीं, तुमच्या समाजाची सेवा करण्याकरितां तुमच्यामध्यें जो कांहीं सत्त्वगुणाचा अंश असेल तो सर्व खर्च करा. ह्या महात्म्यांनीं शुद्ध व निष्ठावंत भावाचें बीं पेरून ठेविलें आहे. आपल्या मागून या समाजामध्यें प्रविष्ट होणाऱ्याकरितां त्या बीजाला पाणी घालणें हें आपलें कर्तव्य आहे. ईश्वराचे ठिकाणीं दृढ भाव ठेवणें व मनुष्यमात्रावर प्रेम करणें या उदात्त तत्त्वांवर जी ही सुंदर इमारत रचलेली आहे, तिला आपण आपआपल्या शक्तीप्रमाणें मदत केली, तर हिंदुस्थानची आध्यात्मिक उन्नति व्हावयास फार उशीर लागणार नाहीं.

---

## " साधा परमानंद एका भावें. "

काय तो विवाद असो भेदाभेद ।
साधा परमानंद एका भावें ॥
निघोनि आयुष्य जातें हातोहात ।
विचारीं पां हित लवलाहीं ॥
तुका म्हणे भावभक्ति हें कारण ।
नागवी भूषण दंभ तोचि ॥

या अभंगामध्यें **तुकोबा** म्हणतात, निरर्थक वादविवाद करण्याचें काय प्रयोजन आहे ? व लोकांमधील भिन्न भिन्न मतांचा एवढा बाऊ तरी कां करितां ? एकच ध्येय पुढें ठेवून

परमशांति प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करा. आयुष्याचे दिवस झपाट्यानें चालले आहेत. अजून तरी तुमचें कल्याण कशांत आहे याचा विचार करा. भाव व प्रेम यांयोगेंच परमानंद प्राप्त होणार आहे, दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं. वादविवाद आणि बुद्धिचें घमेंड यांमुळें तो नाहींसा होतो.

आपणांला असें वाटण्याचा संभव आहे कीं, **तुकोबांनीं** हें जें ध्येय आपणांपुढें ठेविलें आहे, तें प्रचारांत आणणें अशक्य होय. पुरातन कालापासून साधूंनीं या वादविवादाचा व मतमतांतरांचा निषेध केलेला आहे, परंतु जग हें आहे तसेंच आहे. जसजसे साधु निर्माण होत गेले, तसतशी निरनिराळीं व विरुद्ध दिसणारीं मतें वाढत गेलीं. सर्व मतांची एकवाक्यता करण्यामध्यें कोणत्या साधूला यश आलें आहे ! शाश्वतच्या गोष्टी **तुकोबांनीं** आम्हांस शिकविल्या आहेत; म्हणून ते अम्हांस वंदनीय आहेत; परंतु निदान या अभंगांत तरी **तुकोबा** जें म्हणतात तें निवळ स्वप्नवत् आहे, अशा प्रकारचा संशय हा अभंग प्रथम वाचल्यानें आपल्या मनामध्यें उत्पन्न होण्याचा संभव आहे.

परंतु या अभंगाचा आपण शांतपणें विचार करून त्यांतील मर्म जाणण्याचा प्रयत्न केला तर, आपणांस असें आढळून येईल कीं, **तुकोबांनीं** जें कांहीं सांगितलें आहे त्याची खात्री आपल्यालाही संसारांत पटते. **तुकोबा** जें बोलतात तें त्यांच्या स्फूर्तीमुळें; परंतु अशा उक्तींतील त्यांचा प्रत्येक शब्द इतका चोख व विचारवंत असतो कीं, जणूं काय त्यावर तुकोबांनीं पुष्कळ विचार केला आहे, आणि त्यांमधील विचारांचा एकमेकांशीं पूर्णपणें मेळ आहे, असें आपणांस वाटतें. तुकोबाच्या वरील अभंगावरून दिसून येतें कीं, जगामध्यें भिन्नपणा पाहिजे, सुंद एकरूपतेमुळें समाज बधिर होतो. भिन्न भिन्न मतें योग्य रीतीनें वाखाणलीं जाऊन त्यांचा एकमेकांशीं मेळ बसतो,

तेव्हांचें जें ऐक्य तें ऐक्य खरें, या गोष्टीची तुकोबास पूर्ण जाणीव होती. मतामतांमधील सर्व भिन्नपणा काढून टाका, असें ते आपणांस सांगत नाहींत. ईश्वरानें निरनिराळ्या राष्ट्रांस निरनिराळ्या रीतीनें आपणांस प्रकट केलें आहे, म्हणून प्रत्येक धर्मामध्यें ईश्वरी सत्याचा अंश आहे, व आपापल्यापरीं प्रत्येक धर्माला किंमत आहे. धर्मभेदामुळें देखील प्रगति झालेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. धर्माची स्थापना कशा करितां झाली, याच्या पूर्ण जाणिवेमुळें तो धर्मभेद उत्पन्न होतो, आणि यामुळें त्याची वाढ होते. परंतु या वेळीं आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, कोणत्याही धर्मामध्यें ईश्वरीसत्य पूर्णपणें उघडकीस आलेलें नाहीं, आणि शिवाय त्या धर्मामधील सत्य नुसतें समजल्यानें फारसा फायदाही होत नाहीं; त्यायोगें ज्ञानाचा आपणांस गर्व होण्याचा संभव आहे. आपल्या जीवितामध्यें आपण जी गोष्ट करावयाची ती परमानंद प्राप्त करून घेणें ही होय. यालाच **वर्डस्वर्थ** कवि (The inner ecstasy or the gleam divine) असें म्हणतो. या स्वानंदाचें सामर्थ्य ओळखणें जरूर आहे.

प्रथम, आपण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, हा आनंद प्राप्त करून घेण्याकरितां आपण श्रम केले पाहिजेत. ईश्वराच्या राज्यामध्यें आपण जें देतों, तें आपणांल मिळतें; म्हणून हा आनंद मिळवावयाचा तो आत्मप्रतिष्ठेनें नव्हे तर दुसऱ्याविषयीं सहानुभूति व प्रेम दाखवून मिळविला पाहिजे. आपण जर आपल्या आयुष्याचें चांगल्या रीतीनें निरीक्षण केलें, तर आपलें आयुष्य देखील आपणांस हीच गोष्ट शिकवितें, असें आपल्या लक्षांत येईल. ज्या मनुष्यास दिवसभर काबाडकष्ट करावे लागतात, अशा मनुष्याचें उदाहरण घ्या. दिवसभर काम केल्यानंतर तो रात्रीं घरीं येतो. त्या वेळेस त्याचीं मुलें झोंपीं गेलेलीं असतात, त्याची बायको त्याला जेवण वाढते व आपली घरांतील कामें करूं लागते. जेवण झाल्या-

नंतर तो निजावयास जातो, पण झोंप ह्मणून त्याला कांहीं येत नाहीं. कदाचित् त्याचा धनी त्याच्यावर रागावलेला असेल, त्यानें आपल्या कपाळास आंठ्या घातलेल्या असतील, याची त्याला आठवण झाली असेल. त्याला कोणीं फसविलें असेल, किंवा कोणीं त्याची आगाळिक केली असेल, किंवा पैशाची त्याला पंचाईत पडली असेल, अशा प्रकारच्या काळज्या त्यांच्या अंतःकरणामध्यें डंवचत असल्यामुळें त्याचें मन अस्वस्थ होऊन त्याला झोंप येत नाहीं. तो आपल्या बिछान्यावरून उठतो, बाहेर जातो, आणि आकाशाकडे पाहतो. त्या ठिकाणीं जी स्तब्धता व जें वैभव असलेलें त्याला दिसतें, त्यायोगें त्याच्या मनाला भीति वाटते. हजारों वर्षें गेलीं, लाखों मनुष्यें जन्मास आलीं, आणि नाहींशीं झालीं. पण ती स्तब्धता व तें वैभव कायम आहे. त्या योगें त्याच्यामध्यें नम्रभाव उत्पन्न होऊन तो आपणांशी म्हणतो, "माझ्या दुःखांचा बाऊ करून त्यांविषयीं कुरकुर करणारा मी कोण क्षुद्र प्राणी! मी आज जिवंत आहे, तर उद्यां नाहीं, अशी माझी स्थिति." आतां त्याच्या ठिकाणीं जी लीनता जागृत झाली, त्यामध्यें नित्याच्या अनुभवापेक्षां विशेष कांहीं तरी आहे, एवढें खरें. त्याच्या अंतःकरणामध्यें असा विचार आला खरा पण तो कसा आला? ज्या प्रकारचा प्रकाश त्याला हवा होता, तसाच प्रकाश त्याला कोठून मिळाला? हा जो त्याला लाभ झाला, जो अधिकार प्राप्त झाला त्याच्या योगें दुःखाचे तीव्र प्रवाह सहन करण्याचें, निराशेच्या प्रसंगास तोंड देण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त झालें. हें कसें झालें हें ज्याला समजेल त्यास अंतरींचा आनंद, अंतरींचें तेज, त्याचें ज्ञानही होतें.

हा प्रकाश, हा अविकार, हा परमानंद, जे कोणी परमेश्वराला आपल्या अंतःकरणांत, आपल्या शुद्ध पवित्र केलेल्या अंतःकरणांत,

पहाण्याकरितां झटतात त्यांसच तो लाभतो; त्यांनाच आपल्या जीवि-ताची व या जगताची खरी कल्पना कळून येते, अशा त्या अंतःकरणा-सच शांति, प्रेम, सौंदर्य, वैभव, न्याय व नीति यांची योग्य कल्पना होते. पर्वत, समुद्र अथवा पृथ्वि यांचें वैभव पाहून एकादा चितारी त्या वैभवाचें चित्र रेखाटतो, पण तें सौंदर्य प्रथम त्याच्या अंतःकरणा-मध्यें त्याला दिसतें, म्हणजे त्या सौंदर्याचा ठसा प्रथम त्याच्या अंतःकरणावर होतो. असें न होईल तर त्याला बाहेरचें सौंदर्य दिसणार नाहीं. एखाद्या कवीला स्वतःच्या अंतःकरणामध्यें कांहीं सौंदर्य दिसलें तरच त्याचें हुबेहुब चित्र तो जगाकरितां काढील.

हा परमानंद म्हणजे काय व तो कसा प्राप्त करून घ्यावयाचा याबद्दल नुकतीच घडून आलेली एका शाळेंतील मुलाची गोष्ट मीं सांगतों:—एका गरीब विधवेला एकुलता एक मुलगा होता. तिनें त्याला एका सार्वजनिक शाळेंत घातलें. तो कांहीं हुशार मुलगा नव्हता; आणि तशांत तो लंगडा होता. शाळेंतील कोणीही मुलगा सोबती नसल्यामुळें उत्तेजनकारक असें शाळेंत कांहींच नाहीं, असें त्याला वाटूं लागलें, त्याची अनाथ स्थिति त्याला फार भासूं लागली, आणि ती शाळा नरकवासाप्रमाणें त्याला दिसूं लागली. एके दिवशीं आपली वाईट स्थिति इतर दिवसांपेक्षां अधिक कष्टप्रद त्याला वाटून त्याच्या डोळ्यांतून दुःखाश्रु आले, आणि त्यानें ईश्वराचा धांवा केला. ईश्वरानें त्याची प्रार्थना ऐकली, आणि दुसरे दिवशीं सकाळीं त्याच्या प्रेमळ आई-कडून धीर देणारें पत्र त्याला आलें. त्या पत्राच्या योगानें त्याच्या विषयीं त्याच्या आईच्या अंतःकरणांत किती प्रेम भरून राहिलें आहे, याची त्याला खात्री झाली. ईश्वरानें आपणांस ज्या स्थिती-मध्यें ठेविलें आहे, त्या स्थितीमध्येंच समाधान मानलें पाहिजे, हें त्याला समजून, शाळेंतील मुलांनीं आपला जरी हेवा केला, तरी

तो सहन केला पाहिजे, हें सामर्थ्य त्याला प्राप्त झालें. दुसरा कोणीहि त्याच्याशीं निष्ठुरतेनें वागला, तरी तो त्याच्यावर प्रेम करी व आपल्या अभ्यासांत सदां निमग्न राही. अशा रीतीनें पुढें तो त्या शाळेमधील एक प्रख्यात् विद्यार्थी झाला.

सहनशीलता आणि विनय यायोगें हा स्वानंद प्राप्त होतो. **एडिसन**सारखा शास्त्रवेत्ता जो **पास्टयूर** त्याच्या चरित्राकडे पहा. जेव्हां **प्रशिया** आणि **जर्मनी** यांनीं **फ्रान्स**चा पराभव केला व तो देश **वुईलियम** बादशहाच्या हातीं गेला, तेव्हां **पास्टयूर** पुढें आला. आपल्या देशाच्या विपन्नावस्थेमुळें त्याला फार दुःख झालें व तो आपल्याशीं ह्मणाला, " राष्ट्रामध्यें **फ्रान्सला** त्याचें योग्य स्थान मिळावें अशा विषयीं मला कांहीं करतां येणें शक्य नाहीं काय ? ". सूड उगवावा किंवा द्वेष करावा, या कल्पनेनें त्यानें कामास प्रारंभ केला नाहीं. नम्रपणानें व धिम्मेपणानें त्यानें श्रम केले, कष्ट सोसले व असा शोध लाविला कीं, त्या योगानें **फ्रान्सची** कीर्ति सर्व जगामध्यें झाली. त्याच्या चरित्राप्रमाणें त्याच्या मृत्यूनेंही परमानंद म्हणजे काय याचें आपणांस परिज्ञान होतें. एका हातामध्यें क्रूस व दुसऱ्या हातामध्यें आपल्या बायकोचा हात घेऊन तो शांतपणें मरण पावला.

हा परमानंद जर प्राप्त करून घ्यावयाचा आहे तर, आपलें अखिल जीवन प्रथम प्रार्थनामय केलें पाहिजे, म्हणजे, परमेश्वराच्या सहवासांत आपण आहों हें आपण जाणलें पाहिजे. दुसरें, क्षुल्लक गोष्टींविषयीं तर्कवितर्क करीत न बसतां अत्यंत श्रेष्ठ, कल्याणकारी अशा गोष्टींचा विचार केला पाहिजे; विचारास आचाराचें स्वरूप देणें हें आपलें कर्तव्य आहे, हें लक्षांत ठेवून वागलें पाहिजे. विचारास कृतीचें रूप दिलें नाहीं, तर त्याची किंमत कांहीं नाहीं. 'Plain Talks to Young Men' या पुस्तका-

मध्यें प्रोफेसर **जेम्स** म्हणतो, "दुसऱ्यावर ममता करावी. व प्रेम करावें अशी जर तुमची इच्छा असेल, तर जेव्हां जेव्हां तुम्हांस संधि प्राप्त होईल तेव्हां तेव्हां प्रेम करा आणि दया करा; म्हणजे मग ती संवय तुमच्या हाडींमासीं खिळून राहील, तुम्ही दुसऱ्यांस अनुकरणीय व्हाल व दुसरे तुमचा कित्ता गिरवितील."

शांतपणें ईश्वराची सेवा करण्याकरितां आपणांस हें आयुष्य प्राप्त झालें आहे, आणि आपण तशा प्रकारें आयुष्याचा व्यय केला असतां ईश्वर आपणांस आशीर्वाद देतो, हा विश्वास आपणांमध्यें पुरातन कालापासून आहे. मध्यंतरीं पुष्कळ तत्त्वज्ञान आलें, गेलें, समाजाची क्रांति झाली; परंतु ईश्वराच्या राज्यामध्यें न्याय आहे हें शाश्वतचें तत्त्व मात्र कायम आहे. ईश्वराच्या प्रेमामुळें त्याचा न्यायीपणा स्पष्ट झाला आहे. बाकी सर्व गोष्टींकडे कानाडोळा करून ईश्वराचें प्रेम व त्याचा न्यायीपणा हे गुण आपल्या आयुष्यांतील मुख्य तत्त्वें होत असें आपण समजलें पाहिजे; आणि असें केल्यानेंच आपणांस शांति प्राप्त होईल. भगवद्गीता हेंच तत्त्व शिकवितें:—

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥**

येशू ख्रिस्ताचे देखील याच अर्थाचे पुढील उद्गार आढळतात, ही गोष्ट चमत्कारिक आहे:—

"Come unto me all you who are laden and I will give you rest."

# एकेश्वरी धर्मपरिषद्.

(१९०५ सालीं मुंबई येथें एकेश्वरी धर्मपरिषदेमध्यें झालेलें प्रास्ताविक भाषण.)

बन्धुभगिनींनो, मी आपलें मनःपूर्वक आपण येथें आल्याबद्दल मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या वतीनें स्वागत करितों. आज मला आपलें स्वागत करण्याचा जो मान मिळाला आहे, तो ईश्वराची तशी इच्छा असती, तर दुसऱ्यांस मिळून त्यांनीं आपला अधिक योग्य रीतीनें आदरसत्कार केला असता; प्रेमानें आपले बाहू पसरून आपणांस कवटाळिलें असतें, व सर्व एकेश्वरीमतानुयायांना साजेल असें जें बंधुत्वाचें नातें त्यानें प्रेरित होऊन त्यांनीं सहकारित्वानें आपणांबरोबर कार्य केलें असतें. ज्यांचीं नांवें मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या इतिहासामध्यें चिरकाल रहातील, एवढेंच नव्हे, तर, अतिशयोक्तीचा यत्किंचित्‌ही दोष पदरीं न येतां मी आपणांस सांगतों कीं, ज्यांचीं नांवें या शहरांत घडून आलेल्या प्रत्येक चांगल्या व थोर कृत्याशीं, घडून आलेल्या प्रगतीशीं किंवा सदुद्योगाशीं संलग्न आहेत, अशीं थोर माणसें आजच्यासारख्या प्रसंगीं आपल्याला दिसत नाहींत, त्यामुळें आम्हांला अगदीं चुकल्याचुकल्यासारखें होत आहे. प्रथमारंभीं या समाजाच्या स्थापनेपासून तों आमरण या समाजाशीं संबंध होता, एवढेंच नव्हे, तर या संस्थेचे अध्यक्ष या नात्यानें समाजमतांचा प्रसार करण्याकरितां ज्यांनीं अविश्रांत परिश्रम केले अशा एका सन्मान्य गृहस्थांची या वेळीं मला आठवण होते. मी हें कोणाविषयीं बोलत आहें, हें आपणांपैकीं कांहीं जणांच्या लक्षांत आलेंच असेल. ज्यांची मृत्युवार्ता ऐकून सर्वांस अतिशय दुःख झालें असे **डॉ. आत्माराम पांडुरंग** याजविषयीं हे माझे उद्गार आहेत. आदरणीय

असें त्यांचें चारित्र्य आपणांस आदर्शवत् झालें आहे. चांगलें कृत्य असलें कीं त्यास हटकून मनोभावें मदत करावयाची असा त्यांचा परिपाठ असे. त्यांचा ईश्वरावर पूर्ण विश्वास असे व समाजतत्वांचा प्रसार व्हावा ह्मणून, दुसरे लोक समाजाविषयीं जें जें ह्मणून सांगत त्याचा मोठ्या आदरानें ते स्वीकार करीत; पण अध्यक्षपणाचे अधिकार बजाविण्याकडेच त्यांची प्रवृत्ति नव्हती. नंतर या वेळीं दुसऱ्या एका प्रेमळ वृत्तीच्या बंधूची मला आठवण होते. ते आपले प. वा. मित्र **वामन आबाजी मोडक** हे होत. प्रथमारंभापासून त्यांनीं समाजाकरितां श्रम घेतले व त्यांच्या मनामध्यें समाजाची उन्नति कोणत्या रीतीनें होईल, हा विचार मुख्यत्वें करून वास करीत होता. समाजाकरितां काम करीत असतांना त्यांच्या मधील विशेष गुण जो दृष्टोत्पत्तीस येई, तो त्यांची आनंदित वृत्ति व परमार्थ बुद्धि ही होय. त्यांच्या मरणामुळें आपलें फार नुकसान झालें आहे. तिसरे गृहस्थ **नारायण महादेव परमानंद** हे होत. त्यांच्या मृत्यूनें आमचीं अंतःकरणें दुःखानें व्याकुळ झालेलीं आहेत. आपल्या आधुनिक ऋषींपैकीं ते एक ऋषिच होऊन गेले. त्यांची ओळख झाली कीं त्यांच्यावर प्रेम केल्याशिवाय रहावतच नसे. इतके ते थोर अंतःकरणाचे होते. दुसरेही कित्येकजण असे आहेत कीं, अशा प्रसंगीं त्यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं, परंतु वर ज्या तिघां गृहस्थांविषयीं मी बोललों, ते या देशामधील अग्रगणी होत. त्यांनीं या समाजाची योग्य प्रकारें जोपासना करून मनोभावें सेवा केली आहे, व त्यांनीं या समाजाचा जो भरभक्कम पाया घातला आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणि आहों. या संस्थेचे निदान दोन तरी पुढारी सध्यां हयात आहेत, यायोगें आमच्या मनास कांहींसें बरें वाटतें. मी प. वा. **महादेव गोविंद रानडे** यांचें नांव घ्यावयास विसरलों. मीं त्यांच्या नांवाचा उल्लेख

करावयास हवें होतें. ही संस्था अस्तित्वांत आल्यापासून तेही इतरांप्रमाणें या संस्थेचें काम करीत होते. परंतु वर ज्या तिघांचीं नांवें मीं घेतली, ते प्रार्थनासमाजाचे सर्वांत श्रेष्ठ असे अग्रणी पुरुष होत, ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, सध्यां दोघेजण जीवमान् आहेत. त्यांपैकीं एक तर आपल्यामध्येंच सध्यां असलेले गुरुवर्य डॉ० **भांडारकर** हे होत. ईश्वरानें त्यांना दीर्घायु करावें अशी आम्ही प्रार्थना करितों. **वासुदेव बाबाजी नवरंगे** यांच्यापेक्षां आम्हांस पूज्य असे आतां दुसरे गृहस्थ उरले नाहींत. ते आज ह्या ठिकाणीं दिसत नाहींत. वार्धक्यामुळें त्यांची प्रकृति आतां क्षीण झाली आहे, म्हणून ह्या समारंभास ते आले नाहींत. परंतु जेव्हां जेव्हां मला त्यांच्या दर्शनाचा लाभ होतो, व त्यांच्या चर्येकडे माझें लक्ष जातें, तेव्हां तेव्हां धर्मशील वृत्ति असणें हें किती थोर भाग्य होय, याची मला कांहींशी कल्पना होते.

वर सांगितलेल्या महात्म्यासारख्यांनीं या समाजाची जोपासना केल्यामुळें भविष्य काळाविषयीं आपणांस आतां निराशा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांनीं पेरलेल्या बीजाची वाढ होत आहे. २०।२२ वर्षांपूर्वींच्या स्थितीचें अवलोकन करून ती स्थिति सांप्रत स्थितीशीं ताडून पाहतां आपणांस कळून येईल कीं, जरी आपल्या दुर्बलतेच्या वेळीं आपणांमध्यें संशयाचें वारें संचार करितें, तरी एकंदरींत आपला भविष्य काळ उज्ज्वलच आहे. १८८१ सालीं मी या समाजाचा जेव्हां सभासद झालों, तेव्हां माझ्या कांहीं मित्रांनीं मला सांगितलें कीं, ज्यांनीं हा समाज स्थापन केला, त्यांच्या मृत्यूबरोबर हा समाजही लयास जाणार. डॉ० आत्माराम पांडुरंग, रानडे व मोडक हे या जगांतून नाहींसे झाले कीं, ही संस्थाही ढांसळून पडलीच समजा. पुढें आपत्ति ओढवणार असें सांगणाऱ्या या भविष्यवाद्यांनीं असेंही भाकित केलें कीं,

असा एक काळ लवकरच येईल कीं, त्या वेळीं समाजाच्या ट्रस्टींना ही इमारत दुसऱ्या कोणत्यातरी संस्थेच्या ताब्यांत द्यावी कीं कसें याचा विचार करावा लागेल !

आमच्या दुर्दैवानें डॉ० आत्माराम पांडुरंग आम्हांस सोडून गेले, मोडक गेले, परमानंद गेले, व रानडेही गेले; परंतु त्यांच्या आशीर्वादानें आम्हांला असें वाटतें कीं, आमचें पाऊल पुढेंच पडत आहे; आमच्या समाजाची भरभराट होत आहे, प्रार्थनासमाजाची प्रगति माझ्या अटकळी बाहेर झाली आहे, हें मी जें म्हणतों, तें व्यर्थ अभिमानानें म्हणत नाहीं. बंधुभगिनींनो, आम्ही जें थोडें-बहुत काम करित आहों, त्याचा आढावा मी नित्य घेत असतों. या समाजाबरोबर अस्तित्वांत आलेल्या बाकीच्या सर्व संस्था लयास गेल्या आहेत, पण आमचा लहानसा, गरीब, व लोकनिंदित समाज अद्यापपर्यंत उत्तम प्रकारें टिकून राहिला आहे. आजपर्यंत कित्येक राजकीय संस्था निघाल्या, कित्येक समाजविषयक संस्था स्थापिल्या गेल्या, व त्या अस्त पावल्या; कदाचित् इतर ठिकाणचे प्रार्थनासमाज तशाच दुसऱ्या संस्थांत सामील झाले असतील. त्या सर्व आतां फक्त भूतकाळच्या संस्था झाल्या आहेत, पण मी प्रार्थना-समाजाचा जेव्हां सभासद झालों त्या वेळेपेक्षांहीं सध्यांच्या काळीं आशा-जनक स्थिति आहे. आमच्या अटकळी बाहेर समाजाची प्रगति होत आहे हें या काळचें आशाजनक चिन्ह आहे. अर्थांतच या सर्व आशा सध्यांच्या परिस्थितीस अनुरूप आहेत आमच्या कार्याची उभारणी चांगली झाली आहे व तरूण पिढीमध्यें दिसून येणारी आस्था व उत्साह-वृत्ति यांविषयींचा उल्लेख करतांना मी त्या पिढींतील नाहीं एवढेंच मला दुःख वाटतें ! मजविषयीं ह्मणाल तर जुनी पिढी व नवीन पिढी यांची सांगड घालून देणारा मी एक दुवा आहें. या समाजाचा जुना सभासद या नात्यानें मला वाटतें कीं, मला असें ह्मणण्याचा

अधिकार आहे कीं तरुण पिढीमध्यें इतका उत्साह व इतकी आस्था दिसून येत आहे कीं, भविष्य काळीं आतांपेक्षांही समाजाची अधिकाधिक उन्नतिच होत जाईल. नंतर या संस्थेचा एक भाग जी ही मजबूत इमारत तिचा मी उल्लेख करतों. ज्यांच्या उदार देणगीमुळें दुसरी एक सुंदर व भव्य इमारत तयार होऊन आज इतर ठिकाणाहून आलेल्या इतक्या आपल्या पाहुण्यांची येथें राहण्याची सोय झाली आहे, त्या बंधूंचे आपण फार आभारी आहों. हे गृहस्थ या ठिकाणीं हजर आहेत व त्यांचें नांव तुम्हांस सांगणें हें कदाचित् त्यांना आवडणार नाहीं, ह्मणून मी त्यांचें नांव सांगून त्यांना विरमावयास लावीत नाहीं. पण मी कोणाविषयीं बोलतों आहें, हें आपल्या लक्षांत आलेंच असेल.पश्चिम हिंदुस्थानांत प्रगति होत नाहीं, असें ज्यांस वाटतें, त्यांना हा एक धडाच होय. यांवर कोणी म्हणतील कीं, हें काय एका व्यक्तीच्या औदार्याचें फल आहे, त्याजबद्दल तुम्ही एवढें फुशारून जावयास नको. यास इतकेंच उत्तर पुरे आहे कीं, आपणामध्यें पुष्कळ लक्षाधीश असतील, पण एकच श्रद्धाळू व दानशील गृहस्थ ईश्वराच्या दृष्टीनें दुसऱ्या शंभरांपेक्षां बहु मोलाचा आहे व मनुष्यांच्या दृष्टीनेंही तो तसाच गणला गेला पाहिजे.आणखी दुसऱ्या प्रकारचीं उपयुक्त कार्येंही मला सांगतां येतील, पण तसें करण्याची गरज दिसत नाहीं. ज्या आमच्या बंधुभगिनी दूरदूरच्या गांवांहून येथें आल्या आहेत,त्यांना मीं सांगतों कीं, इतर समाजांच्या मानानें आम्ही जरी गरीब आहों व कमी व्यवहारकुशल आहों तरी आमच्या पुढाऱ्यांच्या उत्साहानें प्रेरित होऊन आमचें पाऊल नित्य पुढें पुढेंच पडत आहे. आमच्या ह्या शहरामध्यें असे कित्येक लोक आहेत कीं, ज्यांना आमच्या साप्ताहिक उपासना रिकाम्या बाकांपुढें होत असतात, असें वाटत असतें! परंतु असली टीका करून आपली अनुदारता व्यक्त करणारांना वस्तुस्थिति कशी आहे, ती

प्रत्यक्ष घाहण्याची कांहीं बुद्धि होत नाहीं; व आपल्यावर तशी कांहीं जबाबदारी आहे, असेंही त्यांना कांहीं वाटत नाहीं. खरा प्रकार असा आहे कीं, या ठिकाणीं होणाऱ्या साप्ताहिक उपासनेस पुष्कळ मंडळी हजर असते व ज्यांना वाटतें कीं, या ठिकाणीं आठवड्याचे आठवड्यास होणाऱ्या आध्यात्मिक उपदेशापासून कांहींही लाभ होत नाहीं अशा निर्बल व भेकड माणसांचे अंत:करणांतही आशा उत्पन्न करण्याच्या मार्गांत आम्ही आहों, इतकें सांगितलें म्हणजे आमच्या प्रयत्नाविषयीं आपल्याला कल्पना होईल.

बंधुभगिनीनों, या संस्थेच्या इतिहासाचा मीं कांहींशा विस्तारानें एथवर विचार केला. आतां एकेश्वरी धर्माची एथली स्थिति कशी काय आहे तिचें अशा या प्रसंगीं अवलोकन करण्याची मी आपणांस विनंति करितों. निरनिराळ्या प्रकारच्या चळवळींमध्यें आम्ही मझून गेलों आहों, अशा वेळीं आपलें या शहरांत आगमन झालें आहे. मुंबईंतील प्रत्येक मनुष्य, नव्हे प्रत्येक स्त्रीदेखील कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या चळवळींत गुंग झालेली सध्यां दिसत आहे. कांहींजण राजकीय बाबतींकरितां येथें आले आहेत. कांहींजण सामाजिक सुधारणेकरितां आले आहेत, व बहुतेक सर्वजण औद्योगिक प्रदर्शन पहाण्याकारितां आले आहेत, व तुम्ही एकेश्वरीधर्मपरिषदेकारितां आलां आहां. कदाचित् तुम्ही अगदीं अल्पसंख्यांश आहां, परंतु त्यामुळें तुमची निराशा होण्याचें कारण नाहीं. थोर अशा ज्या धार्मिक किंवा इतर चळवळी त्या प्रथम अल्पसंख्येनेंच सुरू झालेल्या असतात, व त्यांचा सर्वत्र विस्तार होण्यापूर्वीं त्यांना पुष्कळ ओढाताण करावी लागते. आस्ते आस्ते मनुष्यांच्या अंत:करणांत सत्यधर्माचा प्रकाश पडत आहे, म्हणून आतां आशाजनक चिन्हें दिसत आहेत. फार लांब जावयास नको; परवां राष्ट्रीय परिषदेमध्यें झालेल्या कांहीं भाषणांकडे आपली दृष्टि वळवा,

म्हणजे एकंदरींत पारमार्थिकता सर्व विचाराचा मध्यबिंदु हलके हलके बनत आहे, ही गोष्ट लक्षांत येऊन त्यामुळें तुम्हांस समाधान वाटेल. खऱ्या एकेश्वरीमतानुयायाला आशा वाटण्यांसारखा सुखदायक काळ जवळ जवळ येत चालला आहे. कित्येक वर्षांपासून हिंदुस्थानामध्यें प्रतिकाराची प्रचंड लाट उसळत आहे, तिला कित्येक जण पुनर्जीवन असें ह्मणतात; पण ही प्रतिकाराची वृत्ति ह्मणजे भविष्य काळचें आशाजनक चिन्ह होय, असें मला वाटत आहे. ज्या या लाटेमुळें आपण धर्माचा कैवार घ्यावयास पाहिजे, असा आपणांपैकीं कांहीं जणांचा असा समज झाला आहे, त्या लाटेंतून आपण लवकरच बाहेर पडणार हें खास. आपण ब्राह्मसमाजाचे असा किंवा आर्यसमाजाचे असा, आपल्या सर्व कृत्यांना व्यापून टाकणारी एकच वृत्ति आहे, असें मला वाटूं लागलें आहे. माझ्या एका युरोपियन मित्रानें मला सांगितलें कीं, हिंदी मनुष्याविषयीं सर्वांत विशेष अशी एक गोष्ट मला आढळून आली ती ही कीं, हिंदी मनुष्य चाळीस वर्षांचा होईतोंपावेतों नास्तिक असतो, पण चाळिशी उलटल्यानंतर धर्माकडे त्याची वृत्ति वळल्याचें दिसून येतें. जणूं काय नास्तिकपणा एकदम झुगारून देऊन तो अंधश्रद्धेला (Superstition) कवटाळतो ! ज्यांना ४०-४५ वर्षांपावेतों धर्माचा विचारच करावासा वाटत नाहीं, किंवा धर्म म्हणजे वृद्धावस्थेकरितांच आहे असें वाटतें, किंवा ज्या जगामध्यें आपण वावरतों तें जग कांहींच नव्हे, असें ज्यांना वाटतें, त्यांची गोष्ट अशा प्रकारची असते यांत संशय नाहीं. या जगांतील सर्व वस्तु क्षणभंगुर आहेत, या गोष्टीचा विचार करण्यांत व पुढील आयुष्यांतील सुखाची कल्पना करण्यांत हिंदुस्थानांतील लोकांनीं आजवर बरेच परिश्रम केले आहेत; म्हणून त्यांच्यामध्यें ईश्वरनिष्ठेविषयीं उपजतच बुद्धि आहे. आपण आपल्या भावी धर्मा-

विषयींचा सर्व भाव, आपल्या सर्व महत्त्वाकांक्षा, व आपल्या सर्व प्रकारच्या आशा या उपजत बुद्धीपासूनच उत्पन्न केल्या पाहिजेत. आपण प्रेममय वृत्तीनें कामास लागूं व हिंदी मनुष्याच्या स्वभावाची ही जी श्रद्धायुक्त बाजू तिकडे अधिक लक्ष देऊं तर आपल्या श्रमाचें चांगलें चीज झालेलें आपल्या अनुभवास येईल.

आपली संस्था ही इतर संस्थांपासून विशेष प्रकारची संस्था आहे असें टीकाकार म्हणतात. पण आमच्यांत हा विशेष कसा आला ? ब्राह्मसमाजांत, ब्राह्म चळवळींत, असा काय विशेष आहे ? सत्य मग तें कोठूनही येवो त्याचा स्वीकार करावयाचा ही जी आम्हांमधील विशालबुद्धि तीमुळें ब्राह्मसमाज इतर धर्मांहून स्पष्टपणें ओळखला जातो. आम्हांला वारंवार असें सांगण्यांत येतें कीं, आम्हीं आमचीं धर्मतत्त्वें व आमचीं ध्येयें इतर धर्मांपासून घेतलीं आहेत व म्हणून ब्राह्मधर्माला अनेक चिंध्यांची गोधडी असें आमचे टीकाकार वारंवार म्हणत असतात. ही गोष्ट खरी असो किंवा नसो, पण आमचा धर्म सत्याच्या पायावर उभारलेला आहे, म्हणून तो भविष्यकाळच्या सर्व जगाचा धर्म होणारच. मला भविष्य वर्तविण्याची संवय नाहीं, किंवा ती कलाही मला अवगत नाहीं, म्हणून आमचा धर्म म्हणजे सर्व जगाचा धर्म होणार, अशी जरी माझी मनोदेवता मला सांगत आहे, तरी त्या प्रश्नाचा अधिक ऊहापोह करण्याच्या मी भानगडींत पडत नाहीं. परंतु मला येथें हें सांगितलें पाहिजे कीं, आजचा काळ असा आहे कीं, या वेळीं मनाचा आकुंचितपणा नाहींसा केला पाहिजे व हिंदी मनुष्याची आध्यात्मिक जी बाजू तिची मोठ्या प्रमाणावर वाढ केली पाहिजे. आपण ज्या ह्या काळामध्यें आहों, त्या काळीं हटवाद, भ्रामक कल्पना व जातिभेद यांविरुद्ध आपण जोराची चळवळ केली पाहिजे व नवीन कल्पनांचा व आध्यात्मिक महत्त्वाकांक्षेचा प्रकाश सर्वत्र पाडला पाहिजे. या गोष्टींची

फार आवश्यकता आहे. इतर राष्ट्रांच्या मानानें हिंदुस्थानची अवनति झालेली आहे, ही गोष्ट कोणाच्या लक्षांत येणार नाहीं ? आपल्या मधील जातिभेद व मनुष्यांमनुष्यांमधील भेद-मूलक वृत्ति त्या अवनतीच्या मुळाशीं आहेत, हें कोणांस ठाऊक नाहीं ? पण ब्राह्मधर्माची आम्हांस अशी शिकवण आहे कीं, ज्याप्रमाणें ईश्वर एक आहे, त्याप्रमाणें अखिल मानवजात एक आहे. दिवसेंदिवस चोहींकडून या गोष्टीच्या सत्यतेविषयीं आपणांस खात्री पटत चालली आहे. आपणांस जर प्रगति करावयाची आहे तर या मूळ तत्त्वावर तिचा पाया रचावयास पाहिजे. ब्राह्मसमाजाचें तर हें आदितत्त्व आहे. म्हणून ब्राह्मधर्मामध्यें हिंदुस्थानच्या भावी धर्माचीं सर्व मूलतत्त्वें आहेत; कारण देशामध्यें ज्या योगें ऐक्य होईल, अशा प्रकारच्या सर्व कल्पनांचा आपल्यामध्यें समावेश करण्याचा ब्राह्मधर्माचा प्रयत्न आहे. म्हणून आपण सर्वांनीं आतां जारीनें कामास लागलें पाहिजे, आधुनिक काळच्या ज्या चळवळी त्यां-करितां तनमनधन अर्पण करून झटलें पाहिजे, बंधुत्वाचें नातें जेणें-करून मनुष्यांमनुष्यांमध्यें उत्पन्न होईल, अशा प्रकारें एकमेकांला मदत केली पाहिजे, व लोकांची आम्ही अशी खात्री पटवून दिली पाहिजे कीं, आपल्यामध्यें जरी लहानसान भेद असले, तरी आपलें सर्वांचें ध्येय एकच आहे व त्या एकाच ध्येयाकडे आपण सर्वजण जात आहों.

असें म्हणतात कीं, ब्राह्मधर्माविषयीं लोकांची फारशी सहानुभूति नाहीं, व म्हणून ब्राह्मसमाजाची फारशी प्रगति झालेली नाहीं. होय, हें कांहीं खोटें नाहीं. पण असा कोणता धर्म आहे कीं, तो अस्तित्वांत आल्याबरोबर लोकांचें त्याला पुरेसें पाठबळ मिळालें आहे ? भूतकाळच्या धार्मिक संस्थांच्या इतिहासाचें परिशीलन केलें असतां आपल्या हें ध्यानांत येईल कीं, धर्माची वाढ होण्यास केवळ लोकांच्या सहानुभूतीवरच आपल्यास अवलंबून रहावयास नको.

ख्रिस्तीधर्माची भरभराट झाली, ती सेंट पालसारख्या उत्साही व स्वार्थत्यागी प्रचारकाच्या प्रयत्नामुळें होय. पॉलच्या धैर्याच्या जोडीचे आम्हांला मिशनरी हवे आहेत. गरीब व दुबळ्या, दुःखी व पापी लोकांमध्यें मिसळून काम करण्यास त्यांनीं तयार असलें पाहिजे. धर्माचा प्रसार करण्याकरितां सर्वस्व अर्पण करण्याची त्यांची तयारी असली पाहिजे. असें झालें म्हणजेच या निरुत्साहाच्या वेळीं समाजाची प्रगति होणें शक्य आहे. हें जें काम ब्राह्मसमाजास करावयाचें आहे, तें कठिण आहे, हें मी कबूल करतों. पण दिवसांतून अनेक वेळां लहान मूल पडतें, झडतें, तेव्हांच त्याला चालतां येतें, किंवा एखादा मनुष्य आपली शिकस्त करून आपल्या अवयवांना कष्ट सहन करण्यास लावतो, तेव्हांच तो बळकट होतो, ही गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे. हा जो जडसृष्टीचा नियम तोच आध्यात्मिक सृष्टीलाही लागू आहे. कोणत्याही प्रकारची वाढ होण्यास आत्म्याच्या वाढीची जरूरी आहे व धर्माची वाढ होण्यास तर आत्म्याच्या वाढीची अधिक जरूरी आहे. मित्रहो, आपल्या देशांत चालू असलेल्या सर्व चळवळींमध्यें आपली चळवळ श्रेष्ठ दर्जाची आहे, असें मला वाटतें; कारण खऱ्या धर्माच्या पायावर सर्व प्रकारच्या उद्योगाची इमारत रचली पाहिजे असें आमचें मत आहे. हिंदुस्थानचें पुनर्जीवन करावयाचें हें जें सर्व कामांमधील अतिशय बिकट काम तें आमच्यावर सोंपाविलेलें आहे. आपलें काम इतर सर्व कामांपेक्षां थोर दर्जाचें आहे. ब्राह्मसमाजामध्यें हिंदुस्थानचें पुनर्जीवन करण्याचें सामर्थ्य आहे व तें कोणत्या रीतीनें करतां येईल याचा विचार करण्याकरितां आपण सर्व फार लांबलांबचा प्रवास करून येथें आलां आहां. आमच्या आमंत्रणास तुम्हीं मान दिला व तुमच्या सहवासाचा लाभ ...न्नी तुम्हीं आह्मांस संधि दिली आहे, म्हणून मी तुमचे ...आपापल्या परीनें सत्याचा प्रसार करण्याकरितां

त्यांनीं मनोभावें श्रम केले अशा पवित्र व थोर मंडळींच्या समागमाचा कांहीं दिवस फायदा आम्हांस होणार आहे, म्हणून मुंबईच्या प्रार्थनासमाजाचे वतीनें मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतों. आपल्या धर्माची व आपल्या देशाची आपणांस उत्तम रीतीनें सेवा कशी करतां येईल या गोष्टीचा विचार करण्याकरितां आपण येथें आलां, त्याबद्दल पुन्हां एकदां मी आपलें अभिनंदन करून मी माझें हें प्रास्ताविक भाषण संपवितों.

---

## ब्राह्मधर्माची वाढ.

हिंदुधर्म, बौद्धधर्म, ख्रिस्तीधर्म किंवा मुसलमानी धर्म अशा प्रत्येक मोठ्या धर्मामध्यें असे कांहीं विवक्षित प्रसंग असतात कीं, ते सर्व धर्मांमध्यें साधारणपणें आढळून येतात. या धर्मांच्या वाढीचा अभ्यास आपण त्यांच्या निरनिराळ्या अवस्था समजून घेऊन केला तर त्याचें दोन तीन रीतीनें वर्गीकरण झालेलें असतें, हें आपणांस आढळून येईल. स्थापना होण्याच्या वेळची जी अवस्था ती पहिली. धर्माचे जे आचार्य त्यांच्या वेळची दुसरी अवस्था. त्यांच्या मागून धर्मामध्यें येणारा जो बहुजन समाज, त्यांच्या वेळची अवस्था ती तिसरी. खरें पहातां, मोठ्या धर्माची जी स्थापना होते ती ज्या मनुष्याचे ठिकाणीं परिपूर्ण उत्साह भरलेला असतो, ज्याचा ईश्वरावर दृढ भाव असतो, जो आपल्या सभोंवतालच्या इतर लोकां-पेक्षां आपली अधिक उन्नति करून घेतो व जें अतिशय चांगलें आहे, अतिशय थोर आहे, अतिशय पवित्र आहे तें आपल्यामध्यें आणतो, अशाच थोर पुरुषाकडून होते. शंकराचार्यांच्या चरित्राचें सार असेंच आहे, व बुद्धाचें चरित्र हेंच नीतितत्त्व जोरानें

प्रतिपादन करीत नाहीं काय? कारण ज्या वेळीं हिंदुधर्माची अवनत स्थिति झाली होती, त्या वेळीं मनुष्यजातीस जी नीचावस्था प्राप्त झाली तीपासून तिचा उद्धार करण्याकरितां बुद्धानें आपली शिकस्त केलेली नाहीं काय? यहुदी लोकांचा धर्म जेव्हां निस्तेज झाला होता, हटवाद व अंधश्रद्धा यांचें बंड माजलें होतें, तेव्हां इतरांपेक्षां आपणांमध्यें मनुष्यजातीविषयीं अतिशय प्रेम आहे हें व्यक्त करून मनुष्यजातीची सुधारणा होईपर्यंत विश्रांति ह्मणून घ्यावयाची नाहीं या रीतीनें यहुदी लोकांचा धर्म शुद्ध करण्यासाठीं येशूख्रिस्तानें अविश्रांत श्रम केले नाहींत काय? ख्रिस्तानें धर्माची स्थापना केली, त्याच्या शिष्यांनीं व अनुयायांनीं त्याची वाढ केली व त्या धर्माचा साधारण जनसमुहावर कसा परिणाम होत आहे ही गोष्ट तर नित्य आपल्या पहाण्यांतली आहे. ह्मणून ज्या मनुष्यास आपणास ईश्वरानें आज्ञा करून मनुष्यजातीस विशेष संदेश पोंहचविण्यास पाठविलें आहे असें मनापासून वाटतें, जो तो निरोप भेदाभेद न करतां, निर्भयतेनें पण प्रेमानें व सहानुभूतीनें पापी व तिरस्कृत मनुष्यांस कळवितो, अशा थोर मनुष्यांचा जो इतिहासतोच एखाद्या मोठ्या धर्माचा इतिहास होय. सर्व धर्मांस साधारण अशी जी ही गोष्ट, तीच हिंदुस्थानांतील एकेश्वरीधर्मांमध्येंही दिसून येते.

ब्राह्मधर्म हा साधारण लोक ज्यास हिंदुधर्म असें समजतात अशाहून अगदीं भिन्न आहे, या कल्पनेचा आपल्यापैकीं कांहीं जणांच्या मनावर बराच अनिष्ट परिणाम झालेला आहे; तेव्हां सध्यांच्या प्रसंगीं ह्याविषयीं दोन शब्द बोलणें अगत्याचें आहे. लोकांचा तशा प्रकारचा समज होण्यास कारण असें झालें आहे कीं हा धर्म वेद किंवा दुसरीं कोणतींही नवी अगर जुनी धर्मपुस्तकें ईश्वरप्रणित आहेत असें मानीत नाहीं; तर या धर्माचें असें स्पष्ट मत आहे कीं, ईश्वरानें अनेक रीतींनीं भूत-

कालीं आपलें स्वरूप स्पष्ट दाखाविलें आहे व सध्यांच्या कालींही—मग पाहिजे तर त्याला अवनतीचा काळ म्हणा, आपलें स्वरूप मनुष्य-जातीस दाखविण्याचें त्यानें बंद ठेविलेलें नाहीं. परंतु या विशाल तत्त्वावर या धर्माचा पाया रचला आहे, म्हणून या देशाच्या पूर्वींच्या इतिहासाबद्दल हा धर्म ऋणि नाहीं किंवा पूर्वींच्या धर्मग्रंथांविषयीं त्याच्या ठिकाणीं आदरभाव नाहीं हें म्हणणें खरें नाहीं. भूत-काळचे प्रसंग व त्यांतील प्रमेयें किंवा इतर विशेष प्रसंग आपण ऐकले व तिकडे दुर्लक्ष केलें तर ही आमची हयगय व हें दुर्लक्ष आमच्या कल्याणाच्या आड आल्यावांचून राहणार नाहीं. कारण, पूर्वपरंपरा अत्यंत बोधप्रद असते. तिचा सर्वस्वी त्याग करितां येत नाहीं. **राजा राममोहनरायानें** स्थापलेला हा जो धर्म तो सकृद्दर्शनीं जरि परधर्मापासून उत्पन्न झालेला दिसतो तरी त्याचा पाया या देशाच्या धर्मसमजुतींस अनुसरूनच आहे. हा देश पुष्कळ दिवस निद्रितावस्थेंत होता, व त्याचा परिणाम असा झाला होता कीं त्या-मधील सर्व चैतन्य नष्ट झालें होतें. जेव्हां एकाद्या वैद्यास वाटतें कीं आपला रोगी आजारानें इतका पछाडला आहे कीं पुनः त्या आजारांतून बरें होण्याइतकें त्याच्यामध्यें त्राण उरलें नाहीं, तेव्हां त्याच्या अंगांत विद्युच्छक्तीचा संचार करवून त्यामध्यें आंतून कांहीं चैतन्य उत्पन्न करण्याची जरूरी त्याला भासते. त्याचप्रमाणें राममोहनानें धर्माच्या बाबतींत केलें. सुधारणेच्या इतिहासावरून आपणांस कळून येतें कीं, मनुष्यजातीची सुधारणा करित असतांना एकाद्या थोर पुरुषाचे सर्व यत्न जेव्हां विफल होतात, तेव्हां डॉक्टरप्रमाणें विद्युच्छक्तीचा उपयोग त्याला करावा लागतो. पवित्र व शाश्वत असें जें तें वाईटांतून निवडून काढण्याच्या उद्योगास मनुष्य लागला म्हणजे त्याला आढळून येतें कीं, वेद, बायबल व गीता इत्यादिकांमध्यें दिस-ण्यांत जरी निरनिराळ्या प्रकारचे परस्परभिन्न उपदेश आहेत, तरी

त्या सर्वांमध्यें सर्वसाधारण असा एक प्रवाह आहे. सर्व मनुष्यजात एक, ईश्वर हा सर्वांचा पिता, व सर्व मनुष्यांचें परस्परांशीं बंधुत्वाचें नातें आहे, हीं तीन मुख्य तत्त्वें सर्व धर्मांतर्गत आहेत. हा प्रकाश तुमच्यावर पडल्याबरोबर तुमचें हें ध्येय उच्च होतें व तुम्ही एकाच मापानें सर्व मनुष्यांचीं कृत्यें मोजूं लागतां. सर्व प्रकारच्या विविधतेचें पर्यवसान एकाच गोष्टींत होतें, आपण सर्वजण एकाच ध्येयाच्या पाठीमागें लागलों आहों; सर्वांच्या अंतःकरणांत एकच प्रकारची प्रेरणा उत्पन्न होते, व ईश्वर वारंवार आपणांस प्रोत्साहन देत असतो, या गोष्टी आपणांस पटूं लागतात. **सेंट ऑगस्टिन, येशू ख्रिस्त** किंवा **तुकाराम** यांचे उत्तमोत्तम उपदेश जरी निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या लोकांकरितां केलेले आहेत, तथापि त्या सर्वांमध्यें मेळ हा आहेच. राममोहनाचा वेदावर विश्वास नव्हता. त्यानें पूर्वीच्या गोष्टी झुगारून दिल्या व त्या वेळीं चालू असलेल्या चालीरीतींवर हल्ला केला, असें जरी कोणाला वाटलें, तरी जगांतील इतर जे धर्मसंस्थापक त्यांच्यांमध्यें वर सांगितलेली जी विशेष गोष्ट ती राममोहनामध्येंही होती हें त्यांना आढळून येईल. **राममोहनानें** एकेश्वरी धर्माचा पाया घातला, **महर्षि देवेंद्रनाथ** जे परवांच गत झाले, व ज्यांच्यावर सर्वांचें प्रेम होतें आणि ज्यांना सर्व पूज्य मानीत, त्यांनीं त्या पायावर इमारत रचली व ब्राह्मधर्म या नांवानें साधारणपणें प्रसिद्ध असलेल्या या धर्माचा **केशवचंद्र सेन** यानें वस्तुतः प्रसार केला. या तिघांमध्यें देवेंद्रनाथ ठाकुरांनीं मूळ संस्थापकाच्या कल्पनेस मूर्तस्वरूप दिलें व त्या धर्माचा प्रसार करण्याची वाट केशवला सुरक्षित करून दिली. देवेंद्रनाथ यांना समाजाचे ऋषि म्हणणें सयुक्तिक आहे. त्यांच्यामध्यें ज्या प्रकारचें साधुत्व होतें, तशा प्रकारचें साधुत्व सध्यांच्या काळीं विरळा दृष्टीस पडतें. ते नेहमीं ईश्वराच्या समागमांत रहात असत व मोठ्या

भपक्यानें राहण्याचा मोह पडण्याइतकी जरी त्यांच्या जवळ संपत्ति होती, तरी त्यांनीं त्याकडे दुर्लक्ष करून व सर्व ऐहिक गोष्टींचा त्याग करून, ईश्वराच्याच सान्निध्यांत आयुष्याचा व्यय करावयाचा हेंच ध्येय सतत आपल्या पुढें ठेविलें. धर्माच्या बाबतींत जसजसे त्यांनीं परिश्रम केले तसतसें त्यांचें वजन त्यांच्या सहवासामध्यें असलेल्या लोकांवर अधिकाअधिक पडूं लागलें. अशा रीतीनें ईश्वराच्या समागमांत आपलें आयुष्य वेंचल्यामुळें त्यांच्यामध्यें जो ईश्वरी प्रकाश पडला होता, तो केशवच्याही अंतःकरणांत पाडण्याचें त्यांना सामर्थ्य प्राप्त झालें.

ख्रिस्ती धर्माचा अभ्यास करीत असतां आपणास आढळून येतें कीं, प्रथम तीन मनुष्यांकडून त्याला सामर्थ्य प्राप्त झालें येशूख्रिस्त हा त्याचा संस्थापक, पीटर हा उपदेशक व पॉल हा प्रचारक होय. हिंदुस्थानांतील एकेश्वरी धर्माच्या संबंधानेंही तीच गोष्ट थोडयाशा निराळया स्वरूपांत लागू आहे. राममोहन त्याचा संस्थापक, देवेंद्र त्याचा उपदेशक व केशव प्रचारक होय. आतां या तिघांपैकीं राहिलेले देवेंद्रनाथही आपण या समाजाचा ७५ वा वाढदिवस साजरा करीत असतांना आपणांस सोडून निजधामास गेले आहेत, तेव्हां आपलें धैर्य विगलित होऊन आपणांस असें वाटण्याचा संभव आहे कीं, आतां ह्या आमच्या तिघां मार्गदर्शकांपैकीं आम्हांस सल्ला देण्यास कोणीच उरला नाहीं, तेव्हां त्यांनीं आरंभिलेलें कार्य करण्यास कोणी नसल्यामुळें त्यांनीं पेरून त्याला पाणी घालून वाढविलेलें बीं आतां खात्रीनें त्याची वाढ न होतां, मरून जाईल. सध्यां आपली जी स्थिति आहे त्या स्थितीचा विचार करतां अशा प्रकारची निराशाजनक आपली वृत्ति होणें हें सहाजिकच आहे. परंतु ईश्वराच्या लीलेविषयीं व जगाच्या रचनेविषयीं आपण थोडासा विचार केला, तर आपणांस कळून येईल कीं, या तिघांच्या मरणानें आपलें

जरी भयंकर नुकसान झालें आहे, तथापि हताश होऊन स्वस्थ बसण्याचें कारण नाहीं. जगाच्या इतिहासामध्यें थोर पुरुष बऱ्याच अवधींच्या अंतरानें आपणांमध्यें येतात व मोठ्या संस्थेचें बीं पेरून त्याची वाढ आपल्या सारख्या साधारण लोकांच्या हातून व्हावी म्हणून तें काम अर्धेंच टाकून जगांतून नाहींसे होतात. आपली वाढ होण्याकरितां थोर पुरुषांची जरूरी आपणांस नेहमींच लागते, असें नाहीं; आणि आपणासारख्या मध्यम प्रतीच्याच लोकांचा भरणा या जगामध्यें विशेष असल्यामुळें, महान् पुरुषांनीं आरंभिलेलें काम करण्यास जें सामर्थ्य लागतें, तें ईश्वर आपणांपासून हिरावून घेईल असें संभवत नाहीं. मात्र आपण तें काम योग्य दिशेनें करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. येशू ख्रिस्ताला त्याच्या ३२ व्या वर्षी सुळावर चढाविलें. अगदीं तारुण्यावस्थेंत असतांना शंकराचार्यांनीं समाधि घेतली. ब्राह्मसमाजाच्या इतिहासांतही महर्षि जरी ८९ वर्षांचे होऊन समाधिस्थ झाले, तरी केशव ४३ वर्षांचा असतांनाच त्याचें देहावसान झालें नाहीं काय ? सृष्टिक्रमानुसारें, मनुष्याचें या जगतांतील वास्तव्य थोडेच दिवस असणार. परंतु एकादा मोठा मनुष्य जरी निघून गेला, तरी त्याचें उदाहरण हें मागें रहातेंच. त्यापासून आपणांस सामर्थ्य व प्रेरणा होईल, अशा रीतीनें आपल्या आयुष्यास वळण लावणें हें आपल्या हातीं आहे. थोर पुरुष जे होऊन गेले, त्यांनीं आपणांकरितां हा ठेवा मागें ठेविलेला आहे. त्याला साजेसें आपलें आयुष्य करणें किंवा न करणें हें सर्वांशीं आपल्यावर अवलंबून आहे. म्हणून, आम्ही हा वाढदिवस साजरा करीत असतांना आपणांस या महात्म्यांनीं जो एक महत्वाचा धडा शिकविला आहे, तो ध्यानांत ठेवूं या. तो धडा हा कीं, जे कोणी पवित्र अंतःकरणाचे असतात, त्यांनाच ईश्वर दिसतो; वास्तविक पहातां अगदीं पवित्र होणें ही गोष्ट मानवांस शक्य नाहीं, हें खरें. तथापि तुम्ही श्रीमंत

असा, किंवा गरीब असा; विद्वान् असा, किंवा नसा; तुमच्या म्हणण्याप्रमाणें व चालण्याप्रमाणें करण्यास जे लोक तयार नाहींत, त्यांना तुमच्याविषयीं पाहिजे तें म्हणूं द्या; पण ईश्वरावर दृढ विश्वास ठेवून या जगांतील आपलें कर्तव्य करण्याचा प्रयत्न करा, व अशा रीतीनें आपलीं अंतःकरणें पवित्र करा. असें करण्यास आपण शिकलों, आणि मग जोंपर्यंत आपण असें करित आहों, तोंपर्यंत आपणांस यश प्राप्त झालें नाहीं, तरी कांहीं हरकत नाहीं. राममोहन रॉय, देवेंद्रनाथ ठाकूर व केशवचंद्र सेन यांच्या उपदेशामुळेंच आपलें कर्तव्य करण्यास आपणांस हुरूप येत आहे; ही गोष्ट आपण लक्षांत ठेवूं या, व ते आज जरी शरीररूपानें आपणांमध्यें वावरत नाहींत, तरी त्यांच्या आत्म्याची दृष्टि आपणांकडे लागून राहिलेली आहे, व त्यांनीं जें सत्य स्थापित केलें, तें आचरण्याचा आपण जोंपर्यंत प्रयत्न करूं, तोंपर्यंत, त्यांची नजर आपणांवर तशीच राहील, ही गोष्ट लक्षांत वागवून आपण धैर्य धरूं या.

---

## सध्यांची धार्मिक स्थिति.

(पुणें येथील प्रार्थनासमाजाच्या वार्षिकोत्सवामध्यें झालेल्या व्याख्यानाचा सारांश.)

मुंबईसारख्या अवाढव्य शहरांत ज्याला निरनिराळ्या चळवळींमध्यें काम करावें लागून मानसिक व शारीरिक श्रम करावे लागतात, अशा मनुष्याला सुटीचा दिवस मिळाला असतां, त्याच्या श्रमाचा परिहार होतो, त्याच्या प्रकृतीला स्वास्थ्य प्राप्त होतें, व परमेश्वराकडे त्याचें लक्ष लागतें. पुण्यापासून जवळच एका खेड्यामध्यें कांहीं दिवसांपूर्वीं, मी विश्रांतीचें सुख घेत असतां, एके

दिवशीं सकाळीं फिरावयास गेलों. मनास आल्हाद देणारी अशी ती सकाळ होती. झाडांच्या ढोलीमध्यें पक्षी मधुर गायन करीत होते. रानें आणि शेतें सूर्यप्रकाशानें प्रकाशित झालेलीं होतीं, अशा शेतांतून मी एकटाच चाललों होतों. सर्व देखावा इतका शांत व सुंदर होता कीं हलके हलके माझ्या मनांस शांति वाटूं लागली. तथापि ती जागा म्हणजे अगदीं निर्जन होती असें नाहीं. मधून मधून खेड्यांतील लोक मजजवळून जात. त्या रस्त्याच्या वळणाजवळ माझ्या पुढें एक पोक्त मराठ्याची बाई माझ्या दृष्टीस पडली. ती वारंवार आपला रस्ता सोडून जवळील रानामध्यें जाई, व कायसेंसें गोळा करून पुन्हा आपली वाट चालूं लागे. मी जेव्हां तिच्या जवळ आलों तेव्हां ती गोवऱ्या गोळा करून ठेवीत आहे असें मला आढळलें. धिमे-पणानें तिचें चाललेलें हें काम मी लक्ष लावून पहात असतां, एका धट्टया कट्टया कुणब्याचा आवाज माझ्या कानांवर पडला. त्याच्या बरोबर दोन मुलगे होते. मुलगे चांगले सशक्त व तरतरीत होते. "काम करावयाचें, आपली भाकर मिळवावयाची, आणि स्वस्थ रहावयाचें" याशिवाय या जगामध्यें आपलें दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं असें त्या कुणब्यानें आपल्या मुलांना सांगतांना मीं ऐकलें. हे शब्द त्याच्या तोंडून इतक्या स्वाभाविकरीत्या बाहेर आले कीं, त्यावरून त्या कुणब्याची जीविताविषयींची खरी कल्पना तीच असावी असें मला वाटलें. या त्याच्या बोलण्यानें माझ्या मनास दुःख झालें, व त्या मनुष्यास मीं म्हटलें "बाबारे तूं आपल्या मुलांना जीविता-विषयीं अशी निराशाजनक कल्पना कां करून देतोस. कसें तरी पोट भरल्याशिवाय या जगतामध्यें आपलें दुसरें कांहीं कर्तव्यच नाहीं काय?" तो म्हणाला, "आपण देवाचें नांव घेतलें पाहिजे." या त्याच्या बोल-ण्याला त्या बाईनें आपली संमति दर्शविली आणि ती म्हणाली, "ग्यानबा, तुझें म्हणणें बरोबर आहे. नाहीं तर, ईश्वर आपणांस

अन्न कसें देईल ?" मी मध्येंच म्हणालों, "आपण ईश्वराची नुसती आठवण केल्यानें ईश्वर आपणांस अन्न कसें देणार ?" तिनें भोळ्या भावानें व कोणाच्याही अंतःकरणामध्यें जागृति उत्पन्न होईल अशा रीतीनें उत्तर दिलें कीं, "दादा, आपण असें कां बरें म्हणतां ? आपण देवाची आठवण केली म्हणजे खोटें बोलणार नाहीं, आळशी रहाणार नाहीं, किंवा मग आपल्या हातून लांडीलबाडी कांहीं होणार नाहीं." या तिच्या भाषणानें साध्याभोळ्या लोकांमध्यें जो भाव व जी ईश्वरभक्ति असते, ती चांगल्या रीतीनें उघड झाली.

या वेळीं हा सर्व प्रकार पाहून माझ्या मनांत असा विचार आला कीं, ह्या साध्या भोळ्या लोकांत हा जो भक्तिभाव दिसत आहे, तो ठीकच आहे. परंतु आमचा जो सुशिक्षित वर्ग आहे, त्याच्याविषयींही असें म्हणतां येईल काय ? त्यांच्या मनांमध्यें तसाच भोळाभाव व तशीच ईश्वरभक्ति आहे काय ? त्या अशिक्षितांत व ह्या सुशिक्षितांत हा जो फरक दिसत आहे तो कां ? तो फक्त हिंदुस्थानासच लागू आहे किंवा सर्व जगभर हाच चमत्कार दृष्टीस पडतो ? आपण ज्या युगामध्यें रहातों, त्या युगाचा महिमा म्हणजे डळमळीत विश्वास, साशंकवृत्ति. असें समजावयाचें कीं काय ? अशा प्रकारचे विचार मनांत घोळत असतांना मी घरीं गेलों आणि माझीं पुस्तकें व माझीं टिपणें पाहिलीं; तेव्हां मला असें आढळून आलें कीं, हिंदुस्थानांतच नव्हे, तर इंग्लंड जर्मनी, फ्रान्स, रशिया आणि जपान या देशांमध्येंही हाच प्रकार आहे. विशिष्ट मतवाद, समाजसत्तावाद, संशयवाद, ऐहिकवाद, हे या युगाचें लक्षण झालें आहे. त्या देशांतील देखील मोठ्या लोकांनीं असें म्हटलें आहे कीं, मनुष्याच्या मनांतील श्रद्धेचा ऱ्हास होत चालला आहे; आणि भाव व विश्वास यासंबंधानें घोटाळा माजून राहिला आहे व त्यामुळें निराशाजनक स्थिति जिकडे तिकडे अनुभवास येत आहे, कांहीं वर्षांपूर्वी लंड-

नच्या बिशप साहेबांनीं असें बोलून दाखविलें कीं, साधारणपणें प्रत्येक इंग्रज मनुष्याचा धार्मिक भाव अलीकडे पुळपुळीत व मोघम झाला आहे, आणि कांहीं झालें तरी पैशाचा संचय करावयाचा अशी त्याला हांव सुटली आहे. बिशपसाहेबांप्रमाणें धर्मोपदेशक नव्हे, पण इंग्लंडच्या विद्याव्यासंगी लोकांमध्यें तेजस्वी व रसिक असे जे **वेल्स** साहेब ते आपल्या ( England in the Making ) या पुस्तकामध्यें म्हणतात कीं, खरा धर्म विलयास जात चालला आहे, आणि पूर्वीचें कर्मकांड तेवढें उरलें आहे. धनाचा संचय करून मानमरातब मिळविण्याकडे इंग्रजांची प्रवृत्ति आहे. कदाचित् तुम्हांस वाटेल कीं, त्यांचें हें बोलणें अतिशयोक्तीचें आहे. पण प्रसिद्ध शास्त्रवेत्ता जो **सर ऑलिव्हर लॉज** तोही बहुतेक तसेंच, ग्लॅडस्टनचें उदाहरण देऊन म्हणतो कीं, ‘ एकाद्या इंग्रज मनुष्यावर आपत्ति ओढवली असतां तो पहिली गोष्ट जी करील, ती पुस्तकें व दानधर्म यांवरील आपला खर्च बंद करणें ही होय. ’ हीच हांकाहाक राजनीतिकुशल माणसांकडूनही ऐकूं येते. मजूरपक्षाचे पुढारी जे **बर्न**साहेब ते मजुरांच्या स्थितीचें वर्णन करितांना असें म्हणतात कीं, “ ईश्वरा, आज मला काम करावें लागणार नाहीं, असा आशीर्वाद दे अशी मजुराची ईश्वराजवळ प्रार्थना असते.” लेखकांच्या लेखांमुळें आपणांस इंग्लंडची स्थिति कळून येते. दुसऱ्या देशांमध्येंही हीच स्थिति आढळून येते अमेरिकन लोकांमध्यें ऐहिक विचाराकडेच लोकांची जास्त जास्तच प्रवृत्ति होत चालली आहे, आणि धनसंचय करणें या गोष्टीचा पगडा त्यांच्या मनावर पूर्णपणें बसल आहे; तर मग, आधुनिक सुधारणा खरोखरच इतकी निराशाजनक आहे काय? ईश्वरावर विश्वास न ठेवतां खा, पी, व चैन कर, अशीच सध्यांची स्थिति आहे, असें समजावयाचें काय?

वर सांगितलेली ही एक बाजू झाली. ह्या बाजूकडेच आपली दृष्टि गेली व तीसच अधिक महत्व दिलें, तर दुसऱ्या बाजूकडे कानाडोळा होण्याचा संभव आहे. देशाभिमानाच्या खोट्या कल्पनामुळें पुष्कळ लोक म्हणतात कीं, सर्व मोठे धर्म हे आमच्या पूर्वेकडील देशामध्यें जन्मास आले आणि म्हणून पूर्वेकडील लोक निर्वृत्तिमार्गी किंवा परमार्थवादी व पश्चिमेकडील लोक केवळ देहात्मवादी होत. परंतु हा ग्रह ठीक नाहीं. पश्चिमेकडील सर्वच लोक देहात्मवादी किंवा अनीश्वरवादी आहेत असें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें व आपल्याकडे भलताच अधिकार घेणें होय. खरोखर पहातां कोणत्याही काळीं किंवा कोणत्याही देशामध्यें ईश्वरानें असा अन्याय कधींही केलेला नाहीं. आपण ज्या काळामध्यें रहातों तो काळ असा धर्मविन्मुख म्हणून आपण निरुत्साही होण्याचें किंवा आपला राग बिचाऱ्या काळावर काढण्याचें कांहीं कारण नाहीं. आजची स्थिति पाहून लाजेनें मान खालीं घालण्याची आपणांस मुळीं जरूरी नाहीं. खरोखर पहातां, आधुनिक सुधारणेवर कित्येक ठिकाणीं जरी डाग दिसून येतात, तथापि न्यायनिष्ठेचा सूर्य सर्वत्र प्रकाशित आहे. यथास्थानदृष्ट्या आपण अशा वादात्मक प्रश्नांकडे पाहिलें पाहिजे, म्हणजेच मग हा जो काळोख, तो वरवरचा आहे हें आपणांस समजेल.

हिंदुस्थानांतील चांगल्या चांगल्या लोकांच्या मनांवर आपण विशिष्ट मतानुयायी आहों ह्या तत्त्वाचा अम्मल झालेला दृष्टीस पडतो, व त्यामुळें प्रत्येक धर्म, प्रत्येक जात व प्रत्येक पंथ आपआपल्या कल्याणाच्या खटपटींत गुंतलेला दिसतो. असा एक काळ पूर्वीं होता, त्या वेळीं असें वाटत होतें कीं, सर्व लोकांचा संबंध अगदीं निकट होत चालला आहे व एक राष्ट्र बनण्यास आतां उशीर लागणार नाहीं. ती आशा तूर्त नाहींशी झाली आहे; तथापि धर्मांधर्मांमधील

या भांडणाच्या योगें असा सिद्धांत निघतो कीं, लोकांच्या मनामध्यें जागृति उत्पन्न झाली आहे आणि त्यांना वाटूं लागलें आहे कीं, आपला धर्म खरा म्हणून ठरविणें झाल्यास, तो उजेडांत आणून त्याचा खरेपणा स्थापन करावयास पाहिजे. आमचा एकच धर्म काय तो खरा, देवानें उपदिष्ट व तो सर्वस्वीं प्रमाण अशी कोणालाही घमेंड आजच्या कालीं मारतां येणार नाहीं. आतां असें कळून चुकलें आहे कीं, प्रत्येक धर्मामध्यें चांगलें म्हणून कांहीं आहेच आणि ईश्वराची लीला सर्व धर्मांमध्यें दिसून येते. तुमच्या, माझ्या व सर्वांच्या हातून ईश्वर आपलें धर्मशास्त्र लिहवीत आहे, ही गोष्ट आपण लक्षांत घेतल्यास निराशेस जागा रहणार नाहीं.

दुसऱ्या पक्षीं, असें दिसतें कीं सध्यां लोकांची दृष्टि ऐहिक गोष्टीं-कडेच फार आहे, आणि शाश्वतच्या गोष्टी प्राप्त करून घेण्यापेक्षां सुख व आराम हें मिळविण्याकडेच लोकांच्या मनाचा कल दिसतो. परंतु उलट पक्षीं असेंही म्हणतां येईल कीं, या जगामधील आपल्या जीविताची खरी किंमत काय आहे, हें अजमावण्याकरितांच हा प्रयत्न आहे. पूर्वीं आमची अशी कल्पना होती कीं, ईश्वराचें वसति-स्थान स्वर्गलोकामध्यें आहे. जणूं काय, इतिहासामध्यें व साधारण लोकांच्या चारित्रांमध्यें ईश्वरानें आपलें स्वरूप कधीं प्रकटच केलेलें नाहीं. पण नरक व स्वर्ग या एकमेकांपासून दूरच्या जागा आहेत असें समजणें चुकीचें आहे, हें आतां आम्हांस कळूं लागलें आहे. नरक व स्वर्ग आपल्याजवळ, आपल्यामध्यें व सर्वत्र आहेत. आत्मा अमर असल्यामुळें परलोक आहे, ही गोष्ट खरी; परंतु प्रत्येकाच्या स्वर्गलोकास येथेंच सुरुवात झाली पाहिजे, या गोष्टीकडे कानाडोळा करून चालावयाचें नाहीं.

समाजसत्तावादाची जी एक चांगली बाजू आहे, ती ही होय कीं, प्रत्येक मनुष्याचा कांहीं ना कांहीं उपयोग आहे. विभूति व

विभूतिपूजा हीं नेहमीं रहाणारच; पण मुख्यतः ज्या लोकांचें हें जग बनलें आहे, अशा साधारण मनुष्याची किंमत दृष्टिआड होऊं देतां कामा नये. ज्या गोष्टींमध्यें इतरांस अपयश आलें, त्या गोष्टींत **डार्विन**ला यश प्राप्त झालें; तेव्हां त्याची स्तुति लोकांनीं चालविली असतां **डार्विन**नें उत्तर दिलें कीं, मीं जो हा शोध लाविला आहे त्याचें श्रेय, ज्या लोकांनीं माझ्या पूर्वी अमोल प्रयत्न केले, त्यांस आहे.

समाजसत्तावाद किंवा ऐहिकवाद यांचें प्राबल्य आपल्या देशांत ह्मणण्यासारखें नाहीं, पण त्यांच्या एका अंगाचा परिणाम आपल्याकडील सुशिक्षितांवर झालेला दिसतो. तो नास्तिकपणा होय. आतां नास्तिकनास्तिकपणामध्यें फरक आहे. आपण कोण आहों, आपण काय आहों, आपण कोठून आलों, आपल्याला कोठें जावयाचें, अशा प्रकारचे संशय सोडविण्याचा आपण प्रयत्न केला तर आपल्या मनाची वाढ होईल. सत्य शोधण्याकरितां जे संशय मनामध्यें उत्पन्न होतात, त्यांच्यावर प्रकाश पाडण्याची जे लोक खटपट करितात, त्यासंबंधानें **टेनिसन** म्हणतो:—

"Believe me there is more faith in honest doubt than in half the creeds."

संशय उत्पन्न झाले असतां त्यांच्याशीं झगडणें हा गुण मनुष्यांमध्यें श्रेष्ठ आहे. अशा प्रकारची वृत्ति साध्या स्वभावाच्या **चार्लस डार्विन**ची होती, आणि अशा प्रकारची वृत्ति आपणांस वंदनीय होते. परंतु जगाशीं बेपर्वाईनें व तुसडेपणानें रहाणें ही वृत्ति फार भयंकर आहे. सध्यांच्या पिढीला लागलेली ही एक प्रकारची कीड होय. पहिल्या प्रकारचा जो नास्तिकपणा त्याला विरोधभक्ति म्हणतां येईल. कारण ज्या लोकांमध्यें ही विरोधभक्ति असते, त्या लोकांविषयीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं:—

' God says, come and reason with me; so that I may reveal myself to you in the end.'

याचा अर्थ असा आहे कीं, विचारपूर्वक स्वीकृत जो नास्तिकवाद किंवा संशयवाद तो पुरवला; तो पुढें मागें मनुष्यास देवाची, धर्माची ओळख करून देण्यास कारण होतो. परंतु बेपर्वाईची वृत्ति अनिष्ट होय आणि तीच हल्लीं बरीच आढळून येते.

असें आहे तरी एकंदरींत निराश होण्यास कोणत्याही प्रकारें जागा नाहीं. आमचा असा विश्वास आहे, आम्हांस अशी उमेद आहे कीं, आम्ही कामें करून हा तुसडेपणा घालवूं. शुद्धभक्ति, शुद्धभाव, शुद्ध प्रेम यांची ध्वजा फडकावूं; देवाची ओळख साधुसंतांच्या सहाय्यानें अशा लोकांस करून देऊं; व अशा आमच्या प्रयत्नांस परमेश्वर खात्रीनें यश देईल अशी आम्हांस उमेद आहे.

---

## एकांतवासाची आवड.

वाळूनियां जन सांडी मज दुरी ।
करिसील हरि ऐसें कधीं ॥ १ ॥
आठवीन पाय धरुनि अनुताप ।
वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥ २ ॥
नावडती जीवा आणीक प्रकार ।
आवडी ते फार एकांताची ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी धरितों वासना ।
होई नारायणा साह्य मज ॥ ४ ॥

आपल्या सामाजिक, नैतिक किंवा राजकीय प्रगतीच्या इतिहासाचा आपण शोध करण्याचा प्रयत्न केला तर आपणांमध्यें होऊन गेलेल्या थोर पुरुषांचीं चरित्रें व जुने इतिहास

यांची मोठी उणीव आहे ही गोष्ट आपणांस कळून येईल. अशा प्रकारची सामुग्री उपलब्ध नाहीं, तेव्हां तो इतिहास शोधून काढण्यास आपणांपाशीं एकच साधन उरलें आहे, तें हें कीं, आतां आपण जो अभंग गाइला त्यासारखे आपल्या संतांचे अभंग आपणापाशीं आहेत. थोर पुरुषाच्या चरित्रांवरून, त्याचें शील कसें बनत गेलें, त्याला कोणकोणते अडथळे मध्यें आले, त्याला दुर्विकारांनीं कसकसें गांजिलें व शेवटीं त्यानें त्यांच्यावर जय कसा मिळविला हें आपणांस समजतें. एकंदरींत थोर मनुष्याच्या चरित्रामुळें त्याच्या आयुष्यांतील एक दोन विशेष गोष्टी स्पष्टपणें आपल्या ध्यानांत येतात. त्या गोष्टींचा आपण ध्यास लावून घेतला, तर त्यामुळें आपला खात्रीनें फायदा हा होणारच. **ग्लॅडस्टन**साहेबासारख्या प्रसिद्ध मुत्सद्याच्या बहुविध अमदानींतही ते आपलीं लहानमोठीं सर्व कृत्यें फक्त एक दोन तत्त्वांच्याच अनुरोधानें करीत असत हें आपणांस आढळून येतें. तीं तत्वें म्हणजेः—त्यांचा मनुष्यजातीच्या प्रगतीवर पूर्ण विश्वास होता, मनुष्यमात्राविषयीं त्यांच्या अंतःकरणांत प्रेम वसत होतें, व सद्‌गुणाच्याच योगें राष्ट्राची उन्नति होते या गोष्टींवर त्यांचा दृढ विश्वास होता.

आपलें हें दुर्दैव कीं तुकोबाचें चरित्र उपलब्ध नाहीं. म्हणून अशा प्रकारचा अभंग आपल्या जेव्हां वाचण्यांत येतो तेव्हां आपली निराशा होते व आपल्या स्वतःलाच आपण प्रश्न करितों कीं सर्व लोकांचा जो तुका त्यानें मनुष्यजातीविषयीं धिःकारयुक्त वाणी काढावी व जणूं काय रक्तपित्यांनींच सर्व जग भरलें आहे असें म्हणून त्याच्यापासून दूर रहा असा उपदेश करावा हें शक्य तरी कसें आहे ! या मोठ्या साधूच्या या निराशवृत्तीचा उलगडा होण्यासारखा नाहीं असें प्रथम वाटतें, म्हणून आपल्या तोंडून असा प्रश्न निघतो कीं ‘ अशा प्रकारचे उद्गार तुकोबाच्या तोंडून निघाले

त्या वेळीं त्यांच्या मनाची वृत्ति कोणत्या प्रकारची होती ? व दुसऱ्या पुष्कळ अभंगामध्यें ते मनुष्यजातीविषयीं मोठ्या आस्थेनें बोलतात, तेव्हां त्या अभंगांचा व या अभंगाचा मेळ बसवावयाचा कसा !' तुकोबा एकांती न राहतां लोकांच्या सहवासांत राहत असत ही गोष्ट प्रसिद्ध आहे. आपण आतां जो अभंग गाइला त्यामध्यें तुकोबानें जे निराशेचे उद्गार काढले, तशा प्रकारची वृत्ति, लहान मोठे आपण सर्व जण त्यांची आयुष्यांतून एकदां होत असते. आपणांसारख्या साधारण मनुष्यांच्या आयुष्यक्रमामध्यें काय आढळून येतें? आपल्या उपकाराची फेड जेव्हां अपकारानें होते किंवा सत्य बोलत असतांना आपलाच छळ होतो तेव्हां आपणांस जगाचा कंटाळा येत नाहीं कां ? अशा प्रसंगीं, जगाशीं संबंध न ठेवतां एकांतवासामध्यें मनुष्यानें आपलें आयुष्य घालवावें असें आपणांस वाटत नाहीं काय ? ज्याच्या म्हणून मनाला संवेदना होतात, अंतःकरणाला द्रव येतो व आत्म्याला चेतना होते अशा मनुष्याच्या मनांत या प्रकारचे विचार उद्भवलेच पाहिजेत. पण, ज्याला खा, पी व चैन कर या पलीकडे कांहीं दिसत नाहीं, जो कधीं विचार करीत नाहीं, किंवा उद्योग करीत नाही त्याला वरील प्रसंगाचें कांहींच वाटत नाहीं.

ज्याला जगाचा कंटाळा येऊन ज्यानें एकांतवास पत्करला आहे, अशा साधारण माणसाचें आपण उदाहरण घेऊं. एकांतवासाचा शेवटीं त्याजवर कसा परिणाम होतो तो पहा. एकांतवास पत्करणाऱ्या मनुष्यानें त्याच्या अंतःकरणांत सुरू असलेली तळमळ तशीच चालू ठेविली तर खात्रीनें त्याची स्थिति सुधारतच जाईल. कारण, एकांतवासामध्यें आपलें आयुष्य घालवावयाचें असा निश्चय केल्यानंतर त्या मनुष्यास आढळून येईल कीं, जगास सोडून गुहेमध्यें राहिल्यानें कांहीं खरा एकांतवास प्राप्त होत नाहीं. एकांतवासामध्यें असतांनाही आपल्यामध्येंच दुसरें एक जग आहे व

त्या जगामध्यें पहिल्या जगाप्रमाणें अनेक अडचणी, अनेक मोह, व अनेक पापें आहेत असें त्याला आढळून येतें. समाजाचा त्याग केल्याबरोबर सर्व वाईट गोष्टींचा नायनाट झाला असें न होतां त्याला अधिक भयंकर युद्ध करावें लागतें ही गोष्ट त्याला समजते. त्याच्या मधील दुर्विकारांशीं याप्रमाणें त्याचा झगडा सुरू झाल्यावर बाहेरच्या गोष्टी प्रथम वाटल्या तितक्या खास वाईट नाहींत असें त्याचें त्यालाच वाटूं लागतें. याप्रमाणें आपल्या एकांतवासामध्यें तो आपल्या स्वतःचें चिंतन करीत असतां त्याच्या आत्म्यावर नवीन प्रकारचा प्रकाश पडतो व जगाशीं संबंध तोडला ह्यामध्यें आणखी चूक केली हा धडा त्याला मिळतो. कारण आपल्यामधील स्वतंत्र असें जें जग तें चांगलें किंवा वाईट करणें आपल्या हातीं आहे ही गोष्ट त्याला आढळून येत नाहीं काय? आपल्या एकांतवासामध्यें त्याला अशा प्रकारचा नवीन प्रकाश प्राप्त झाल्यावर आपण जगाचा द्वेष केला, ही मोठी चूक केली व अशा प्रकारचा द्वेष करण्यास आपल्या स्वतःच्या मनानेंच आपला गैरसमज करून दिला असें त्याला वाटतें. याप्रमाणें शेवटीं त्याचा असा ग्रह होऊन जातो कीं, आपल्यासंबंधानें, इतर मनुष्य जातीसंबंधानें व ईश्वरासंबंधानें आपलें जें या जगांतील कर्तव्य, तें जगाशीं संबंध तोडून साध्य होत नाहीं, तर आपल्या नशीबीं जें जें आहे तें तें धैर्यानें सहन केल्याच्या योगें, आपल्या शीलाचें पोषण केल्याच्या योगें व दुसऱ्यांस आदर्शवत् होईल, असें चोख आपलें वर्तन ठेविल्यानेंच साध्य होणार आहे.

थोर पुरुष, ते ज्या लोकांमध्यें जन्मास येतात, त्या लोकांचींच प्रतिबिंबें, पण मोठ्या प्रमाणावर असतात. त्या थोर पुरुषांमध्यें त्यांच्या वेळच्या लोकांचे सद्गुण किंवा दोष मोठ्या प्रमाणानें प्रति-बिंबित असतात. म्हणून तुकोबाचा हा जो अभंग, त्यामध्यें तुकोबा

आपणांसारख्या साधारण मनुष्यांच्या मनाला ज्या संवेदना होतात, त्यांचाच उल्लेख मोठ्या जोरानें करिताहेत तुकोबाला कसकशी ओढाताण करावी लागली, त्यांनीं जगाचे टक्के टोणपे कसे सहन केले हें जग पापांनीं, व दुर्विकारांनीं भरलेलें आहे, हें पाहून त्यापासून दूर पळून जाण्याचा त्यांना कसा मोह पडला, एकांतवास पत्करल्यानंतर आपली चूक त्यांना आढळून येऊन ते परत जगामध्यें कसे आले, या गोष्टी या अभंगावरून आपणांस कळून येतात. जगाचा त्याग करावयाचा, ही वृत्ति सर्व साधूंमध्यें साधारणपणें दिसून येते. उत्साहभरित वृत्तीनें एकांतवास पत्करल्यानंतर येशू ख्रिस्ताला सैतानाबरोबर कसें झगडावें लागलें व त्या भांडणामधून यशस्वी झाल्यावर तो परत जगांत कसा आला व आपल्या प्रभूचा उपदेश करण्यास त्यानें कशी सुरुवात केली, या गोष्टी आपणांस चांगल्या अवगत आहेत.

त्याचप्रमाणें,आपल्या राज्यैश्वर्याचा बुद्धांनीं त्याग करून एकांतवासाचा आश्रय करण्याकरितां त्यांनीं आपली बायको, आपलें मूल व राजवाडा यांना कसें सोडून दिलें, हेंही आपणांस माहीत आहे. पुढें त्या एकांतवासांतूनच मनुष्यजातीची मुक्तता करणें ही कामगिरी घेऊन ते परत आले, हेंही आपणांस माहित आहे. साधूंची स्वतंत्र बाण्याची वृत्ति असते म्हणून प्रथम त्यांना लोकांचा सहवास सहन होत नाहीं; पण जगापासून दूर गेल्यावर ते आपल्या स्वतःलाच प्रश्न करितात कीं, आपण जगाचा त्याग करून हा एकांतवास कां स्वीकारिला? तेव्हां ईश्वर त्यांच्या अंतःकरणांत उदित होऊन त्यांना म्हणतो, ' मुक्ति मिळावी अशी तुमची मोठी इच्छा आहे, पण ज्या समाजामध्यें मीं तुम्हांस उत्पन्न केलें आहे, त्यापासून दूर पळाल्यानें कां ती तुम्हांस मिळणार आहे? जगांतील वाईट गोष्टींविषयीं तुमची तक्रार आहे; पण

तुम्ही स्वतः किती वाईट आहां, हा प्रश्न तुम्हीं कधीं स्वतःस केला आहे काय ? तुम्ही वाईट आहां म्हणून हें जगही तुम्हांस वाईट दिसतें व म्हणून तुम्ही तें सोडून दूर जातां; हा तुमचा भ्याडपणा होय. पुन्हां जगामध्यें परत जा आणि शूर शिपायाप्रमाणें पापाविरुद्ध झगडा करा. ' या रीतीनें त्यांना समजून येतें कीं, मनुष्याचें अंतःकरण जरी पापानें व वाईट गोष्टींनीं भरलेलें आहे, तथापि, त्याला वाईट गोष्टींविरुद्ध लढण्यास लावून चांगलें वळण लावलें तर तें सर्वांना आल्हादित करील व सर्वांची मुक्तता करील. याप्रमाणें **तुकाराम, जीसस,** व **बुद्ध** यांना एकांतवासामध्यें नवीन प्रकाश प्राप्त होऊन त्यांना आपआपली कामगिरी करण्याविषयीं प्रेरणा उत्पन्न झाली. या रीतीनें साधु जनांतून एकांतवासामध्यें जातो व पुन्हां जनांमध्यें येतो साधुत्व अशा रीतीनें प्राप्त होतें. वरील अभंगांत तुकोबानें जे विचार प्रदर्शित केले आहेत त्या विचारांचा अनुभव घेतल्यावरच दुर्विकारांशीं झगडण्यास चांगल्या प्रकारें सज्ज होऊन ते परत जनांमध्यें आले असले पाहिजेत; त्यांची या जगांतील जी कामगिरी, त्या कामगिरीचा व वरील अभंगाचा अशाच रीतीनें आपणांस मेळ बसवितां येतो.

---

## ईश्वरचिंतन.

चिंतनासी नलगे वेळ । सर्वकाळ करावें ॥
सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥
पढिये सर्वोत्तम भाव । इतर वाव पसारा ॥
ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥

या अभंगांत तुकोबा म्हणतात, ईश्वराचें चिंतन करावयास ठराविक वेळेची जरूरी आहेच असें नाहीं. तें केव्हांही

करतां येतें. ज्या मुखानें हरीच्या नांवाचा नेहमीं घोष केला जातो, तें मुख मंगल, पवित्र होय. आयुष्यांतील उत्तमोत्तम जे भाव ते समजून घ्यावेत. बाकीच्या सर्व गोष्टी पसाऱ्यादाखल म्हणजे व्यर्थ होत. याप्रमाणें या अभंगांत सर्व लोकांस उद्देशून तुकोबांनीं उपदेश केला आहे.

साधु किंवा कवि यांचीं वचनें व प्रसिद्ध तत्त्ववेत्ते किंवा मुत्सद्दी यांचे जर ग्रंथ वाचले किंवा त्यांचें अध्ययन केलें तर प्रत्येक पुस्तकामध्यें निरनिराळ्या प्रकारच्या मालाचें भांडार विक्रीकारितां आपणांपुढें ठेविलें आहे, म्हणजे ते आपणांस एकच उपदेश करितात असें नव्हे, तर अनेक उपदेश करितात, असें वाटण्याचा संभव आहे; परंतु हें खरें नाहीं. कारण आपण **मिल्टन** किंवा **वर्डस्वर्थ, गेटे** किंवा **रस्किन** अशासारख्या विद्वान् ग्रंथकारांच्या ग्रंथांचें अध्ययन केलें, तर त्यांमध्यें आपणांस काय आढळून येतें ? त्यांनीं निरनिराळ्या प्रकारचे उद्गार काढून किंवा अनेक उपमा देऊन आपले विचार प्रदर्शित केलेले आहेत खरे, तथापि असा एक मध्यबिंदु त्यांच्या विचारांमध्यें असतो कीं, त्यासभोंवतीं त्यांचे सर्व उपदेश गुरफटून राहिलेले असतात, व त्यांनीं निरनिराळ्या विचारांचा खल करण्यामध्यें कितीही परिभ्रमण केलें, तरी शेवटीं त्या सर्व विचारांचें पर्यवसान त्या मध्यबिंदूमध्यें झालेलें असतें. ह्या ग्रंथकारांपैकीं कित्येकांविषयींचा विचार आपण स्वतंत्रपणें करूं. आपलें ‘ Paradise Lost ’ हें काव्य गात असतांना किंवा ‘ Areopagitica ’ लिहित असतांना मिल्टननें उत्तम वळणाच्या उत्कृष्ट स्वातंत्र्याचा पुरस्कार केलेला आहे. आपल्या लहान लहान काव्यांमध्यें, त्याप्रमाणेंच ‘ Excursion ’ या काव्यामध्यें **वर्डस्वर्थनें** आपल्याला उपदेश केला आहे कीं, आपणांस सृष्टीपासून पुष्कळ शिकण्यासारखें आहे. आपल्या दुर्विकारांवर

जय प्राप्त करून घेऊन मनुष्यांना उन्नत स्थिति कशी प्राप्त करून घेतां येते, हें गेटेनें आपल्या सर्व ग्रंथांमध्यें सांगितलें आहे. 'जीवित स्वारस्य ' ( Art in life ) हाच एक रस्किनचा विषय होता.

विद्वान् लोकांची जी ही गोष्ट, तीच नैतिक जगासही लागू आहे. कोणत्याही देशच्या किंवा कोणत्याही काळच्या साधूसंतांचा उपदेश एकाच विषयासंबंधानें असतो. वर दिलेल्या तुकोबाच्या अभंगांतील उपदेश असा आहे कीं तुम्ही ईश्वरास नेहमीं चिकटून रहा, त्याचेंच सदा चिंतन करा:—

" Love the Lord thy God with all thy mind and all thy heart and all thy soul' असा ख्रिस्ताचाही उपदेश आहे. या सर्व उपदेशांचें सार हें कीं ईश्वर हा तुमच्या सर्व जीवनाचा मध्यबिंदु करा. याच एका धोरणास अनुसरून साधु निरनिराळ्या रीतींनीं उपदेश करित असतात. तुम्ही म्हणाल कीं जगाविषयीं तिरस्कारानें बोलणें व ईश्वर आपल्या सर्व जीवनाचा मध्यबिंदु करा, असा उपदेश करणें हें साधूंना ठीक आहे; कारण, त्यांना जगाशीं कांहीं कर्तव्य नसतें. परंतु आमच्याविषयीं म्हणाल तर आम्हांस या जगामध्यें रहावयाचें असतें व आमचा उद्योगधंदा संभाळून आमच्या कुटुंबांचें पोषण करावें लागतें याकरितां सदां ईश्वरचिंतनाशिवाय दुसरें कांहींही करूं नका, हा उपदेश अगदीं मूर्खपणाचा नसला तरी आम्हांस अशक्य आहे खास. कधीं मधीं ईश्वराचें स्मरण करा, असें जर कोणी आम्हांस सांगेल तर तें पुरेसें आहे व आम्हांस तें पटेलही. ह्या आक्षेपकांचें मुख्यत: असें म्हणणें असतें कीं, आम्ही ज्या सध्यांच्या स्थितीत आहों, त्या स्थितीमध्यें नेहमीं ईश्वरास चिकटून रहा ' ही जी साधूंची शिकवण त्या शिकवणीप्रमाणें वागणें आम्हांस अशक्य आहे. आमचा व आमच्या कुटुंबांचा

चरितार्थ चालविण्याकरितां आम्हांस उद्योगधंदा करावा लागतो, म्हणून वरील गोष्ट आम्हांस करा म्हणून सांगणें हें अविचाराचें नव्हे काय? ह्या आक्षेपकांस थोडक्यांत असें सांगतां येतें कीं, प्रत्येक मनुष्याचें पहिलें कर्तव्य आपला स्वतःचा धंदा संभाळून रहाणें हें होय, यांत संशय नाहीं. कोणत्याही साधूनें या गोष्टीची हयगय करा असा कधींही उपदेश केलेला नाहीं. आमच्या तुकोबांनीं तर 'बांधीं सोपे माड्या घर' असा स्पष्ट उपदेश केला आहे. परंतु जीवनाचे एकंदर सर्व हेतु सफल होण्यास पोट भरण्याकरितां धंदा करणें या एकाच गोष्टीची आवश्यकता आहे काय? एवढ्यानेंच जीविताची इतिकर्तव्यता संपते काय? जीवित सुखी करण्यास एकटा धंदाच पुरा आहे काय? अन्न मिळवून चरितार्थ चालविला म्हणजे मनुष्य सुखी होतो असें नाहीं. आपण आपला उद्योगधंदा केल्यानंतर व शरीराला सुख देणाऱ्या पदार्थांचा उपभोग घेतल्यानंतर या उद्योगधंद्याहून अगदीं निराळ्या अशा गोष्टींची इच्छा आपण करित नाहीं काय? मनुष्याचा स्वभावच असा आहे कीं, त्याला कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या मनोरंजनाच्या साधनाची जरूरी आहे, म्हणूनच दिवसाचें काम संपल्यानंतर आपल्या धंद्याव्यतिरिक्त अशा आपल्या आवडीच्या विषयाच्या पाठीमागें मनुष्य लागत नाहीं काय? कोणास गायनवादनाची गोडी असेल, तर कोणास चित्रकलेची हौस असेल, त्या त्याप्रमाणें तो त्या विषयाकडे लक्ष लावतो. विषयाची निवड ही त्या त्या व्यक्तीच्या आवडीप्रमाणें भिन्न भिन्न असते; परंतु प्रत्येक जणाला आपल्या धंद्याव्यतिरिक्त करमणुकीच्या साधनाची जरूरी हीं भासतेच भासते. आपल्या धंद्यास दुसऱ्या कोणत्या तरी गोष्टीची जोड मिळाल्याशिवाय मनुष्यास आपलें जीवित अपुरें वाटतें. दुसरी ही जी गोष्ट त्याला आपण आवडीचा विषय ( Voluntary purpose ) असें म्हणूं. मनुष्य

आपल्यास ज्या प्रकारची संवय लावून घेतो, याप्रमाणें हा विषय चांगला असेल किंवा वाईट असेल. या आयुष्यामध्यें सुखाच्या मानानें दुःखें फार आहेत, असें आपण घटकाभर मानूं. आपणांवर अनेक प्रकारच्या आपत्ति ओढवतात, संकटें येतात व त्यामुळें अनेकदां आपणांस हताश व निराश व्हावें लागतें, म्हणून आपली अशी तयारी असावी कीं, संसारांतील सर्व प्रकारच्या आपत्तीशीं टक्कर देण्यास आपणांस सामर्थ्य प्राप्त व्हावें; आपल्या संपत्कालीं किंवा विपत्कालीं दुःखांत असतांना किंवा सुखांत असतांना आपल्या मनाचा समतोलपणा आपणांला राखतां यावा. बाहेरच्या गोष्टींवर जें सुख अवलंबून असतें, तें किती झालें तरी अनिश्चित असतें. जीवनक्रमाची थोडी घडी बिघडली कीं तें डळमळावयास लागतें. एखाद्या मनुष्यास गायनवादनाचा फार शोक आहे, अशी आपण कल्पना करूं या. सुखप्राप्तीचें काय तें एवढेंच साधन असें त्याच्या मनानें घेतलें आहे, परंतु याच मनुष्याचें अंतःकरण दुःखानें विव्हल झालें असतांना त्याला उत्तम प्रकारचें गाणें-ही कर्णकटु बाबत वाटत नाहीं काय ! यावरून हें उघड आहे कीं, आपल्या धंद्यास वर सांगितलेल्या प्रकारच्या गोष्टींची जोड असली तरीसुद्धां जीवनाची इतिकर्तव्यता संपत नाहीं.

तर आपलें जें प्राप्तव्य त्याचा शोध आपण कोठें बरें करावयास पाहिजे ? आपल्या धंद्याच्या योगें किंवा आपल्या आवडीच्या विषयानें आपणांस जें सुख प्राप्त होतें, त्यापेक्षां निराळ्या प्रकारचें व चिरकाल टिकणारें असें सुख आपणांस कसें व कोठून प्राप्त होणार ? याचें थोडक्यांत उत्तर द्यावयाचें म्हणजे तें सुख आपल्या अंतःकरणांतून झालें पाहिजे. आपल्या अंतःकरणामध्यें असा एक गुप्त ठेवा ईश्वरानें ठेविला आहे कीं त्या योगें आयुष्यांतील कोणत्याही प्रकारच्या स्थितीविषयीं आपण निर्धास्त असतो व

कोणत्याही स्थितींत उद्भवलेल्या व कशाही प्रकारच्या आयुष्यांतील युद्धाशीं सामना करावयास आपणांस धैर्य प्राप्त होतें. आपणांस हा सर्व साधारण नियम चांगल्या रीतीनें अवगत आहे, कीं पूर्णामध्यें अंशाचा समावेश होतो, पण अंशामध्यें पूर्णाचा होत नाहीं; म्हणून वीरांप्रमाणें आयुष्यांतील युद्धांशीं झगडण्याची आपली इच्छा असेल तर हा गुप्त ठेवा आपल्या आयुष्यांतील मुख्य भाग आपण करावयास पाहिजे. तुकोबाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ‘ चिंतनासी नलगे काळ । सर्वकाळ करावें. ’

आपला व आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालविण्याकरितां आपणांस जगिक व्यवहार करावा लागतो. तुकोबानें किंवा दुसऱ्या कोणत्याही साधूनें आपण तशा प्रकारच्या जबाबदारीची हेळसांड करून उपाशीं मरावें, असा केव्हांही उपदेश केलेला नाहीं.

प्रथम भाव शुद्ध कर । अंगीं वैराग्याचा भर ॥
भक्ति पाहिजे शिरजोर । याहुनि योग कोणता ॥
नको त्यजूं स्त्रिया पोर । बांधीं सोपे माड्या घर ॥
आल्या अतिथा आदर । याहुनि धर्म कोणता ॥
करी नामाचा गजर । जाणे संताची कदर ॥
तुका म्हणे तोचि नर । ब्रह्मज्ञानी पुरता ॥

तुकोबांनीं ह्या अभंगांत या बाबतींत आपलें कर्तव्य काय आहे, तें करण्याचा आपणांस उपदेश केला आहे. परंतु, आपला व आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालविण्याकरितां धंदा करावयाचा, ही गोष्ट आपल्या आयुष्याचें एक साधन न समजतां तीसच आपलें ध्येय किंवा अंतिम साध्य समजल्याच्यायोगें आपली अवनति होण्याचा संभव आहे. आपल्या चरितार्थाचा धंदा करीत असतांना आपणांस अडचणी उत्पन्न होतात व निराशा

होते, म्हणून त्यांपासून आपलें संरक्षण होण्यास मनास एक प्रकारची संवय हवी आहे. याकरितां आध्यात्मिक वृत्तीचा आपण स्वीकार केला तरच आपल्या मनास असें वळण लागेल कीं, त्या योगें संसारांतील अडचणी व निराशा यांची आपणांस कांहींसुद्धां दिक्कत वाटणार नाहीं. तुकोबा म्हणतात, अशा प्रकारच्या दैवी वृत्तीनें प्रेरित होऊन तुम्ही आपल्या चारितार्थाचा उद्योग करा किंवा आपल्या आवडीच्या विषयाच्या पाठीमागें लागा. अशा प्रकारची वृत्ति बाणली म्हणजे मग तुमचें सर्व कांहीं ठीक होईल. त्यायोगें तुमच्या मनास स्वास्थ्य प्राप्त होईल व जगाशीं व्यवहार करतांनाही त्या स्वास्थ्याचा भंग होणार नाहीं; आणि जगिक व्यवहार करतांना ज्या आध्यात्मिक बलाची व समाहित वृत्तीची अत्यंत जरूरी आहे तें आध्यात्मिक बल व ती समाहित वृत्ति तुम्हांस प्राप्त होईल. दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे सुख हें जसें आपल्या मनावर अवलंबून आहे, तसें बाह्य वस्तूंवर नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवा. तुमच्या स्वतःच्या मनानेंच तुम्हांस स्वर्गाचा नरकवास व नरकवासाचा स्वर्ग बनवितां येतो, ‘ मन हेंच सर्वस्व आहे, ’ असें बुद्धाचें वाक्य आहे. अंतःकरणांत दृढ भाव धरून व ईश्वराचे ठिकाणीं पूज्यत्वबुद्धि ठेवून त्याचें ध्यान करण्यांत तुमचें मन मग्न होऊं द्या. बाहेरची वाढ जी व्हावयाची ती आंतून होऊं द्या व नंतर जगिक उद्योग करावयास लागा, असा तुकोबाच्या उपदेशाचा आशय आहे. आपली व आपल्या कुटुंबाची हयगय करून व संसारांतील इतर गोष्टींची हेळसांड करून नाममंत्राचा नुसता जप करीत स्वस्थ बसा, असें तुकोबा सांगत नाहींत; पण त्यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ इतकाच कीं, जगिक व्यवहार हेंचें तुमच्या आयुष्याचें अंतिम प्राप्तव्य करूं नका. ‘ आधीं कळस मग पाया ’ अशी स्थिति होऊं देऊं नका. दैवि वृत्ति संपादन करा व

तुमचा धंदा करीत असतांना किंवा दुसरी कांहीं गोष्ट करित असतांना त्या दैविवृतीस तुम्ही आपल्या जहाजाचें सुकाणूं बनवा. वरील या उपदेशाचा पाया आपल्या मजबूत व्यवहारज्ञानावर रचलेला आहे. याचा अर्थ काय ? जो आपल्या प्राप्तव्याकारितां सर्वस्व खर्च करतो, त्याला तें मिळतें. विद्वान् व्हावें म्हणून जो मिल्टनचे ग्रंथ वाचतो तो विद्वान् होत नाहीं, तर मिल्टनवर ज्याचें प्रेम आहे व जो आस्थेनें त्याचें कौतुक करून त्याला चहातो व त्याच्या ग्रंथांचें अध्ययन करतो तो विद्वान् होतो. दुसऱ्या प्रकारचा विद्यार्थी मिल्टन वाचण्यामध्यें तन्मय होतो. म्हणून मिल्टनच्या ग्रंथांमध्यें त्याचा शिरकाव होतो. दुसरें उदाहरण घ्या. कोणत्याही विशिष्ट विषयामध्यें ( Special culture ) प्राविण्य मिळविलेल्या मनुष्यापेक्षां सर्व साधारण संस्कृती (General culture) चा मनुष्य आयुष्यांतील प्रसंगाशी टक्कर देण्यास अधिक लायक असतो. आध्यात्मिक वृत्ति जिला संस्कृति म्हणतां येईल, व या परिज्ञानाचा व दैविवृत्तीचा आयुष्यांतील विवक्षित कृतींत उपयोग म्हणजे विशिष्ट नैपुण्य ( Special culture ) होय. दुसरी पहिलीच्या तंत्रानें चालविली पाहिजे, म्हणजे हें जीवित ओझ्यादाखल न वाटतां सुखावह होतें. तिनेंच प्रेरित व्हा, म्हणजे तुमचें सर्व ठीक होईल. असा हा तुकोबाचा उपदेश आहे, व ह्यामध्यें पूर्ण अर्थ भरून राहिला आहे. सर्वांचा अनुभवही याच गोष्टीचें समर्थन करीत आहे.

# प्रार्थनासमाजाची प्रगति.

आतां तरी पुढें हाचि उपदेश ।
नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
सकळांच्या पायां माझें दंडवत ।
आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥
हित तें करावें देवाचें चिंतन ।
करूनियां मन शुद्ध भावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हित होय तो व्यापार।
करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

गेल्या नऊ, दहा दिवसांपासून आम्ही जो उत्सव साजरा करीत आहों, त्याचा आजचा शेवटचा दिवस होय. आज मीं तुम्हांस काय सांगावें, या विचारांत होतों, तों मला वरील अभंग सुचला. तुकोबाच्या उपदेशाचें सार यामध्यें आहे, म्हणून त्या अभंगाच्या आधारें आज आपणास काय बोध होतो, तो पाहूं या.

तुकोबांनीं हा अभंग, ते कोणत्या परिस्थितींत असतांना, म्हटला, याची आपणांस कल्पना करतां येतें. ते म्हणतात ' बंधुहो, याशिवाय आणखी दुसरा कोणता उपदेश मी तुम्हांस करूं ! पूर्वीं जें कांहीं होऊन गेलें, त्याबद्दल खंति बाळगून उगीच मनाला रुखरुख लावून घेऊं नका; परंतु आतां आणि यापुढें आपलें आयुष्य फुकट दवडूं नका. तुमच्या सर्वांच्या पायां पडून, हात जोडून मी तुमची विनवणी करितों कीं, तुम्ही आपली अंतःकरणें शुद्ध करा. तुमचें हित कशांत आहे, याविषयीं चांगला विचार करा. भाव जागृत ठेवून अंतःकरण निर्मळ करा, ईश्वराचें सत्य, ईश्वराचें पावित्र्य व ईश्वराचें प्रेम, यांचें ध्यान करून आपलें

कल्याण करून घ्या. निवड करून कामास लागा. नफा मिळविण्याच्या हेतूनें तुम्ही धंदा करितां, पण आयुष्यांतील मुख्य जें ध्येय त्याचीच जर तुम्हीं हयगय केली, तर मग बाकीचे फायदे तुम्हांस कसे होतील ?

तुकोबांनीं वरील अभंग कोणत्या प्रसंगीं रचला, हें दाखविण्यास इतिहासामध्यें साधन नाहीं. परंतु, आपण प्रत्यक्ष त्या अभंगाचाच विचार केला तर अशी अटकळ करण्यास हरकत नाहीं कीं, ज्या वेळीं त्यांचें आयुष्यांतील काम कांहीं अंशानें तरी साध्य झालें होतें, जेव्हां त्यांचे अनुयायी त्यांना पूज्य मानीत असत, पण त्यांची खरी योग्यता अद्याप त्यांच्या लक्षांत पूर्णपणें आली नव्हती, जेव्हां तुकोबाच्या स्वतःच्या मनाची आध्यात्मिक वाढ व त्यांचा उत्साह हीं इतकीं प्रबळ झालीं होतीं कीं, तुकोबाला वाटे, आपलें अंतःकरण व्हावयास पाहिजे तितकें अजून शुद्ध झालें नाहीं, आपला भाव जितका दृढ असावयास पाहिजे, तितका दृढ झाला नाहीं किंवा आपलें प्रेम जितकें निस्सीम असावयास पाहिजे तितकें अजून नाहीं, औदासिन्य उत्पन्न होऊन हें जग सोडून देवाकडे जावें, असें जेव्हां त्यांना वाटलें, त्या वेळीं त्यांनीं हा अभंग रचला असला पाहिजे.

ज्या ठिकाणीं ते ईश्वराचें ध्यान करण्यामध्यें सदां निमग्न असत, अशा देहू गांवाजवळील टेंकडीवरून एके दिवशीं संध्याकाळीं परत आल्यावर, वर सांगितलेल्या आपल्या त्या मनाच्या स्थितींत असतांनाच, त्यांनीं आपला मनोदय आपल्या अनुयायांना कळविला असला पाहिजे. तुकोबा आपणाला सोडून जाणार, यामुळें त्यांना जें दुःख झालें असेल, त्याची कल्पना आपणच करावी. त्या लोकांना पक्कें माहीत होतें कीं, आपण तुकोबाच्या समोर आल्याबरोबर आपल्या सर्व काळज्या व आपलीं सर्व दुःखें नाहींशीं होतात; त्यांची शांत व सत्त्वशील

मुद्रा पाहून आपलीं अंतःकरणें उल्हसित होतात; त्यांचे मृदु व मधुर शब्द ऐकून त्या वेळेपुरती तरी आपल्या मनास शांति प्राप्त होते; जेव्हां आम्ही शंका व अडचणी यांनीं ग्रासिलें जातों, तेव्हां त्या तुकोबापुढें ठेविल्याबरोबर आमच्या शंकांचें व अडचणींचें तेव्हांच निरसन होतें व आम्हां स्वतःस त्या कशा सोडवितां आल्या नाहींत, म्हणून आश्चर्य वाटतें. एकाएकीं हा सर्व सुखाचा संबंध तुटणार कीं काय! तुकोबाशिवाय आपली स्थिति किती तरी कष्टप्रद होईल! असें म्हणून, त्यांनीं आपलें दुःख व आपली भीति तुकोबास सांगितली.

तुकारामानें त्यांना उत्तर केलें 'मित्रांनों, तुम्ही माझी खुशामत करतां, मी किती तरी दुबळा आहे, हें मला समजतें. मी माझी शिकस्त केली आहे, तथापि जें झाड उभारावें अशी माझी इच्छा होती, त्याचें मूळ देखील माझ्या हातीं लागलेलें नाहीं. ईश्वराविषयीं खरें प्रेम माझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालें आहे, असें मला वाटत नाहीं; मला कंटाळा आला आहे आणि मी ईश्वराकडे जाणार.' त्या लोकांनीं नंतर म्हटलें, 'तर मग आम्हांस सोडून जाण्याचा तुझा निश्चय झाला आहे, पण जाण्यापूर्वी आम्हांस असा कांहीं उपदेश कर कीं त्याची आम्हांला मरेपर्यंत आठवण राहील.'

मला वाटतें, उत्तरादाखल तुकोबारायांनीं वरील अभंग म्हटला असेल. उत्सवांतील आजच्या शेवटच्या दिवशीं, या अभंगाचा विचार करणें योग्य होईल. हा समाज स्थापन होऊन ४५ वर्षें झालीं. या प्रसंगीं आम्ही ४५ वा वार्षिकोत्सव साजरा करीत आहों. नम्रतायुक्त भक्तियुक्त भावानें आम्ही तो साजरा करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रार्थना म्हटल्या, व्याख्यानें दिलीं, हरिकीर्तनें झालीं, व प्रीतिभोजन झालें. ईश्वराच्या नांवानें व ईश्वराचीच कृपा म्हणून हें सर्व घडून आलें. माझ्या तरुण व वृद्ध मित्रांनों, तुमच्यांपैकीं,

कित्येक जण समाजाचे सभासद नसतांनाही निरनिराळ्या प्रसंगीं तुम्हीं आपल्या येथें येण्यानें आम्हांस आनंदित केलें आहे व आमच्यांमध्यें उत्साह उत्पन्न केला आहे, याबद्दल मी अंतःकरण-पूर्वक तुमच्या सर्वांचे आभार मानतों. आमच्यांमध्यें कितीही दोष असोत, पण आम्ही ईश्वराचें नांव घेत आहों; व त्याचा महिमा गात आहों; आणि तुम्हांला देखील थोड्या बहुत अंशानें ईश्वराची प्रत्यक्षता भासली, म्हणूनच तुम्ही येथें येऊन आम्हांस मदत करण्यास उद्युक्त झाला. ईश्वराची करुणा भाकून व त्याच्या उप-काराबद्दल ऋणि होऊन ज्यांनीं हा समाज स्थापन केला, ज्यांचीं नांवें आमच्या अंतःकरणांत पवित्र होऊन राहिलीं आहेत, अशा त्या थोर, आस्थेवाईक, सात्त्विक देवभक्तांकडे आपली दृष्टि वळवून त्यांची आठवण करूं या.

त्यांच्या मनाचें माप कोणाला घेतां येईल ? मजविषयीं म्हणाल तर मला तसें करतां येईल, असें म्हणण्याचें मी साहस करीत नाहीं. परंतु, मी आपणांस एवढें सांगतों कीं, ते सर्वजण, देशभक्त या शब्दाचा जो खरा अर्थ त्या अर्थानें, खरे देशभक्त होते. त्यांचीं दृष्टि खरी होती./ त्यांची अशी समजूत होती कीं, या देशांतील लोक जेव्हां आपलें आयुष्य सत्यमार्गानें व प्रेमानें घालवून ईश्वराशीं समरस होतील, तेव्हांच या आपल्या पुरातन देशामध्यें सुखाची समृद्धि होईल. आध्यात्मिक जीवन हें आयुष्यांतील इतर सर्व गोष्टींचा उगम व उपजीवन आहे./

वजन, पैसा किंवा दुसऱ्यांची सहानुभूति नसतांना त्यांनीं हा समाज स्थापिला व त्याचें काम चालविलें. प्रथमारंभीं आणि नंतर पुष्कळ वर्षें सहाजिकपणेंच त्यांचा हा प्रयत्न लोकांस अप्रिय झाल्यावांचून राहिला नाहीं. ईश्वराचें राज्य आपणांस आस्ते आस्ते प्राप्त होतें, पण तें केव्हांना केव्हां तरी येतेंच हें खरें आहे; आणि आतां तरुण

पिढींतील लोकांचे समुदाय आमच्याबरोबर एका परमेश्वराची आराधना करण्याकरितां येत आहेत. ते आम्हांबरोबर गातात, प्रार्थना करितात व इतर दुसऱ्या रीतीनींही आम्हांस मदत करितात. आतां कोणी मला असा प्रश्न केला कीं, 'अरे पहारेकऱ्या, रात्र किती उरली आहे?' तर मी त्यास निभ्रांतपणानें उत्तर देईन कीं, 'हिंदुस्थानचा तारा उदयंगत आहे, अरुणोदय जाऊन सूर्यप्रकाश लवकरच पडणार आहे.'

---

## सात्विक वृत्ति.

( यंग थीईस्टस यूनियनच्या सभासदांस उद्देशून झालेलें एक व्याख्यान. )

कोणत्याही संस्थेशीं आपला निकट संबंध जडला व ती संस्था लोककल्याणकारी आहे, अशी आपली खात्री झाली, म्हणजे तिच्या हातून होणाऱ्या कामासंबंधानें नेहमीं आशा असूं देणें, विनाकारण निरुत्साह न होणें, हेंच योग्य होय.

गेलीं चाळीस वर्षेपर्यंत मीं जें निरीक्षण केलें आहे, त्यावरून माझें असें मत झालें आहे कीं, आशावादाची वृत्ति असणें, हें एक आपलें आयुष्य सुखकर करण्याचें साधन आहे. स्वतःचें मन व आत्मा उन्नत करण्याकरितां, स्वतःची सुधारणा करण्याकरितां व देशाचें पुनरुज्जीवन करण्याकरितां निराशावादाची वृत्ति असून चालावयाचें नाहीं. ज्याच्या मनावर निराशावादाचा पगडा बसल्यामुळें जो म्लान अंतःकरणानें व अस्वस्थ चित्तानें कामास लागतो, त्या मनुष्यापेक्षां जो मनुष्य आशापूर्ण अंतःकरणानें कामास लागतो, आपणास यशप्राप्ति होईल कीं नाहीं, याविषयीं मनास रुखरुख वाटूं न देतां स्वतःच्या कर्तृत्वावर व ईश्वरावर विश्वास ठेवून आपलें कर्तव्य करण्यामध्यें खंड पडूं देत नाहीं, त्या मनुष्याच्या हातून तें

काम अधिक चांगल्या रीतीनें व अधिक यशस्वी होतें, व ती सिद्धि अधिक काळपर्यंत टिकते, ही सध्यांच्या काळचे प्रश्न सोडविण्याची गुरुकिल्ली म्हणजे सदा आनंदी व आशाजनक वृत्ति होय, असें मला नेहमीं वाटतें, व अशा प्रकारची वृत्ति आजकाल जास्त जास्तच दिसून येत आहे, म्हणून आनंद वाटतो. ज्या संस्थेशी आपला अगदीं निकट संबंध आहे, अशा या धार्मिक संस्थेविषयीं म्हणाल, तर आशा बाळगण्यास बरीच जागा आहे. कारण, पुष्कळ सुशिक्षित लोक जरी धर्माविषयीं उदासिन असलेले दिसतात, तथापि मला वाटतें कीं, त्यांच्यामध्यें देखील आध्यात्मिक गोष्टीची आवड उत्पन्न होत आहे. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, ज्यांनीं उघडपणें एकेश्वरी धर्माचा स्वीकार केला आहे, त्यांची संख्या थोडीच आहे व हा धर्म जितके दिवस अस्तित्वांत आहे, त्या मानानें ती संख्या असावयास पाहिजे तितकी नाहीं. परंतु जे अनेक विचारी तरुण आठवड्याचे आठवड्यास येथें उपासनेस येतात, अशांच्या मनावर या धर्माचा जो परिणाम होत आहे, त्यायोगें आपल्यामधील एकाद्या मोठ्या निराशावाद्याच्याहि मनामध्यें या धर्माच्या भवितव्यतेविषयीं आशा वाटल्यावांचून राहणार नाहीं. गेल्या चार वर्षांपासून आध्यात्मिक वाढ किती झाली, हें मी फार बारकाईनें पाहत आहें, आणि माझा अनुभव असा आहे कीं, आम्हाला कोणत्याही कारणानें निराश होण्याचें कारण नाहीं. प्रार्थनासमाजावर एका वृत्तपत्रामध्यें टीका केलेली नुकतीच माझ्या सहज वाचण्यांत आली. त्यामध्यें अशी तक्रार आहे कीं, प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें इतकीं उच्च आहेत कीं त्याची भरभराटच व्हावयास पाहिजे. पण, थोड्याच लोकांनीं आपलीं नांवें प्रार्थनासमाजाच्या पटांत नोंदविली आहेत, त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं, त्याचा व्हावा तितका अद्याप प्रसार झालेला नाहीं.

आतां एकाद्या संस्थेची, मुख्यतः आमच्यासारख्या धार्मिक संस्थेची भरभराट होते कीं नाहीं हें त्या संस्थेच्या पटावरील सभासदांच्या संख्येच्या मानानें ठरविणें हें मुळीं चुकीचें आहे. कारण, अशा प्रकारच्या संस्थाचें सामर्थ्य त्यांचा आजुबाजूच्या लोकांवर किती व कसा परिणाम झाला यावरून ठरविलें पाहिजे. जे उघड रीतीनें आपलीं नांवें नोंदावितात, त्यांच्या संख्येवरून ठरविणें बरोबर नाहीं. वरील पत्राच्या लेखकानें पुढें असेंही ह्मटलें आहे कीं, समाजास यश येत नाहीं, त्याचा दोष हिंदुसमाजावर नसून तो समाजिष्टांकडेच आहे. अशा टीकाकाराचे ठिकाणीं आपल्या कर्तव्यबुद्धीचा अभाव आहे, असें मला मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. या टीकाकाराला समाजाचीं तत्त्वें मान्य आहेत व समजाविषयीं त्याला सहानुभूति वाटते, असें तोच टीकाकार आपल्या लेखांत म्हणत आहे. मग ही गोष्ट जर खरी आहे, तर या टीकाकारासारख्या लोकांनीं या समाजास येऊन उघडपणें मिळणें व जेणेंकरून समाजाची उन्नति होईल व त्याला यश येईल, असें करणें हें त्यांचें कर्तव्य नव्हे काय? धार्मिक व सामाजिक जे प्रश्न असतात, त्यांची गोष्ट राजकीय प्रश्नांहून निराळी आहे. राजकीय बाबतींत सरकाराविरुद्ध टीका करण्यास व अमक्या अमक्या पद्धतीनें राज्यकारभार व्हावा असें सुचविण्यास एकाद्यास मुळींसुद्धां दिक्कत वाटणार नाहीं. कारण त्याची खात्री असते कीं 'राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेऊन तूं हें राज्य आपल्या पद्धतीनें चालवून दाखीव' असें कोणी म्हणेल अशी त्याला भीति नसते. परंतु धार्मिक व सामाजिक बाबतींत नुसती टीका फोल होय. धार्मिक गोष्टींत आपणांस यश येणें किंवा अपयश येणें, हें सर्वांशीं आपल्यांवर अवलंबून आहे, व आपली एकाद्या धर्माविषयीं सहानुभूति असेल तर आस्थेनें व विश्वा-

सानें त्या धर्माला जाऊन मिळणें व त्याकारितां तन मन धन खर्च करणें हें आपल्या हिताचें आहे.

मीं वर ह्मटलेंच आहे कीं, संस्थेच्या पटावरील सभासदांच्या संख्येवरून त्या संस्थेच्या सुस्थितीबद्दल किंवा दुःस्थितीबद्दल नेहमीं अटकळ बांधतां येतेच, असें नाहीं. धर्मपंथ नेहमीं कांट्यांनीं वेष्टित असतो, म्हणून त्याचें अनायासें ग्रहण करणें, ही गोष्ट कांहीं सोपी नाहीं. धर्माचें स्वरूप अगदीं उच्च आहे व सर्वांस पटण्यासारखें आहे, एवढ्यावरूनच त्याची झपाट्यानें वाढ झाली पाहिजे, असें नाहीं. **मार्टिनो** एके ठिकाणीं असें म्हणतो कीं, ज्याची वाढ विश्वामध्यें मोठ्या झपाट्यानें होते, तें कमी दर्जाचें होय. ईश्वरानें अशीच व्यवस्था करून ठेविली आहे कीं, जें म्हणून दीर्घकाळ टिकणारें आहे, त्याची वाढही होण्यास दीर्घकाळच लागतो. म्हणून आमच्या समाजाच्या सभासदांची संख्या थोडी आहे, म्हणून कोणास हताश होऊन हात पाय गाळण्याचें कारण नाहीं. ज्या म्हणून थोर धर्मांचा मनुष्यजातीवर सुपरिणाम होऊन, तिचें कल्याण झालें आहे, त्यांचा प्रसार होण्यास फार कालावधि लागला. ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां **सेंट पाल**सारखा धर्मोपदेशक असूनही पहिलीं कांहीं वर्षेंपर्यंत त्या धर्माची प्रगति फारशी झाली नाहीं. प्रत्येक धर्माची वाढ होण्यास ज्या गोष्टीची आवश्यकता आहे, ती गोष्ट त्या धर्माच्या अनुयायांच्या संख्येवर किंवा त्यांच्या विद्वत्तेवर अवलंबून नाहीं, तर ज्यांचीं अंतःकरणें अविकृत आहेत व ज्यांची वृत्ति प्रार्थनामय आहे, अशांवरच अवलंबून आहे. सत्यनिष्ठा, आस्था, यांनीं त्यांचीं अंतःकरणें प्रेरित व्हावयास पाहिजेत. दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे, जे कोणी या समाजास येऊन मिळतील त्यांनीं आपलें आयुष्य साध्या रीतीनें घालविण्यास उद्युक्त असावयास पाहिजे.

आपल्या आचारांत व विचारांत साधेपणा आणणें ही गोष्ट जणूं काय सोपीच आहे, अशा रीतीनें आपण तिचा उल्लेख वारंवार करीत असतों. साधेपणा हा शब्द आपणांस भारून टाकणारा आहे, व युरोपमधील जे लोक पैशाच्या व ऐहिक ऐश्वर्याच्याच सदां पाठीमागें लागलेले आहेत, त्यांच्याशीं आपली तुलना केली असतां आम्ही कितीतरी साधीं भोळीं माणसें, असा आपणांस अभिमान वाटतो, यांत संशय नाहीं. आपले जे पूर्वज त्यांच्या आयुष्याची रहाणी खरोखरच साधी होती; म्हणजे त्यांचें आचरण पवित्र होतें, व आम्ही जे त्यांचे वंशज त्यांना त्यांच्याविषयीं अभिमान उत्पन्न होणें साहजिक आहे. पण, आमच्याविषयीं म्हणाल तर, आमचें वर्तन साधें आहे, असें खात्रीनें कोणी म्हणेल तर तें सत्यास धरून होणार नाहीं. धोतर नेसावयाचें व अजागळपणानें कसें तरी आचरण करावयाचें याला कांहीं साधेपणा म्हणत नाहींत. ज्यांच्या गरजा अतिशय कमी त्यांना साधें म्हणावें, तर मग जंगली लोक पृथ्वीवरील इतर सर्व लोकांपेक्षां साधे आहेत, असें होईल; पण, साधेपणा म्हणजे पवित्रपणा होय, हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. तेव्हां साधेपणानें आयुष्य घालविणें, ही गोष्ट कांहीं सोप्यांतली नाहीं, हें कोणीही कबूल करील. वरिष्ठ दर्जाचा प्रयत्न व आपल्या सामर्थ्यांची योग्य वाढ केली असतां आपण आपलें आयुष्य साधेपणानें घालविलें असें होतें. धार्मिक रीतीनें आयुष्य क्रमणें हेंच ज्याचें ध्येय, अशा मनुष्याच्या आचरणाचा परिणाम, त्याच्याशीं ज्यांचा म्हणून परिचय घडेल, त्यांच्या मनावर, न कळत पण खात्रीनें अत्यंत इष्ट असा झाल्याशिवाय राहत नाहीं.

**ॲडिसनचे** ग्रंथ घ्या व त्यांतील भाषासरणी ध्यानांत आणा ती किती तरी साधी, चोख व अनुकरणीय दिसते. तथापि थोडा विचार केला असतां कळून येईल कीं, जरी ती इतकी अनुकरणीय

वाटते, तरी ती समजण्यास व तिच्यामध्यें शिरकाव होण्यास फार कठिण आहे; ती सरणी सोपी आहे, कारण तिच्यामध्यें भपका नाहीं. तिच्यामध्यें अस्सलपणा आहे व त्यामुळें तुमचें चित्त तिच्याकडे सहज वेधलें जातें, व ती आपलीशी तेव्हांच करतां येईल, असें तुह्मांस वाटतें; किंवा जें मूळ वस्तूसारखें हुबेहुब वठलें आहे, असें एखादें चित्र घ्या. तें चित्र साधें दिसतें, कारण त्यामध्यें झळकफळक कांहीं दिसून येत नाहीं. आतां आपण सृष्टींचें उदाहरण घेऊं या. **कार्लाईल** ह्मणतो कीं, गव्हाचा एक दाणा पुष्कळशा निरुपयोगी तुसासह जमिनींत पेरतात. धरणी माता त्या तुसाबद्दल अवाक्षर देखील काढीत नाहीं; पण जणूं काय त्या दाण्याबरोबर दुसरें कांहींही वाईट मिश्रित नाहीं, अशा रीतीनें शांतपणें त्या दाण्याचा ती स्वीकार करिते. कांहींही सबब किंवा गर्जना न करितां सूर्य प्रत्येक दिवशीं सकाळीं उगवतो व शांतपणानें व धिम्मेपणानें आपली नियमित फेरी करितो. फुलें, मोहर व ऋतू नेमलेल्या वेळीं गाजावाजा न करितां येतात. निसर्गाभोंवतीं इतका शांतपणा व साधेपणा आहे कीं, तो कोणत्याही प्रकारच्या घाईमुळें, अव्यवस्थेमुळें किंवा गडबडीमुळें नष्ट होत नाहीं. याचप्रमाणें ज्याचें आचरण साधें आहे, तो कोणत्याही प्रकारची कुरकुर न करितां आपलें काम करतो. तो आपल्या देवाबरोबर इमानानें वागतो. ईश्वर अगदीं साध्या रीतीनें या जगाचा व्यापार चालवितो, म्हणून जो मनुष्य आपलें वर्तन साधें ठेवितो, तो ईश्वराचें या बाबतींत अनुकरण करितो. साधेपणा म्हणजे मोठा डामडौल किंवा झकपक नव्हे, परंतु साधेपणा अंगीं आणण्यास आपण आपल्या जन्मदात्या ईश्वराबरोबर सत्यनिष्ठापूर्वक वागलें पाहिजे. याकरितां आपलें आयुष्य साधें असावें, अशी जर आपली इच्छा असेल, तर आपण त्यास चांगलें वळण लावावयास

पाहिजे. चांगल्या वळणानें दुष्ट मनुष्यही सद्गुणी होतो. आपल्या स्वतःस चांगलें वळण लावण्याकरितां आपण उद्योगी व सत्त्वशील झालें पाहिजे, व तसें होण्यास आपण ईश्वरास आपल्या आयुष्याचा मध्यबिंदु केलें पाहिजे. दैवीवृत्तीची वाढ केल्यानें या जगांतील आपलें जें उच्च ध्येय तें आपणांस समजतें. साधें आचरण ठेवण्याविषयीं आपल्या पूर्वजांमध्यें जी दैवीवृत्ति वसत होती, परंतु जिची आपणांस आतां जवळ जवळ विस्मृति झाली आहे, अशा दैवीवृत्तीची वाढ करावयास आपण शिकलें पाहिजे. म्हणून साधें आयुष्य ह्मणजे अजागळ रीतीनें राहणें नव्हे, तर कोणत्याही प्रकारची बडेजावी न दाखवितां अंतःकरणामध्यें खरेपणा व सत्वशीलपणा असणें हें होय. अशा प्रकारचें आयुष्य या समाजास येऊन मिळणाऱ्या प्रत्येक मनुष्याचें असावयास पाहिजे. ज्या तरुणांनीं हा संघ स्थापन केला व जे आपल्या स्वीकृत तत्त्वांचा प्रसार शांतपणें करीत आहेत, त्यांना मी हें शेवटीं सांगतों कीं, तुम्हीं जें थोर कार्य आरंभिलें आहे, तें करण्याविषयीं नेटानें झटा; तुम्ही ही गोष्ट लक्षांत ठेवा कीं, तुम्ही मनांत आणल्यास तुमचीं अंतःकरणें जोमदार होतील. तुमच्यामध्यें उत्साह असेल, तुम्ही तुमच्या सद्सद्विवेकबुद्धीस अनुसरून आपलें वर्तन ठेवाल, तर मग लोक तुमच्याकडे पाहून नाक मुरडोत, तुमचा धिक्कार करोत, तुमची कुटाळी करोत, किंवा तुमचा छळ करोत, न डगमगतां ईश्वरास स्मरून तुह्मी आपलें कर्तव्य बजावण्यास समर्थ व्हाल.



# आयुष्यांतील ध्येयें.

आज माझा उद्देश जगांतील व्यवहारांत वावरतांना आपण किती चिकाटी धरून आपलें ध्येय साधलें पाहिजे, हें तरुण मंडळीला दाखवावयाचा आहे. ह्यासाठीं जग हें माया [ मिथ्या ] आहे ही कल्पना प्रथम त्यांनीं आपल्या मनांतून काढून टाकली पाहिजे; कारण कांहीं झालें तरी ह्यांत आपलें आयुष्य आपण कंठलेंच पाहिजे आणि हें टाळतां येणें अशक्य होय. अशा स्थितींत आपण आपलें आयुष्य नेभळ्या वृत्तीनें घालवावें कीं धिमेपणानें घालवावें, असाच प्रश्न आपल्या समोर उभा राहतो. ध्येय नसलेल्या मनुष्याप्रमाणें आयुष्य घालविणें म्हणजे जनावरांच्या कोटींतील आपण आहोंत असें दर्शविणें होय. म्हणून आपण वीराप्रमाणें वागून प्रगल्भित ध्येयें आपणासमोर ठेवावीं.

आतां प्रगल्भित ध्येयें कोणतीं हा प्रश्न साहजिकच पुढें येईल. पहिलें ध्येय म्हणजे उदरनिर्वाह चालविणें. हें जरी उच्च नाहीं, तथापि प्रत्येक मनुष्याला शारीरिक गरजा भागविल्या पाहिजेत, व सुखें मिळविलीं पाहिजेत. ह्याकरितां आपणाला कोणता तरी धंदा पत्करावा लागतो; आणि त्या धंद्याला आपण नेकीनें व नेटानें चिकटून राहिलें पाहिजे. कांहीं वर्षांपूर्वीं कलकत्त्याचे मुख्य न्यायमूर्ति सर रिचर्ड गार्थ हे ह्या विषयावर तरुण विद्यार्थ्यांस उद्देशून व्याख्यान देतांना म्हणाले होते कीं, प्रत्येकानें आपला धंदा ही आपली प्रेमसंसयी स्त्री आहे असेंच समजलें पाहिजे. नाहीं तर मोठमोठे बुद्धिमान्‌सुद्धां धंदा म्हणजे काय सहज करितां येईल, या घमेंडीमुळें फुकट जातात. ह्यावरून स्पष्ट सिद्ध होत आहे कीं, कसाही बुद्धिवान् मनुष्य असला, तरी त्याला धंद्यास लागणारे सर्व

परिश्रम केलेच पाहिजेत. परंतु एवढ्यावरून धंदा हेंच आपलें अंतिम साध्य असें समजूं नये; नाहीं तर आपण कोत्या विचारांना बळी पडूं; कारण बर्कनें म्हटलें आहे कीं, वकीलांचा धंदा चांगला व सन्माननीय आहे खरा; परंतु त्यामुळें सर्व जगांतील लुच्चेगिऱ्यांचा अभ्यास होतो. खोटा मुद्दा खरा कसा बनवावा ही संवय होते; ह्यामुळें ज्यांचें ध्येय वकीली करणें हेंच आहे, त्यांवर ह्या संवयीमुळें अनीतीचा पगडा बसल्याशिवाय राहत नाहीं. आपल्या धंद्यांत गढून गेल्यामुळें जगांत वादी आणि वकील एवढे दोनच वर्ग अस्तित्वांत आहेत; आणि वादीकडून पैसा मिळाविणें हेंच आपलें कर्तव्य-कर्म अशी त्याची कल्पना दृढ होते आणि ही कल्पना वकिलांच्या कोत्या विचारांना अनुदारतेचें कारण होतें !

कार्डिनल न्यूमन यांनीं या विषयाबद्दल बोलतांना सांगितलें आहे कीं,एकाच धंद्याकडे ज्या लोकांची प्रवृत्ति झाली आहे,त्याच धंद्यांत ते आपलें आयुष्य खर्च करितात आणि ज्या गोष्टींचा आपल्या धंद्याशीं संबंध नाहीं, त्यांचा त्यांत ते उपयोग करितात; आणि आपल्या धंद्याविषयीं सतत साशंकवृत्तींत राहतात. ह्यासाठीं, आपला धंदा करण्यांत अनीतीचा उपयोग होऊं नये, अशाबद्दल खबरदारी घेतली पाहिजे. म्हणून आपला धंदा प्रेमसंशयी स्त्री आहे, असें समजण्यापेक्षां फळदायी प्रेम करणारी पत्नी आहे, असेंच समजलें पाहिजे. म्हणजे स्त्रीप्रमाणें आपला धंदा सुखदायक, आनंददायक होतो जरी आपणास बराच काळ धंद्यांत घालवावा लागतो, तरी आपणासाठीं धंदे आहेत, धंद्यासाठीं आपण नाहीं, ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. म्हणून आपला धंदा सारखा चिकाटीनें चालवून इतर साध्यांबद्दल योग्य आस्था बाळगली पाहिजे. ह्याचा परिणाम असा होतो कीं, आपण बुद्धिविषयक ध्येयांकडे वळतों.

शारीरिक गरजा भागविण्यांत जोंपर्यंत मनुष्य आपल्या कर्तव्याची समाप्ति आहे असें समजेल, तोंपर्यंत तो मूळ स्थितीपासून फार सुधारला आहे, असें मुळींच म्हणतां येत नाहीं. जनावरांपेक्षां आपण उच्च दर्जाचे आहों, याचें कारण आपल्यामध्यें मन हेंच वैशिष्टय आहे. मनावरच जगांतील सुखदु:खें अवलंबून राहतात; म्हणून आपण मानसिक वाढीकडे लक्ष पुरविलें पाहिजे. आपण ज्या शतकांत आहों, त्या शतकांत प्रत्येक मनुष्य बुद्धिविषयक धंद्यांत दुसऱ्यावर सरशी करीत आहे; आणि अशा वेळीं कोणालाही आपण अज्ञानांत रहावें असें वाटणार नाहीं. शिवाय हल्लींच्या काळांत लोकमताला मान आहे; परंतु पुष्कळ लोकांना पुरेसें ज्ञान नसल्यामुळें कोणत्याही मुद्याबद्दल त्यांना उदार व उदात्त विचार कारितां येत नाहीं; ह्याकारितां ज्या लोकांना त्या प्रकारचें शिक्षण मिळालें आहे, त्यांनीं स्वत:चे विचार कोते होऊं न देतां कोणत्याही मुद्याविषयीं उदार लोकमत होईल, अशी खटपट केली पाहिजे. जर विश्वविद्यालयांत शिकलेल्या लोकांना आपल्या सर्व आयुष्यभर शिक्षण मिळविण्याची व मनाची वाढ अधिकाधिक करण्याची संवय लागली नाहीं तर त्या विश्वविद्यालयाच्या साध्याची दिशा चुकली असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. म्हणून उच्च प्रतीचें शिक्षण मिळालेल्या व मिळवित असलेल्या लोकांनीं आपल्या मनाची वाढ करण्यांतच रत न होतां आपल्या संगतींत असलेल्या लोकांच्या मनाची वाढ करण्याचे परिश्रम त्यांनीं केलेच पाहिजेत. सतत आपण ज्ञानी होण्याची खटपट करावी. हें काम करण्यास विश्वविद्यालयांनीं ठरविलेलीं पुस्तकें पुरेशीं नाहींत, तर आपल्या आवडीच्या विषयाचीं अनेक पुस्तकें वाचण्यास रोज अर्धा तास तरी आपण सवड काढली पाहिजे.

हें उद्दिष्ट साधण्यास स्वावलंबन आणि निश्चय हे दोन गुण अत्यावश्यक होत. माजी रावबहादूर व्ही. एन. मंडलीक यांच्या उदाहरणावरून आपलें बुद्धिविषयक ध्येय कसें साधतां येतें, हें पूर्णपणें आपणांस समजेल. रावबहादुरांचा काम करण्याचा निश्चयी स्वभाव अनुकरणीय व स्तुत्य आहे. आपल्या विचारसरणी-बरोबर आपली कर्तव्यदक्षता सुद्धां कायम ठेविली पाहिजे. नाहीं तर आपल्या विचारसरणीचा कांहींच उपयोग न होतां ती विपत्ति-दायक होईल. प्राचीन ग्रीस व रोममध्यें विचारवंत माणसें बुद्धि-विषयक कामें करित असतांना जगांतील सर्वसाधारण व्यवहारांत पडत असत. आणि त्यामुळें रोम आणि ग्रीसची पूर्ण भरभराट झाली. असलीं उदाहरणें हल्लीं इंग्लंडमध्यें दृष्टीस पडतात. आपली मानसिक वाढ ज्ञानानें करित असतांना त्याचा फायदा आपल्या-पेक्षां कमी ज्ञानाच्या लोकांना होत आहे कीं नाहीं, याची काळजी आपण घेतली पाहिजे. नाहीं तर त्यांच्यामध्यें व आपल्यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर पडेल. या फरकामुळें आज हिंदुस्थान अशा हीनावस्थेंत आहे. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत पुष्कळ तत्त्वज्ञानी व बुद्धिविषयक ध्येयांची वाढ करणारे लोक होते खरे, परंतु ते आपल्या विचारांत इतके गढून गेले होते कीं इतर बांधवांविषयीं ते अगदीं बेफिकीर बनले आणि आपण त्यांपासून अगदीं निराळे आहों असा त्यांचा समज होऊन त्यांच्याविषयीं त्यांची तिरस्कार-बुद्धि झाली. याचा परिणाम ज्ञानी लोकांची जात निराळीच बनून विचारवंत मनुष्यांची कारागीरांपासून फाटाफूट होऊन एकमेकां-विषयींची सहानुभूति नष्ट झाली. शिवाय विचारशील मनुष्याच्या ठिकाणीं व्यवहारज्ञानाचा अभाव होऊन कारागीर लोक पूर्ण अज्ञानावस्थेंत राहिले. असलें बुद्धिविषयक ध्येय पूर्ण टाळलें पाहिजे. कारण ज्ञानाचा उपयोग उत्तम पाया रचण्याकडे झाला नाहीं, तर तें

व्यथ होय. यामुळें तिसरें जें नैतिक उद्दिष्ट तें आपल्याला दिसूं लागतें. पशूपेक्षां मनुष्याला ज्यास्त श्रेष्ठत्व मिळण्याला त्याची नीतिमत्ता कारणीभूत होते. मनुष्याच्या शारीरिक व मानसिक वाढीला सीमा आहे. परंतु ही ओलांडून तो नैतिक वाढीकडे वळला म्हणजे तो अशा स्थितीला पोंचतो कीं, त्यांत त्याला मानवी स्वभावाची पूर्णता करितां येऊन, अपूर्व कृत्यें करितां येतात. नीतिमत्तेंत मात्र बुद्धिवंत आणि अबुद्धिवंत, श्रीमंत आणि गरीब ह्यांना बरोबरीच्या नात्यानें वागतां येईल. कारण जरी प्रत्येक मनुष्याला अलौकिक बुद्धिमान् होतां येत नाहीं, तरी पण आपली नीतिमत्ता पूर्ण वाढवितां येते. नीतिमत्तेला सीमा नाहीं. यावरून मनुष्याला पूर्ण नीतिमान् होतां येतें, ही ईश्वरी इच्छा आपणास दिसून येईल. यावर कोणी अशी शंका काढील कीं, कांहीं कांहीं मनुष्यें स्वभावतःच दुराचारी असतात. परंतु दुराचरणी मनुष्यांनां सदाचरणी कसें बनतां येईल, हें साक्रेतिसाच्या उदाहरणावरून आपणास शिकतां येईल. अथेन्स शहरीं एकदां एक मुखावलोकनावरून स्वभाव जाणणारा पुरुष आला. तेव्हां त्याच्या कलेची ( शास्त्राची ) सत्यता पाहण्यासाठीं सॉक्रेतिसाच्या शिष्यांनीं त्यास सॉक्रेतिसाचें मुख पाहून त्याचा स्वभाव सांगण्यास सांगितलें. त्यावर त्यानें हा दुराचरणी असावा असें सांगितलें. हें त्याचें भाषण ऐकून शिष्यांना हंसें आलें. परंतु सॉक्रेतिसानें म्हटलें कीं, त्या मनुष्याचें बोलणें खरें असेल. कारण जरी मी स्वभावानें दुराचरणी असलों, तरी मीं माझीं इंद्रियें तत्त्वज्ञानानें जिंकून घेतलीं आहेत. धार्मिकता नीतिमत्तेचा खरा पाया नव्हे असें कित्येकांचें म्हणणें आहे. आधुनिक मतस्वातंत्र्याचा कल धार्मिकतेला अनुकूल असाच आहे, तरी नास्तिकपणांत मुळींच जोर नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. नास्तिकपणा जाऊन तिच्या जागीं जग हें कांहीं अदृश्य शक्तीवर चालत असून त्या

शक्तीचा कांहींच थांग लागत नाहीं, अशा मताचे लोक आहेत. ही शक्ति अगाध आहे असें ते म्हणतात; आणि ते मनुष्यामधील धार्मिक तत्त्वांचें अस्तित्व कबूल करितात. जॉन मोर्ले साहेबांनीं याविषयीं म्हटलें आहे कीं, शास्त्रांना कोणता तरी धर्म अगोदर ठरविला पाहिजे. कारण धर्माच्या अभावीं स्त्रीचें अगर पुरुषाचें अस्तित्वच शाश्वत होणार नाहीं. विवक्षित धर्माविषयीं मी प्रतिपादन करीत नाहीं. परंतु मला तुम्हास आज एवढेंच दाखवावयाचें आहे कीं, उन्नति करण्याकरितां ज्याप्रमाणें मनुष्यांना शारीरिक, मानसिक व नैतिक ध्येयें आहेत, त्याप्रमाणें धर्म हासुद्धां एक ध्येयच आहे. मी कोण, आलों कोठून, आणि माझी एकरूपता ह्याच जन्मांत व्हावयाची, असल्या प्रकारचे शाश्वत सुखदायक प्रश्न प्रत्येकाचे पुढें वारंवार उभे राहतात. आपल्यामध्यें असलेलीं धार्मिक तत्त्वें वाढविण्याचें मनुष्याचें चवथें ध्येय आहे. आणि ईश्वराच्या उदात्त इच्छेचें आपल्या वर्तनांत तंतोतंत अनुकरण करून इतर मानवांपेक्षां उच्च पद मिळविण्याची आपण खटपट करावी. अशा तऱ्हेनें शारीरिक, मानसिक, नैतिक, आणि धार्मिक अशीं चार ध्येयें मनुष्याच्या पुढें उभीं राहतात. आणि हीं साध्य केलीं असतां मनुष्यप्राणी हा मनुष्यनांवास पात्र होतो.

पुढें आपणांस असें वाटेल कीं, जशीं मनुष्याला व्यक्तिविषयक ध्येयें आहेत तशींच सामाजिक ध्येयें सुद्धां असलीं पाहिजेत. ज्या अर्थीं आपण समाजांत आहों, त्या अर्थी समाजाच्या बऱ्या वाईट स्थितीबद्दल कळकळ बाळगणें हें आपलें कर्तव्य होय. सामाजिक ध्येयें दोन प्रकारचीं असतात. एक समाजाविषयक आणि दुसरें राजकीय विषयक. सामाजिक ध्येयें म्हणजे दोन तत्त्वांचें पूर्ण ज्ञान होय. पहिलें तत्त्व म्हणजे राष्ट्र उत्तरोत्तर खालावत आहे कीं सुधारत आहे याचा विचार करणें होय. कांहीं इतिहासांत

आपणांस असें आढळून येईल कीं, विवक्षित समाज स्थिर आहे; परंतु स्थिरता हा शब्द चुकीचा आहे. कारण सुधारणेचा नियमच असा आहे कीं, जर आपलें पाऊल पुढें पडत नसेल तर मागें पडत असलें पाहिजे. कोणतीही वस्तु स्थिर अशी जगांतच नाहीं. कोणताही देश सुधारत नसेल तर खालावत तरी असेल. दुसरें तत्त्व म्हणजे समाजांतील प्रत्येक मनुष्यानें समाजाच्या सुधारणेबद्दल खटपट करणें हें होय. समाजांतील प्रत्येक मनुष्य गरीब असो अथवा श्रीमंत असो, तो समाजसुधारणेचा एक घटकावयव आहे. एकाद्या मनुष्यास असें वाटत असेल कीं, आपण समाजांतील क्षुद्र व्यक्ति असल्यामुळें समाजाच्या रीतिभातींविषयींच्या आपल्या मतांचा कांहीं एक परिणाम होणार नाहीं; परंतु कांहीं झालें तरी त्याचा थोडा-बहुत परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. डॉ० चामर्स ह्यांनीं सांगितलें आहे कीं, प्रत्येक मनुष्य जरी एकाद्या समाजाचा उत्पादक नसला, तरी त्याचा तो घटकावयव असतो. या सर्व गोष्टींचा विचार करून आपण समाजसुधारणा, उदाहरणांनीं किंवा विधानांनीं करण्याची खटपट करीत रहावें.

राजकीय ध्येयांविषयीं मला विशेष सांगत बसण्याची जरूरी नाहीं. फक्त एवढेंच सांगतों कीं, राजकीय ध्येयांविषयीं शिकलेल्या लोकांनीं राजा व प्रजा यांच्यामधील राजनिष्ठा व सलोखा वाढविण्याचें काम प्रामाणिकपणें सतत करीत रहावें. ह्या ठिकाणीं आपलीं ध्येयें संपलीं. एवढीं ध्येयें साध्य करणें दुरापास्त व अवघड आहे; तथापि जर आपण निश्चयानें काम करूं लागलों, तर थोड्याशा तरी अंशानें हीं साध्य करतां येतील. आपणांसमोर सतत उच्च ध्येयें ठेवावीं आणि जर आपण मनापासून साध्याविषयीं खटपट करूं लागलों, तर आपली इच्छा खचित पूर्ण करतां येईल. अशा

तऱ्हेनें क्रमाक्रमानें आपलें जीवित धन्य करितां येईल. असें केलें असतां आपले महान् कवि आणि भगवद्भक्त रामदास यांच्या

तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
मना सज्जना हेचि क्रिया करावी ॥

या उक्तीप्रमाणें आपण वागलों असें अनुभवास येईल.

---

## ब्राह्मधर्माच्या चळवळीचा हेतु.

आपुलें स्वहित करावें पैं आधीं ।
विचारूनि बुद्धि समाधान ॥ १ ॥
नये मागें पाहों वाट फिरोनियां ।
दुसरा संगिया साहाकारी ॥ २ ॥
आपुलिया बळें घालावी हे कास ।
न येणेंचि आस आणिकांची ॥ ३ ॥
तुका ह्मणें ब्रह्मरसीं द्यावी बुडी ।
वासना हे कुडी सांडूनियां ॥ ४ ॥

ता २४ जानेवारी १९१३ रोजीं कलकत्ता येथें ब्राह्मसमाजाचा वाढदिवस साजरा करण्यांत आला. त्या दिवशीं ब्राह्मसमाज स्थापन होऊन ८२ वर्षें पुरीं झालीं व त्याला ८३ वें वर्ष लागलें. डॉ. भांडारकरांनीं त्या दिवशीं येथें ईश्वरोपासना करून तो दिवस साजरा केला. ब्राह्मसमाजाच्या योगें कोणता अर्थ मनांत येतो, ब्राह्मसमाज काय करा व काय करूं नका ह्मणून सांगतो, या विषयावर मीं देखील आज बोलण्याचा विचार केला आहे. तुकोबाचा वरील जो अभंग आपण ह्मटला, त्यायोगें ब्राह्मसमाजाविषयीं आपणांस चांगली कल्पना होणार

आहे. तुकाराम ह्या अभंगांत ह्मणतात, 'आपलें हित कशामध्यें आहे, हें पूर्ण विचार करून प्रथम शोधून काढा. ईश्वरी प्रेरणेनेंच चांगलें करण्याकडे तुमची प्रवृत्ति होते, हें लक्षांत ठेवून बुद्धीचें समाधान करा. पण, एकदां कां तुमच्या बुद्धीचें समाधान झालें ह्मणजे मग कितीही अडचणी किंवा संकटें आलीं, तरी न डगमगतां तुह्मीं एकदां ज्या मार्गाचें अवलंबन केलें, त्यासच चिकटून रहा. दुसरा कोणी आपल्या मदतीस येत आहे किंवा नाहीं ह्मणून मागें फिरून त्याची वाट न पहातां आपला मार्ग तसाच पुढें चालू ठेवा. (कारण तुमचा हेतु शुद्ध आहे व जें परोपकाराचें काम तुम्हीं आरंभिलें आहे, तें करीत असतांना तुम्ही कोणत्याही स्वार्थत्याग करावयास तयार आहां अशी त्यांची खात्री झाली म्हणजे ते खात्रीनें तुमच्यामागून येणारच.) पुष्कळ वेळां तुम्हांला तुमच्या स्वतःच्याच बळावर भिस्त ठेवावी लागते, व कंबर बांधून स्वतःला मदत करावी लागते. याकरितां मनांतील सर्व विषयवासना काढून टाकून ब्रह्मरसाची गोडी घेण्यांत सदा निमग्न रहा.'

**राममोहन राय, देवेंद्रनाथ ठाकूर** व **केशवचंद्र सेन** यांनीं ब्राह्मसमाज ज्या मूलतत्त्वावर स्थापन केला, तें तत्त्व तुकोबाच्या वरील अभंगामध्येंही आहे. ब्राह्मधर्मसंस्थापकाच्या व ब्राह्मधर्मप्रसारकांच्या अंतःकरणामध्यें जो भाव वसत होता, त्याची आपण योग्य जोपासना केली, तर मला वाटतें कीं आपणांस निराशेचे प्रसंग फारच थोडे येतील व आपलें जें ध्येय तें साधीत असतांना आपल्या अंगीं अधिक उत्साह, व अधिक जोम उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

आतां, असे कित्येक लोक आहेत कीं, ते म्हणतात, ब्राह्मधर्म हा परकीय आहे व त्यामुळें हिंदुस्थानांतील खऱ्या अंतःकरणाच्या मनुष्यास त्याविषयीं मुळींसुद्धां सहानुभूति वाटणार नाहीं. अशा प्रका-

रचे लोक म्हणजे जाणूनबुजून आपल्या डोळ्यांवर कातडें ओढून घेतात असें म्हटल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं. ब्राह्मधर्म हा कांहीं नवीन धर्म नाहीं. उपनिषदें व भगवद्गीता यांमध्यें ज्या थोर विभूतींचे विचार ग्रथित केले आहेत, त्या विभूतींच्या अंतःकरणामध्यें जो भाव होता, त्या भावाच्याच भरभक्कम पायावर ब्राह्मधर्माची स्थापना झालेली आहे. मूळचा अति उत्तम व अति उदात्त असा जो हिंदुधर्म त्याचेंच ब्राह्मधर्म हें परिणत स्वरूप होय.

हिंदु मनुष्याचा ईश्वरावर विश्वास असतो, ही गोष्ट ब्राह्मसमाज स्थापणारांच्या मनामध्यें प्रधानत्वेंकरून होती असें दिसतें. त्यांच्या मतें धर्म हा सर्व राष्ट्रीय जीवित्वाचा पाया होय आणि ईश्वरावर दृढ भाव असल्याशिवाय व अंतःकरणांत त्याचें वास्तव्य पूर्ण बाणल्याशिवाय कोणतेंही जीवित्व व्यर्थ होय, अशी त्यांची दृढ समजूत असे. त्यांना वाटे कीं, कोणत्या कां कारणानें होईना, आमच्या मनांतील ईश्वराविषयींचा भाव व आमची भूतदया नाहींशी होईल, तेव्हां आमच्या राष्ट्राचा ऱ्हास झाला असें समजावें. एलिफंटा, कारला व अजुंठा येथील कोरींव लेणीं किंवा अशींच दुसरी शिल्पकलेचीं पुरातन व सुंदर कामें आपण पाहिलीं, तर वरील गोष्ट स्पष्ट होते. जेव्हां राष्ट्रीय जीवित्व ऐन भरांत होतें, त्या वेळेची आठवण या गोष्टी करून देतात. ज्या कल्पक लोकांनीं ही कामें केलीं, त्यांच्या कल्पकबुद्धीची आपण तारीफ करितों; पण या कामांमध्यें जी एक प्रकारची वक्तृत्वशक्ति आहे, तिच्याविषयीं आपण बधिर होतों. ह्या भव्य कामांच्या मुळाशीं आपण गेलों व आपल्या पूर्ववैभवाची आठवण करून देणारीं हीं जीं कामें त्यांपासून आपण धडा शिकलों, तर आपला फायदा होणार आहे. हिंदुस्थानामध्यें पूर्वी असा एक काळ होऊन गेला कीं, त्या वेळीं हिंदु लोक सुख, पैसा व कीर्ति एवढ्याकरितांच आपलें जीवित्व आहे, असें समजत

नसत, असें आपणांस वरील कामांवरून दिसून येतें. याच्या उलट ईश्वराच्या वैभवाचा महिमा गाण्याकरितां व आपल्या देशबांधवांच्या उपयोगीं पडण्याकरितां ते आपलें सर्वस्व खर्च करीत असत.

अशाच प्रकारचा भाव **राममोहन रायाच्या** अंतःकरणांत उदित झाला होता व अनेक दिशांनीं त्यांनीं जो उद्योग केला, त्याचें रहस्य हेंच आहे. ते म्हणत कीं, 'ईश्वराकडे जा, फक्त ईश्वराकडेच तुम्ही जा. तुम्ही व ईश्वर यांमध्यें कांहींही येऊं देऊं नका.' कित्येक जण असें म्हणतात कीं, त्यांनीं मूर्तिपूजेचा निषेध केला व त्यायोगें पुष्कळ हिंदु लोकांच्या धर्माला धक्का बसला. **राममोहनरायानें** केलें, तसें करणें ह्मणजे जर पाप ठरत असेल, तर **राममोहना**-बरोबर आह्मीही दोषास पात्र आहों. परंतु, मजविषयीं ह्मणाल तर माझी मनोदेवता, मला असें सांगत नाहीं कीं, मूर्तिपूजेच्या विरुद्ध बोलणें ह्मणजे खऱ्या हिंदुधर्मावर हल्ला करणें होय. पुरातन काळापासून मूर्तिपूजा ह्मणजे पूजेचें आवश्यक लक्षण मानलें जात आहे काय? ज्यांना इतिहासाची थोडी तरी माहिती आहे, ते नाहींच असें ह्मणतील. भागवतधर्मी आमच्या ऋषींना मूर्तिपूजा ही खऱ्या पूजेला आडकाठी आहे, असें नेहमीं वाटत असे. त्यांनीं मूर्तिपूजेचा निषेध करून असें स्पष्ट सांगितलें कीं, **आत्म्याचें परमात्म्याशीं सख्य करण्याच्या वाटेमध्यें मूर्तिपूजा बाधक होते.** आपणांस या गोष्टीकडे कानाडोळा करून चालावयाचें नाहीं. कित्येक जण असें ह्मणतील कीं, ईश्वराविषयीं विचार करीत असतांना ज्याच्यावर आमची दृष्टि बसेल अशी एकादी मूर्ति आमच्या पुढें पाहिजे, ह्मणून मूर्तिपूजेची अवश्यकता आहे. परंतु, वस्तुस्थिति अशी आहे कीं, ईश्वराविषयींची उदात्त कल्पना एका बाजूस ठेवून मूर्तिपूजकाची प्रवृत्ति नेहमीं ईश्वरास मनुष्यामधील व्यंगें व अपूर्तता अर्पिण्याकडे सदां असते. मला

माहीत आहे कीं, सर्व प्रकारच्या पूजेमध्यें एक प्रकारच्या मूर्तिपूजेचा समावेश होतो. मनुष्याच्या मनाच्या संज्ञेशिवाय आपणांस कोणत्याही गोष्टीची कल्पना करतां येणार नाहीं. आपण जेव्हां ईश्वराविषयीं विचार करितों तेव्हां मनुष्यामध्यें दिसून येणारें अगदीं वरच्या दर्जाचें प्रेम, ज्ञान, शक्ति व पावित्र्य आपण त्यास अर्पिण्याचा अवश्यमेव प्रयत्न करितों, ही गोष्ट अगदीं खरी आहे. एकंदरींत, ईश्वराचें स्वरूप ध्यानांत आणण्याकरितां कांहीं अंशीं ईश्वरास मर्यादित केल्याशिवाय आपलें चालत नाहीं. मनानें व अंतःकरणानें आपणांस ईश्वराचें सख्य करावयाचें असतें, एवढ्यावरूनच वाजवीपेक्षां जास्त कनिष्ठ बनून आपणांस ईश्वराविषयीं काय वाटतें हें दर्शविण्याकरितां एकाद्या दगडाधोंड्याचा आपण आश्रय करावा, असें सिद्ध होतें काय ?

ईश्वराच्या निराकार स्वरूपाची कल्पना आपल्यामधून नाहींशी होण्याइतकें आपण हिंदु लोक निकृष्ट स्थितीस पोहोंचलों आहों काय ? मूर्तिपूजा ही देहात्मवादाचा एक भयंकर प्रकार नव्हे काय ? आपलें थोर वंशज ईश्वराचा विचार करीत असतांना मूर्तीसारख्या क्षुद्र गोष्टीची मदत घेत नव्हते, तथापि ईश्वराविषयींच्या प्रेमानें त्यांचीं अंतःकरणें सदां भरलेलीं असत; या गोष्टीपासून सध्यां आपण च्युत झालों आहों असें म्हणणें म्हणजे स्वधर्माभिमानाचा अभाव आपणांमध्यें आहे, असें होईल काय ! हिंदुधर्मावर माझा पूर्ण विश्वास आहे व नेहमीं मी त्याचा पुरस्कार करितों, पण मूर्तिपूजा ही ईश्वराच्या पूजेचा अगदीं घाणेरडा प्रकार आहे व तो पुष्कळ दिवसांपासून आपणांस जडलेला आहे; यामुळें मला वाईट वाटल्याशिवाय रहात नाहीं. सर्व जगास धर्म शिकविण्यास आपण हिंदुलोक लायक आहों, अशी आपली भवितव्यता आहे, हें मी कबूल करितों. परंतु केव्हां ? ज्या गोष्टींच्या योगें आपल्यामधील

खरें जीवित्व नाश पावत आहे, अशा हिडिस गोष्टींची आपण वाढ खुंटवू व आपल्या थोर पूर्वजांचा उपदेश लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागूं, तेव्हांच आपलें तोंड वर करून जगास आपला धर्म सांगण्याची आपणांमध्यें पात्रता येईल. एका मोठ्या कवीनें जो उपदेश केला आहे तो तरुणांनीं सदां लक्षांत ठेविल्यास बरें. तो असाः—
'He who wishes to write a heroic poem must make his life a heroic one.'

( जो वीररसप्रधान काव्य लिहिण्याची इच्छा करितो, त्यानें आपलें आयुष्य वीररसयुक्त केलें पाहिजे. )

